# सैन्यांतील आठवणी

लेखक

कॅप्टन **गो. गं. लिमये**

एम्. बी., बी. एस्., बी. एच् वाय्. ( गोल्ड मेडॅलिस्ट )

FORE-WORD

Lieut. Col. **J. M. HUNT**

*Commanding 5th Battalion, 2nd PUNJAB Regiment*

**प्रस्तावना**

राजरत्न जनरल **नानासाहेब शिंदे**

सर सेनापति ( सेवा-निवृत्त ), बडोदे सैन्य

फेब्रुवारी, १९३९

**किंमत २ रुपये**



ती. मातोश्री ताईंचे चरणीं



Lieut Colonel J. M. HUNT
Officer Commanding
5th Bn., 2nd PUNJAB Regt.



मी

## FOREWORD.

When I was asked to write a foreword to this book, it was a great surprise to me to learn that Captain Limaye, my friend of nearly twenty years ago, was a writer; to his regular readers it will perhaps equally be a surprise to know that he spent several years as a Medical Officer in the army. It was in the latter capacity that I knew him, and I hope he has taken away from the army memories as happy as those he has left behind.

Of his early career as a Medical Officer I know nothing first hand, but of the eighteen months he spent with my Regiment I know a good deal, partly by personal contact, partly by the accounts of brother officers and partly as the result of the incidents and anecdotes attributed to him by the rank and file.

My Regiment, which used to be called the 87th Punjabis but has now been renamed the 5th Battalion, 2nd Punjab Regiment, was in Mesopotamia for over four years from March 1917. Though the Great War ended on the 11th November 1918, peace conditions did not obtain in Mesopotamia until some years later; there were operations against the Kurds in 1919, and an Arab rebellion in 1920; and, in many ways conditions during these operations were more trying than those during the period of the Great War proper.

In the summer of 1919 we were brigaded with the 116th Mahrattas, amongst other regiments, in South Kurdistan; and it was there that, as a regiment, we first made the acquaintance of Limaye. He was posted as Medical Officer to the 116th Mahrattas shortlv before an action against one Shaikh Mahmud, a notorious Kurd. Contact was made with the enemy on the 17th June, and Limaye had his first experience of fire. While it was unfortunate for him that he should at that moment fall ill, his illness was fortunate for us because it resulted in a change of Medical Officers, and in a few months time he was posted to the 87th Punjabis.

From the neighbourhood of Kirkuk, where he joined us, we marched to Erbil, some 90 miles further north, and spent several months distributed in garrisons about that part of Kurdistan. During this period there was little, if any, fighting, but there was a lot of soldiering in it's other forms–marching, fatigue and boredom. When a small number of men get thrown together for long periods with no company but each other's, they get to know each other very well, frequently too well; nerves get on edge and the oldest friendships become strained. In our headquarters mess, however, I believe we all stood the test, and I hope the author of this book will agree with me. There was no change in the daily routine except that provided by the weather which varied from summer heat to winter snow, and little recreation except for such amusements as we could invent. The best way we could devise of celebrating Christmas 1919 was to adjourn after dinner to the roof of our billet and fire coloured rockets, which were the property of Government and intended for use in war rather than for Christmas celebrations; our merriment was brought to an abrupt close by an accident which resulted in a casualty and necessitated the damaged officer retiring with Limaye to our so-called Regimental hospital, where, with entirely inadequate facilities, the necessary serious repairs were carried out.

In the early part of 1920 the Regiment was moved to a camp near Baghdad where we enjoyed such civilisation as is possible under canvas in summer; but we were not allowed to indulge in this comparative luxury for long, as the Arab Revolt broke out and we were sent, in July, to join a column which was to relieve the besieged garrison of a small town on the Euphrates, called Rumaitha. These operations were a severe strain for officers and men; the mental strain, the fatigue and the heat took their toll as much as did the enemy. The conditions under which a doctor was required to exercise his skill were depressing, equipment in the form of bandages and medicine were probably adequate, but it required great fortitude to compete with the lack of water–which frequently had to be fought for–absence of accommodation and shelter, and the pervading dust, dirt and heat. The Medical profession is usually at it's best when faced with a crisis, and it's reputation was well maintained by our Medical Officer. I personally have cause to be grateful to him, as he was the first doctor to attend to me when I was one of a large number of casualties which he dealt with in a dust storm, while my Regiment was acting as rear–guard to the column in it's withdrawal after the successful relief of Rumaitha, those early attentions may have avoided the loss of a limb.

From this time my personal contact with Limaye ceased, but he remained with the Regiment for another nine months. During this period operations against the Arabs continued and the Regiment was moved about the Euphrates area, constantly subject to the attention of snipers, occasionally in conflict with organised opposition. In one of these engagements Limaye himself was hit, but shewing the spirit of a soldier rather than the wisdom of a doctor, rejoined us in a few days. Before writing this foreword I tried to refresh my memories of Limaye by speaking of him to one of our Indian Officers—one of the few men now in the Regiment who were serving at that

time; Medical Officers change frequently, but Limaye was easily identified as the man who escaped from hospital when a wounded patient.

Of Limaye's ability as a writer I am not qualified to judge; of his skill as a doctor my appreciation can necessarily not extend to technical details, but of his value as a Regimental Medical Officer I can speak with authority. He was both a valued member of the officers' mess, and, which is more important, a valued member of the Regiment; officers and men were gaining experience with him, and after sharing with him the vagaries of fortune for 18 months, looked upon him as an established member of the Regiment.

Friendships founded upon the experiences and in the conditions I have attempted to outline are founded on a firm basis, and it can readily be understood that the Regiment was very sorry to part with Limaye when he was ordered elsewhere on our return to Karachi in April 1921. At that time we wished him all good luck for the future, and now once more I wish him success in any enterprise he may undertake, and with this book in particular.

January 1939. J. M. HUNT.



**राजरत्न जनरल नानासाहेब शिंदे,**

सर सेनापति, ( सेवा-निवृत्त ), बडोदा सैन्य

# प्रस्तावना.

गेल्या डिसेंबरांत कॅ. लिमये यांनीं मुंबईहून मला एक पत्र पाठविले व विनंति केली कीं, मी " मैन्यातील आठवणी " म्हणून एक पुस्तक लिहीत आहे व तें पुस्तक हल्ली छापण्यास सुद्धां दिलें आहे. याकरितां आपण त्या पुस्तकास प्रस्तावना लिहून दिल्यास माझ्यावर फार उपकार होतील. कॅ. लिमयांची व माझी प्रत्यक्ष काहीं ओळख नसतांही, एक लष्करी अंमलदार आपल्या आठवणी लिहीत आहे त्यास प्रोत्साहन देण्याच्या हेतूनें मी प्रस्तावना लिहिण्याचें लगेच कबूल केले व त्यांस पत्रानें कळविले कीं, महाराष्ट्र शारीरिक शिक्षण परिषदेच्या मुंबई येथील बैठकीचे अध्यक्षस्थान स्वीकारण्यास मी तारीख २४ डिसेंबर रोजी जाणार आहे. करितां आपण तेथे येऊन मला भेटावे म्हणजे याबद्दल जास्त बोलतां येईल.

२. मुंबईस डॉ. म्हसकर यांच्या बंगल्यावर मी त्यांचा मेहमान म्हणून रहात असतां एके दिवशी कॅ. लिमये हे मला भेटण्यास आले. त्यांची ती कृश शरीरकाठी व ठेंगणी मूर्ती पाहून मला थोडा अचंबा वाटला. थोडा वेळ बसून त्यांनीं आपल्या पुस्तकासंबंधीं हकीकत मला सांगितली व सर्व पुस्तक छापून तयार होतांच मी त्याची एक प्रत आपणाकडे पाठवीन असें त्यांनीं कळविले व माझा निरोप घेतला. या भेटीमध्यें मला कळले कीं, हे डॉक्टर असून लढाईमध्ये यांना आय्. एम्. एस्. चे टेंपररी कमिशन मिळाले होतें.

३. पुढे बडोद्यास परत आल्यावर या महिन्यांत तारीख १४ च्या सुमारास त्यांच्या पुस्तकाची छापील प्रत मजकडे आली. हें पुस्तक वाचून पहात असतां यांतील कित्येक लेख मी पूर्वीच वाचले असल्याचे मला स्मरले. त्याचप्रमाणें या पुस्तकामधून ठिकठिकाणीं दिसून आलेला विनोद पाहतां कॅ. लिमये या

नांवाचे एक विनोदी लेखक आहेत ते हेच कीं काय असा मला थोडासा संशय वाटूं लागला. याची खात्री करून घेण्याकरितां माझ्या खानगी पुस्तकालयाचें रजिष्टर मी चाळून पाहिले त्यामध्ये "विनोदी लेखसंग्रह" व "जुना बाजार" या नांवाचीं कॅ. लिमये यांचीं दोन पुस्तकें सांपडली. हल्लींच्या पुस्तकाचे कर्ते हेच ते विनोदी लेखक अशी माझी खात्री झाली. परंतु त्यांनीं आपल्या भेटीत मला हें कळविले नव्हते.

४. जर्मन महायुद्ध संपल्यानंतर पूर्व आफ्रिकेत व मेसोपोटेमियामध्यें जीं बंडें व लढाया सुरू होत्या त्यामध्ये सन १९१८ ते सन १९२१ पर्यंत त्यांनीं भाग घेतला होता. लढाई कशी असते हे पाहण्याच्या उत्कट इच्छेनें स्वत.च्या जीवाची भीति न बाळगतां आपण होऊन हे आय्. एम्. एस्. च्या नोकरींत दाखल झाले. डॉक्टर म्हणून यांची प्रथम नेमणूक पेशावरला झाली. तेथून ते पूर्व आफ्रिकेत गेले व नंतर मेसोपोटेमियामध्ये गेले. लढाईमध्ये एका वेळीं यांच्या पायास गोळी लागून हे जखमी झाले होते. लढाईच्या आघाडीवर जेथे दुसरे डॉक्टर जाण्यास कचरत असत त्या ठिकाणीं कॅ. लिमये हे बेधडक जात असत.

५. या पुस्तकांत त्यांनीं सैन्यांतील बारीक सारीक माहिती फार चांगल्या रीतीनें दिलेली आहे. यावरून त्यांची निरीक्षण शक्ति फार जबर आहे असे म्हणावें लागतें. पूर्व आफ्रिकेमध्यें लग्नाचा सौदा कसा केला जातो याचें वर्णन त्यांनीं फार बहारीचे केले आहे. त्याचप्रमाणें साहेब आणि नेटिव्ह अंमलदार यांच्यांतील फरकही त्यांनीं फार चांगला दाखविला आहे. रजा मिळविण्याकरितां लोक कशा खोट्या हकीकती सांगतात हें त्यांनीं रजेच्या तंत्रांत सांगितले आहे. युरोपियन लोकांच्या शिष्टाचारासंबंधीं सुद्धां त्यांनीं माहिती दिली आहे. लष्करांतील गोंधळ कसा असतो याचें त्यांनीं विवेचन केले आहे. लष्करी जीवनासंबंधीं त्यांनीं केलेलें विवेचन वाचण्यासारखें आहे.

६. मेसोपोटेमियामध्यें सावलीचे चमत्कार कसे असतात हें वाचकांनीं या पुस्तकांत वाचावे. बंदुकीचे, मशीनगनचे व तोफेचे आवाज कसे होतात याचें विवेचन फार बारकाईनें केलें आहे. पंजाबी, जाठ व शीख यामध्ये जास्त धाडशी कोण याबद्दल त्यांनीं आपला प्रत्यक्ष अनुभव दिला आहे.

७. या पुस्तकाचे १ पेशावरला नेमणूक, २ मी पूर्व आफ्रिकेंत जातों, ३ मेसोपोटेमिया, ४ आघाडीवर, ५ अवघड रिट्रीट, ६ मुसाइबवर चाल, ७ हिला मुक्कामीं, ८ कूफावर मोहीम, ९ मायभूमीस परत, याप्रमाणें ९ भाग असून १० व्या भागांत पुरवणी म्हणून दिली आहे व त्यामध्ये लढाईची डायरी दिली आहे, निरनिराळया स्थळांमधील अंतर दिले आहे व कांहीं इंग्रजी कविता दिल्या आहेत. याप्रमाणें या पुस्तकाची एकंदर सजावट आहे. एकंदरीनें हे पुस्तक वाचल्यापासून लढाईच्या वेळीं लष्करी जीवन कसें असतें याची चांगली कल्पना येते. लढाईमध्ये मरण हे दरघडीला दत्त म्हणून पुढे उभे असतें, परंतु दुष्मनाच्या बाजूनें येणारी प्रत्येक गोळी प्राणघातक होते असें नाहीं. हजारों गोळया येतात, परंतु त्यायोगे दहापांच माणसेच मरतात अगर जखमी होतात. असा कांहीं ईश्वरी संकेत आहे म्हणूनच धैर्यवान लोक गोळयांचा वर्षाव पडत असतांही दुष्मनावर तुटून पडतात व त्यापैकीं कांही जण तरी सुरक्षित परत येतात. कॅ. लिमये यांनींसुद्धां पुष्कळ वेळां आपला जीव धोक्यांत घातलेला दिसून येतो. परंतु यांतून नुसती पायाला एक जखम होऊन ते सुरक्षित परत आले आहेत.

८. कॅ. लिमये यांना फोटोग्राफीचा बराच नाद असल्यामुळें व स्वतः चित्रे व नकाशे काढण्याची हौस असल्यामुळें त्यांनीं या पुस्तकांत पुष्कळ फोटो, चित्रें व नकाशे दिलेले आहेत. त्यामुळें या पुस्तकास जास्त शोभा आलेली आहे. कॅ. लिमये हे म्हणतात त्याप्रमाणें हिंदी लष्करी अंमलदार ज्यांनीं जर्मन महायुद्धांत अगर इतर युद्धांत भाग घेतला असेल त्यांनीं जर आपल्या आठवणी लिहून प्रसिद्ध केल्या तर किती तरी चांगले होईल. परंतु मला मोठ्या दिलगिरीनें म्हणावे लागते कीं, अशा प्रकारचे कॅ. लिमये यांचें हें पुस्तक प्रथमच बाहेर पडत आहे हें त्यांस भूषणावह आहे. इतर हिंदी अंमलदारांनीं आपल्या आठवणी कां लिहिल्या नाहींत याचे उत्तर मी असें देईन कीं, कॅ. लिमये यांच्यासारखी निरीक्षण शक्ति, धैर्य, बुद्धि व लेखनशक्ति इतरांमध्यें नसल्यामुळेंच त्यांच्याकडून ही कामगिरी झालेली नाहीं. कॅ. लिमये यांनीं कित्येक ठिकाणीं आपले विचार निर्भीडपणें दिलेले आहेत. त्यांना जें दिसलें व मनाला पटले तेंच त्यांनीं नमूद केलेलें आहे. असें धैर्य फारच थोड्या लेखकांच्या लेखनामध्यें असतें.

९. कॅ. लिमये यांच्यासंबंधीं त्यांच्या उपरी अंमलदारांनीं फार प्रशंसनीय उद्गार काढले आहेत, त्यावरून त्यांनीं आपली कामगिरी फार उत्तम रीतीनें बजावली आहे असें दिसून येतें. एका विनोदी लेखकानें लष्करासंबंधीं असें उत्तम पुस्तक लिहिणे हें खरोखर एक मोठे आश्चर्य आहे. परतु ते आश्चर्य या वामनमूर्तीनें करून दाखविले आहे याबद्दल त्यांचें जितकें अभिनंदन करावें तितके थोडेंच आहे.

माझ्या ४३ वर्षाच्या लष्करी नोकरीमध्यें जरी प्रत्यक्ष लढाईवर जाण्याचा मला सुयोग आला नाहीं तरी पण हे पुस्तक वाचीत असतांना मला त्यामध्यें समरस होतां आले. माझी खात्री आहे कीं, साधारण वाचकांस सुद्धां हे पुस्तक प्रिय होईल. कॅ. लिमये यांनीं मराठी वाङ्मयामध्ये एक नवीन प्रकारची या पुस्तकाने भर घातली आहे असे मला वाटते.

सख्या–बाग,<br>
यशवंत–निवास,<br>
बडोदें, ता. २१ जानेवारी, १९३९

**नानासाहेब शिंदे.**<br>
जनरल

---

# विसरलेल्या आठवणी !

सैन्यांतील या आठवणी ( याही आतां विसरत आल्या आहेत ! ) त्या त्या वेळीं केलेल्या टिपणांवरून, आल्या-गेलेल्या पत्रांवरून, व इतर कागद-पत्रांच्या आधारानें, १९२३–२४ सालीच लिहिल्या. पैकीं कांहीं भाग ' मासिक मनोरंजनांत ' त्याच वेळीं प्रसिद्ध झाला होता.

दुर्दैवानें पश्चिम रणांगणावर जाण्याची संधि मला मिळाली नाहीं, त्यामुळें सुधारलेली लढाई कशी असते याची मला मुळींच ओळख नाहीं. आधीं ४, ऑगस्ट, १४ ला इंग्लंड महायुद्धांत पडलें. तह झाला—४। वर्षांनीं—११-११-१८ ला. आणि मी सैन्यांत शिरलों २६-२-१८ ला,–म्हणजे महायुद्धाचे अखेरच्या वर्षांत ! मात्र त्यावेळीं अगदी आणीबाणीची वेळ आली होती. आणि अमेरिकेचें ( व माझें ! ) पाठबळ मिळालें नसतें तर दोस्त-राष्ट्रांची पाठ जमीनीला लागून तीं कदाचित् जमीनदोस्त होण्याच्या बेतांत आलीं असतीं ! जुलै, १९१८ मध्यें एक सॅनिटरी सेक्शन घेऊन मी पोर्तुगीज पूर्व आफ्रिकेंत गेलों खरा, पण तेथेही प्रत्यक्ष रणक्षेत्रापासून मी ३० मैल लांब होतों. मी फक्त पाहिलें काय तर मेसोपोटेमियांत १९२० साली अरब लोकांनीं बंड केलें होतें. ( इकडल्या १८५७ च्या बंडाच्या चालीवर ! ) त्या वेळच्या कांहीं हालचाली ! परंतु निदान एक प्रवास-वर्णन होईल या आशेने—लिहून ठेवल्यापासून १४ ( व घडल्यापासून २० ) वर्षांनीं कां होईना, या आठवणी प्रसिद्ध करीत असतां माझ्या खांद्यावरचें एक मोठें ओझें हलकें झाल्यासारखें मला वाटत आहे.

युद्धांत निरनिराळ्या लोकांना वेगवेगळे अनुभव येतात. राजधानींत बसून सूत्रें हलविणाऱ्या मुत्सद्यांपासून ते जनरल, ऑफिसर, शिपाई, फॉलोअर, यापर्यंत. कांहीं तऱ्हेचे अनुभव व्यक्तिविशिष्ट असतात ( म्हणजे तसाच अनुभव दुसऱ्या कोणाला आलेला नसतो, ) तर कांहीं अनुभव समाईक ( म्हणजे एकाद्या गटांतील प्रत्येकाला सारखेच ) असतात. अनेक मंत्र्यांनीं, सेना–नायकांनीं व हपीसरांनीं आपापल्या आठवणी प्रसिद्ध केल्या आहेत. त्या परीनें त्या मनोरंजक आहेतच. पण एकाद्या साध्या शिपायाच्या अगर भिस्त्याच्या आठवणी निराळ्या दृष्टीनें तितक्याच किंवा जास्तच मनोरंजक, रोमांचकारी व उद्बोधक होतील. मी तर म्हणेन कीं एकाद्या डाक्टरनें लिहिण्यापेक्षां जखमी शिपायानें ( —किंवा गोलंदाजानें लिहिण्याऐवजीं तोफेच्या चाकानें किंवा

उडालेल्या गोळ्याने—) जर आपल्या आठवणी चितारल्या तर त्या मनाचा अधिक ठाव घेतील !

या आठवणींत ऐतिहासिक माहिती, राजकीय परिस्थिति वगैरे देण्याच्या भानगडींत मी पडलों नाही. जे पाहिले ते लिहिले आहे, मात्र तिखटमीठ लावण्याऐवजीं अळणीच राखल्या आहेत ! बोलून चालून आठवणीच त्या ! आठवले तसे लिहिले !

तथापि इतके दिवस मी रहात होतो कोठें, खात होतों काय आणि काम काय करीत असे वगैरेचा या आठवणींत फारसा पत्ता लागत नाहीं. म्हणून ' पुरवणी ' मजकूर जोडला आहे. तसेच कालक्रमानुसार लिहिलेली वॉर डायरी अखेरीस सांपडेल.

सगळ्याचे शेवटीं कांहीं इंग्रजी कविता ( ! ) दिल्या आहेत. त्याला वृत्त वगैरे कांही नाहीं. ( अस्सल कवीने रेखाटलेल्या कवितेवरून चाल बनते. आयत्या चालीवर कविता रचणें हें मामुली कवींचे काम ! ) या काव्याव-गाहनामुळें निदान त्या वेळी मेसमधील हपीसरांची थोडीबहुत करमणूक होई. तत्कालीन परिस्थितीचे त्यांत थोडेसे दिग्दर्शन असल्यामुळें त्याचा या बुकांत समावेश केला आहे, इतकेंच. एरवीं ट ला ट जोडण्यापलीकडे त्यांत कवित्व सांपडणें कठीण !

सैन्यांतील ( व एरवींहि ) माझी फुरसतीची करमणूक म्हणजे ' विनोदी ' लेख, गोष्टी किंवा सचित्र पत्रे लिहिणे, चित्रे व फोटो काढणे ही होती. ( कव्हरवरचा, अर्पण पत्रिकेतील, कर्नल हंट, जनरल शिंदे, ' मी व कांहीं बाबू लोक ' व ' आमच्या पलटणीचे हपीसर, ' हे सहा सोडून ) या पुस्तकांतील सर्व ब्लॉक्स मीं स्वत: घेतलेल्या फोटोवरून किंवा काढलेल्या चित्रांवरून ( व नकाशांवरून ) केले आहेत. कव्हरवरील ' बोलक्या तोफांचें ' चित्र—माझा फोटो खराब झाल्यामुळें त्यावरूनच पण—आर्टिस्टकडून काढून आणले आहे. ' तमाझिया ' खेड्यावर चाल करतांना ( ११–१०–२० ) प्रत्यक्ष तोफा डागीत असतां हा फोटो घेतला आहे. ( पान १५३ ). तसेच २०२ पानावरील चित्र फोटोवरून सुधारून घेतलें आहे. ता. ३१–७–२० रोजीं रिट्रीट करतांना नदीपलीकडून शत्रू गोळीबार करीत होता त्यास अलीकडच्या तीरावरून आमच्या पलटणीचा एक सेक्शन ' उलट उत्तर ' देत असतां हा फोटो मीं घेतला ( पान १३३ ).

अशा तऱ्हेचें हें मराठींत पहिलेंच पुस्तक असेल असें वाटतें. व अशा पुस्तकांतील वर्ण्य विषयाचा वाचकांस परिचय करून द्यावयास तशीच अधिकारी व्यक्ति पाहिजे. चटकन् जनरल नानासाहेबांचे नांव माझ्या डोळ्यांपुढें आलें. त्यांना मीं विनंति केली व त्यांनीं ती आनंदानें मान्य केली. याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे. लिहितां–वाचतांना डोळ्यास त्रास होत असतांही त्यांनीं अल्पावधींत प्रस्तावना लिहून दिली हा माझ्यावर मोठाच उपकार होय.

आतां पंजाबी पलटणीचा मेडिकल ऑफिसर या नात्यानें माझी वाचकांस ओळख पटविली पाहिजे. त्या वेळचे कमांडिग ऑफिसर कर्नल बी. एम्. कॅरोल हे दुर्दैवाने दिवंगत झाले आहेत ! सेकंड–इन्–कमांड मेजर सी. टी. एम्. स्मिथ यांचा शोध करूनहि पत्ता लागला नाही ! तेव्हां पलटणींतील त्या वेळचे ॲड्जुटंट, कॅप्टन (व आतां तिचेच कमांडिग ऑफिसर, लेफ्टनंट–कर्नल) जे. एम्. हंट यांनीं माझ्या पुस्तकाला फोर–वर्ड लिहिण्याचे हौसेने कबूल केले; परंतु 'मी कांहीं लेखणी-बहाद्दर नाहीं !' असे मला बजावलें ! पण तराजु टाकून तरवार उचलणाऱ्यांना लेखणी पेलणें कांहीं अवघड नाहीं, हे त्यांच्या फोर-वर्डवरून सहज समजण्यासारखे आहे ! २२-७-२० रोजीं मेसोपॉटमध्यें रिट्रीट करतांना ते जखमी झाले होते. (पान १२४ पहा.) त्यांचा हात आतां कोंपरा-पाशीं काटकोनांत ताठ होऊन बसला आहे ! ब्रिगेड ट्रेनिंगकरतां कॅंपवर असतां वेळांत वेळ काढून, माझ्या हांकेला आयत्या वेळीं ओ दिल्याबद्दल मी कर्नल साहेबांचे मनापासून आभार मानतों.

सैन्यासंबंधींच्या पुस्तकाला सर-सेनापतींचा आशिर्वाद मिळाला हे या पुस्तकाचें भाग्यच म्हटलें पाहिजे. आणि अरब बंडांतील अनुभवाची ओळख पटविण्यास त्यावेळीं हजर असलेल्या व आतां त्याच पलटणीचें धुरीणत्व आलेल्या एका हपीसर-बंधूने २० वर्षांनंतर धावून यावे हें मी आपले नशिब समजतों !

१, फेब्रुवारी, १९३९
गिरगांव, मुंबई ४

**लेखक.**

---

# सैन्यांतील आठवणी

## १ पेशावरला नेमणूक

### लढाई कशाशीं खातात ?

लढाई म्हणजे असते तरी काय व ती खातात कशाशीं हें पहाण्याच्या तीव्र उत्कंठतेनें मी सैन्यांत शिरलों व ही माझी जिज्ञासा जरी पूर्णांशानें सफळ झाली नाहीं तरी 'फूल नाहीं, फुलाची पाकळी' या न्यायानें मला थोड्याशा 'प्रसादा'-वरच संतुष्ट रहावें लागलें !

साधारणपणें असें म्हणण्यास हरकत नाहीं, कीं, सैन्यांत दाखल होणें म्हणजे चैन करणें होय—( म्हणजे कपडे-लत्ते फुकट, जेवणखाण फुकट, प्रवास फुकट, औषध फुकट, वगैरे )-अशा समजुतीनें अगर भलत्याच नादाला लागून जो रिक्रूट सैन्यांत भरती होतो, तो फुकट फसतो व त्याचें मरेपर्यंत भरीतच होतें. उलटपक्षीं ज्याला असें वाटत असतें, कीं, सैन्यांत शिरणें म्हणजे मृत्यूच्या दाढेतच उडी घेणें होय, त्याचें जीवन बहुशः सुखांत जातें किंवा बहुत-करून जीवन जातहि नाहीं, व तो त्या मानानें मजेत दिवस काढतो. आतां, साहस हीच ज्याची महत्त्वाकांक्षा, त्याला मात्र पोटभर हौस भागवून घेतां येते. तरीहि अशा प्रत्येकाला



मि. ॲस्क्विथ, प्राइम मिनिस्टर

अशी संधि मिळतेच असें नाही. बहुधा असें होतें, की, ज्यांना आघाडीवर जाण्याची उत्कंठा असते, ते त्या कामाकरितां कदाचित् निवडले जात नाहीत व ज्यांच्या पोटांत धाकधुक होत असते त्यांच्यावर तो प्रसंग हटकून येतो ! मनाच्या पूर्व तयारीवर शिपायाची सुखदुःखे अवलंबून असतात.

## पंजाब मेल

एखाद्या मोत्याच्या कंठ्यासारख्या दुर्लभ वस्तूकडे गरीब मनुष्य ज्या दृष्टीनें पहातो, अगर डोळस माणसाच्या दृष्टीकडे जसा एखादा आंधळा ( न दिसतां ) पहातो, तसे आम्ही पंजाब मेलकडे पहात असूं. बडोद्यांतील राजवाडा पहावयाला जावें तसें पंजाब मेल पहावयाला लोक जात असत. त्यामुळे पंजाब मेलमधून प्रवास करण्याची मोठी मौज वाटली ! प्रथम पेशावरला माझी नेमणूक झाली. पेशावर मुंबईहून १५०० मैल-म्हणजे इतकें लांब आहे, की, जी. आय्. पी. रेलवेसुद्धां ( दिल्लीला ) संपते ! व पुढें नॉर्थ वेस्टर्न रेलवे सुरू होते तरी तोच तो आगगाडीचा डबा पेशावर छावणीच्या प्लॅटफॉर्मवर अगदीं नेमल्या वेळीं जाऊन थडकतो.

तारीख २३ फेब्रुआरी रोजीं दुपारीं २--२५ ला जी गाडी मुंबईहून निघाली ती पेशावरला २५ तारखेच्या रात्रीं नऊ वाजतां जाऊन पोंहोचली. म्हणजे एकंदर सुमारें ५७ तासांचा प्रवास आहे. वाटेनें स्थलांतरानुसार लोकांचें वर्णांतर, वस्त्रांतर वगैरे मोठें गमतीदार वाटलें. तिसऱ्या प्रहरीं रावळपिंडीजवळ गार वारा सुटल्यामुळें अतिशय थंडी वाजत होती. रावी, चिनाब वगैरे नद्यांचीं पात्रें विशाल व भरलेलीं दिसली. पूलहि मोठमोठे होते. अटकेचा किल्ला आगगाडींतूनच पाहिला. ( हा जातांना पाहिला, कीं, परत येतांना, तें आतां आठवत नाहीं. ) बाजूनें खडकांतून वाहणारी तुडूंब भरलेली नदी, वळण असल्यामुळें दिसणारा भव्य, दुमजली व सतत खडा पहारा असलेला पूल, वगैरे देखावा भयानक पण चित्ताकर्षक होता. आग्रा शहरामधून गाडी जात असतां एका उतारूनें ' तो पहा ताज ! ' म्हणून खिडकींतून बोटानें दाखविलें. घरांच्या शिखरांमधून व झाडींतून एक जुनाट लहानसा पांढरा घुमट दिसत होता, तेवढ्यावरच त्या वेळीं दुधाची तहान ताकावर भागविली ! विशेष कांहीं दिसत नव्हतें, तरी मोठ्या कुतूहलानें वांकून वांकून व खिडकीवाटे बाहेर तोंड काढून,

ती ‘ जगांतील नितांत सुंदर ’ इमारत -पण जी कोणत्याहि एखाद्या मोडकळीस आलेल्या जुन्या मशिदीप्रमाणें तेथून दिसत होती ती पहाण्याचा यत्न करण्यांत बराच वेळ ( फुकट ) गेला ! दिल्ली स्टेशन रात्रीं सुमारें दहा वाजतां लागलें. बाहेर चांगला अंधार होता, तरी आकाशाकडे पाहून जशी निराकार परमेश्वराची कल्पना करावी तसे आम्ही निरनिराळ्या मनोऱ्यांचा व महालांची त्या अंधारांत कल्पना करीत होतो ! दिल्ली स्टेशनवर एक नाविन्य दिसलें. तेथें सुमारें बारा प्लॅटफॉर्म आहेत व लगेज वगैरे सामान आणण्याकरितां बाहेरच्या रस्त्यावरून प्लॅटफॉर्मच्या खालून खालून थेट एक भुयारासारखा रस्ता केला आहे व मग लिफ्टनें तें सामान प्लॅटफॉर्मवर उचलून घेण्याची व्यवस्था केली आहे.

### पेशावर

पेशावरला पोहोचलों तेव्हां रात्र असल्यामुळे तसाच वेटिंगरूमचा आश्रय केला. सकाळी स्टेशन सोडीपर्यंत तीन वेळां निरनिराळ्या लोकांनी इंग्रजीत, मराठींत व हिंदींत, ‘ मी कोण, कोठून आलों, व कोठें जाणार ’ वगैरे प्रश्न केले. त्या त्या भाषांत त्यांना उत्तरें देऊन आतां कोणी संस्कृतमध्ये अगर पुश्तूंत ( पेशावरी भाषेत ) विचारलें तर मात्र पंचाईत होईल, या भीतीनें एक टांगा करून मी तेथून निघालो !

### टमटम

येथील टांगे पुण्यांतील टांग्यासारखेच आहेत. यांना ‘ टमटम ’ म्हणतात. पुष्कळदां फिरावयाला वगैरे जातांना आम्ही स्वतःच टांगा हांकीत असूं. ती एक मोठी करमणूकच होती. पेशावर गांव हिंदुस्तानांतील कोणत्याहि एखाद्या गांवासारखें आहे. अरुंद रस्त्यांत नाशिक अगर काशी, गलिच्छ गल्ल्यांत पुणें, अगर गर्दीत मुंबई यांपैकीं कोणासहि तें हार जाणार नाहीं ! मोहरममधील डोल्यासारखीं तीन–चार मजली घरें, मेहरपीच्या खालपट खिडक्या व ‘ गोषां-तील सुंदर स्त्रिया ’ येथें दिसल्या. मध्यम किंवा उच्च वर्गातील स्त्री गोषावांचून क्वचित्‌च बाहेर पडलेली दिसेल. उघड्या तोंडांनीं रस्त्यांतून मिरविणाऱ्या आपल्या-कडील बायका जर त्यांनीं पाहिल्या–तर–शान्तं पापम् ! पेशावरला मुख्यत्वेंकरून पठाण व बलुची, आणि पंजाबी हिंदु व मुसलमान यांची वस्ती आहे. पठाण लोकांची आतां मुंबईच्या लोकांना चांगलीच ओळख झाली आहे ! उच्च वर्गाचे



टमटम

पेशावरी पठाण उंच, धिप्पाड व राकट असून वर्णानें गोरे आहेत. त्यांचीं मुलें अगदी साहेबांच्या मुलांच्या तोडीस मारतील अशीं गुटगुटीत, गोरी आणि लाल गालांची असतात. बायका देखील (चुकून पहावयाला सापडल्यास) सरळ नाकाच्या व सुंदर दिसतात; पण कोमलपणाचा अंश त्याच्यांत कमी दिसला.

## गोषा

दोन कारणांकरितां घ्यावयाचा असतो असे म्हणण्यास हरकत नाहीं. पेशावरी सुंदर बायका आपलें सुस्वरूप कोणी पाहूं नये म्हणून बुरखा घेतात, तर आपलें 'रूप' कोणाला दिसूं नये म्हणून आफ्रिकेंतील कांहीं मुसलमानी निग्रो बायका बुरखा घेत असल्या पाहिजेत! गोषाचें व्रत फार कडक रीतीनें पाळलें जातें. एका पेशावरी गृहस्थानें एका आजारी बाईकरितां औषध विचारलें. रोगी पाहिल्यानंतर औषध देणें श्रेयस्कर होय असें मी सांगितल्यावर, तो मला खांचाखळग्याच्या वाटेनें पांचसहा मैल लांब असलेल्या एका खेडेगांवांत घेऊन गेला. नंतर अंधुकशा प्रकाशांत असलेल्या मच्छरदाणीच्या खालून हात घालून, तोंडावरून पांघरूण घेऊन निजलेल्या त्या बाईच्या हाताची फक्त नाडीच पांघरुणाखालूनच मला पहावयास मिळाली! याप्रमाणें सर्वांगीण परीक्षा

केल्यावर मीं औषध लिहून दिले व ते खरे सहा मैल पण उंचवट्याचा व खोलगट भाग जमेत धरला तर आठ मैल अंतरावरच्या छावणींत परतलों !

**अश्वारोहण**

आम्हीं चारपांच जणांनीं मिळून घोड्यावर बसावयाला शिकण्याचा (Equitation) बेत केला व तेथील रिसाल्यांत शिकण्याची परवानगी



घेतली. आठवड्यांतून तीन वेळ, सकाळीं ६॥ ते ८ पर्यंत दीड तास, आम्हांला शिकवीत असत. तेथील शिस्त अत्यंत कडक. लवकरच त्यांतून दोनतीन आसा-

मींनीं कांहींना कांही सबबी सांगून आपला पाय काढून घेतला ! त्यावेळीं उकडत असे कोण ! पहांटे देखील नुसत्या काथ्याच्या बिछायतीवर हुश्श् हुश्श् करीत पडावेंसें वाटे. आणि आठ वाजता तर भर दोन प्रहराप्रमाणें घामाच्या धारा लागत. त्या शाळेंत दयामाया कांहीं नाहीं. 'कॅंटर' म्हटले, कीं, घोड्याला टांचा मारल्याच पाहिजेत. मग तुम्ही किती का दमलां असाना. 'लेट गो रेन्स' म्हटले, कीं, लगाम सोडून दिलाच पाहिजे. 'क्रॉस् स्टिरप्स्' म्हटल्याबरोबर रिकीबींतून पाय काढून त्या घोड्याच्या मानेवर टाकल्याच पाहिजेत; मग तुम्ही कोलमंडून पडलां तरी हरकत नाही. शिकावयाला लागून दोन-तीन दिवस झाले नाहींत. तोंच ही सर्कस आम्हांला करावी लागली ! अर्थात् सर्वानाच ती सारखी मानवली नाहीं. सर्वांगाला ठणका लागे, रग लागे, कित्येकदां घेरी येऊन वांतीची भावना होण्याइतके श्रम होत, पण तेथे ब्र काढण्याची सोय नसे. ब्रीचीस् घांसून घांसून फाटल्या, अंगाचे सालडे निघाले ! बरें, घोड्यावरून पडल्यानंतर तरी सुटका आहे का ? छे: ! नावडतीच तसेंचें तसें उठून पुनः स्वार झाले पाहिजे. नाहींतर चांगलाच दम भरला जात असे ! एका आठवड्यांत, छातीवर हाताचे स्वस्तिक करून रिकिब्या सोडून, लगाम टाकून, घोड्याला मुद्दाम केलेल्या खांचीवरून व दोन अडीच फूट उंचीच्या आडव्या दांड्यावरून उड्या घेत न्यावयाची ( Hurdles ) प्रॅक्टिस् दिली. अर्थात् या सर्कशींत घोड्याऐवजीं स्वारच मनांत नसतां पटापट उड्या घेऊं लागले ! आमची स्वारीहि दोन वेळां कोलमंडून खाली आली, पण दोन दिडक्याच्या लतकोडग्याप्रमाणें पट्दिशीं चलाखीनें उठून पुनः स्वार झाल्यामुळें तालमींतून आमची तीनच फेऱ्यांत सुटका झाली, व नंतर प्रेक्षकांत बसून इतर सर्कसवाल्यांची गम्मत पहावयास सांपडली. मग घरीं जाऊन पहातों तों खांद्याला बरीच मोठी जखम झालेली आढळली. लष्करांत एक मोठें सर्वमान्य तत्त्व आहे. 'मला कणकण आली आहे,' 'आज कसेंसेंच होत आहे,' 'मला अम्मल बरें नाहीं,' किंवा 'मी दमलों आहे' अशी सबब कोणींहि ऐकून घेणार नाहीं. आजारी असाल तर 'सिक् रिपोर्ट' करा. नसाल तर आपलें काम करा ! यामुळें थोडेंसें डोके दुखणें, अंग मोडून येणें, कसेंसेंच होणें, या स्थितीचें अस्तित्व लष्करांत मानले जात नाहीं. हें डॉक्टरला कळावयाला कठीण व रोग्याला तर असें होतें. तेव्हां सैन्यांतील लोकांनीं एक मोठा

निश्चय केला पाहिजे, तो हा, कीं, मडकून काम करण्याइतकें सशक्त तरी रहावें, नाहीं तर चक्क न्युमोनिआनें फणफणून तरी पडावें ! 'कमेसेंच' वाटण्याची लष्करांत सक्त मनाई आहे.

## शिस्त

पहावयाची तर सैन्यांत पहावी. शिस्तीचें सैन्यांतील लोकांना एक प्रकारचें बाळकडूच पाजलेले असतें. तें दोन दिवस शिकून येत नाहीं. शिस्त अंगीं मुरण्याला पिढ्यान्‌पिढ्या वळण असावें लागतें. गोरे व नीग्रो यांच्यांत हा भेद ठळक रीतीनें दिसून येतो. शिस्त हाडींमासीं खिळली पाहिजे. एका वेळेस दहा शेर दूध झोंकून व पांचशें जोर काढून ज्याप्रमाणे बाबू हमजीखान बनत नाहीं तसेंच हें आहे.

## डॉक्टरी

लष्करांत भरती होण्यापूर्वी 'डॉक्टरी' करितेवेळीं, म्हणजे मेडिकल एक्झॅमिनेशनच्या वेळीं रिक्रूटाला व्यंग अगर रोग असला तरी तें व्यंग अगर



फील्ड हॉस्पिटलचे तंबू, पेशावर

रोग लपविण्याचा त्याचा म्हणजे रिक्रूटाचा प्रयत्न असतो. पण पक्की भरती होऊन एकदां का त्याला लष्करांतील 'इंगा' समजला, कीं, नसत्या रोगाचें सोंग त्याला घ्यावेंसें वाटूं लागतें ! आतां डॉक्टरांना याच्या उलट संवय असते. भरतीकरितां रिक्रूट तपासावयाला आणला तर, रिक्रूटाला कांहीं होत नसलें तरी शक्य तितकी बारीक छाननी करून त्यांत खोड काढण्याकडे डॉक्टरची प्रवृत्ति

असतं. तेंच, रिक्रूटाची एकदां भरती होऊन तो खरा आजारी पडून आला किंवा कांहीं कारणानें समजा, त्याच्या कोंपराचा सांधा ताठ झाला तरी त्याला 'फिट्' म्हणजे 'कामाला लायक' करण्यास डॉक्टर पहात असतो! मग अर्थात् डॉक्टर व रोगी यांची एक प्रकारची शर्यत लागते. काम टाळण्याकरिता शिपाई खोटा आजारी पडतो व डॉक्टर त्याचा खोटेपणा ओळखण्याच्या युक्त्या काढूं लागतो. काहीं शिपाई बंदुकीच्या काडतुसांतील कॉर्डाइट खाऊन छातींत धडधडण्याचा विकार करून घेतात. या पावडरनें थोडा तापहि येतो. ज्यांना कांहीं केल्या ताप येत नाहीं ते 'काल रात्रीं' ताप आल्याचें सांगतात. कोणी एक प्रकारचा तांबडा रंग घालून आंव झाल्याची बनावणी करतात, किंवा हिरडी कुरतडून निघालेले रक्त थुंकतात व नाक शिंकरून त्यांत टाकतात. कोणी मिरचीची पूड अगर चिमेड नांवाच्या बिया डोळ्यांत घालून डोळे आणतात. कोणी वेड लागल्याची बनावणी करतात, तर एखादा धाडसी शिपाई प्रत्यक्ष आपल्याच पायांत आपणच चोरून बंदुक झाडून जखम करून घेतो! एकानें मुका व बहिरा झाल्याचे सोंग आणले होते! कांहीं प्रसंगीं एखाद्याची रात्रभर दाढ ठणकते दिवसा बरी असते. पोटदुखीची सबब बरीच गुणकारक आहे: कारण तिचे बाहेर दृश्य चिन्ह रोगी दाखवील तेवढेंच असते-म्हणजे गडबडा धरणीवर लोळणें वगैरे. मिलिटरींतील लढवय्ये ऑफिसर डॉक्टरला रोगाच्या बाबतींत सर्वज्ञ समजतात. मेल्याबद्दलचें सर्टिफिकीट जसें त्याला देता आलें पाहिजे तसेंच एखादा मनुष्य चालून चालून खराच दमला आहे, कीं, गाडींत बसायला सांपडावें म्हणून दमल्याचें सोंग आणीत आहे याचीहि परीक्षा त्याला झाली पाहिजे! डॉक्टरांनाहि मग यंत्र-मंत्र-तंत्र करावें लागतें. यामुळें कित्येकदां असें होतें, कीं, लुच्चा कामचुकारू शिपाई 'सिक लिस्टांत' पडून मजा मारतो तर सच्चा आजारी कामावर खडतो! याविषयींची एक खेदजनक गोष्ट मला कर्नलनें सांगितली. एका रोग्याला तपासण्यासाठीं डॉक्टरकडे पाठविले होते. पण डॉक्टरला हा लुच्चेगिरी करीत आहे असें वाटून त्यानें त्याला 'फिट्' म्हणून कामावर परत पाठविलें. पण आपल्याच्यानें काम होत नाहीं असें त्या रोग्यानें निक्षून सांगितल्यावरून पुनः त्याला डॉक्टरकडे पाठविलें. डॉक्टरनें आपले पहिलेंच रोगनिदान कायम करून त्या बिचाऱ्याला पुनः कामावर पाठविलें. पण कामा-

वर पोहोंचण्यापूर्वीच तो मेला! ही मरणाच्या ॲक्टिंगची कमाल, कीं, डॉक्टरच्या शहाणपणाचा कडेलोट!!

मुलकी खात्यांत साधारणपणें असा नियम आहे, कीं, संशयाचा फायदा आरोपीला द्यावा. पण लष्करी खात्यांत तो फिर्यादीला देण्याची वहिवाट आहे! असें केले नाहीं तर गुन्ह्यांचा सुळसुळाट होईल, व या गुन्ह्यांचा तपास करण्यांत लढाई एकीकडेच राहून हातचें राज्य जाण्याची पाळी येईल! दहा खरे गुन्हेगार सुटले तरी हरकत नाही, पण एकाहि निरपराधी मनुष्याला विनाकारण शिक्षा केली जाऊं नये असें मुलकीकडे धोरण आहे, तर लष्करांतला प्रघात असा आहे, कीं, संशय आलेल्या दहा मंडळींना शिक्षा दिली, की, आपोआप खरा गुन्हेगार त्यांत आलाच! त्यामुळें दृष्ट कायम राहते, लोकांच्या मनावर परिणाम होतो व एकंदरीत शिस्त राहून वचक बसतो. बरोबरच आहे. बाकीच्या नऊ लोकांना असें वाटतें, कीं, संशयाबद्दल किंबहुना गुन्हा मुळीच न करण्याबद्दल इतकी शिक्षा, तर करण्याबद्दल किती!

## एक केंविलवाणें दृश्य!

कांहीं प्रसंग असे येतात, कीं, तेथे शिपायाच्याच बऱ्याकरितां कांहीं निष्ठुरपणा करावा लागतो. एक प्रसंग तर मी कधीं विसरणार नाहीं. १९२० च्या अरब बंडांत, आमची ब्रिगेड चारी बाजूंनीं तोडली गेली असल्यामुळें लाखों रुपयांचा माल वगैरे तसाच टाकून आम्ही दिवाणिया गांव सोडून हिला गांवाकडे काढता पाय घेतला होता. ऐन जुलाई म्हणजे भर उन्हाळ्याचे दिवस. पहाटेपासून संध्याकाळपर्यंत अत्यंत तीव्र उन्हाच्या माऱ्यांत पायीं रखडावयाचे. टेलिग्राफच्या खांबाची जी काय सांवली पडेल तेवढीच तेथे छाया! नाही पाणी! अगोदरच चालून चालून व लढाई करून दमलेले शिपाई, त्यांतून त्या दिवशी सकाळीं तर चांगलीच फजीतीची वेळ येऊन गेलेली. दुपारीं दीड-दोन वाजतां आम्हांला मराठा पलटणीतील दोन चार शिपाई वाटेंत पडलेले दृष्टीस पडले. आम्ही रिअर-गार्ड होतों. आम्ही एकदां पुढें निघून गेलो म्हणजे या दमलेल्या शिपायांचे संरक्षण करण्यास फक्त शत्रूची मायाच उरली होती. पण त्याचीहि फारशी आशा नव्हती. कारण हे शिपाई मुसलमान असते तर कदाचित् नशिबाने सुटण्याचा संभव होता. या शिपायांची मुद्रा अत्यंत भेसुर दिसत

असून तोंडें धुळीनें माखलेली व ती धूळ घामांत कालविली गेल्यामुळें चिखलानें बरबटल्यासारखीं झाली होती. त्यांचे धापा टाकणें, खोल गेलेला घोगरट आवाज, शिवाय वय लहान; त्यांना अशा हताश स्थितींत पाहून कींव आली. पण करणार काय! ॲम्ब्युलन्स मोटार तेथें आणणें शक्य नव्हतें, व आणली असती तर राहिलेला सर्व रिअर गार्ड भराभर दमूं लागला असता व कासावीस झाला असता. हे मराठा शिपाई आजारी नव्हते, फक्त जीवापाड मेहनत करून अत्यंत थकले होते. त्याना उठून चालूं लागण्याचा दरडावून हुकूम केला. तेव्हां ते कसे तरी मोठ्या शिकस्तीनें उठले व लळत-लोंबत बंदुक टेकीत चालण्याचा प्रयत्न करूं लागले. पण चालणें, उभे राहणें देखील त्याना दुरापास्त होतें. एखाद्या झिंगलेल्या माणसाप्रमाणें ते इकडेतिकडे कोलमडत आपली बंदुक सावरीत चालण्याची धडपड करीत होते. बंदुकीच्या आधारामुळें ते सांवरले जात, कीं, ते बंदुक सांवरीत, असा प्रश्न पडण्याइतकी स्थिति झाली होती. एखादा जड ओबडधोबड आकाराचा जिन्नस जसा महाप्रयासानें फरफटीत न्यावा, तसें ते आपले शरीर फरफटीत नेत होते. पण लवकरच हेंहि अशक्य झाले, व पुनः ते जमिनीवर अस्ताव्यस्त पडले. साम, दाम, दंड व भेद या चारी मार्गांचा आश्रय करूनहि उपड्या 'घागरीवर पाणी' झालें. त्यांना प्यावयास पाणी दिले पण त्यांचे घसे इतके कोरडे पडले होते, कीं, घोट गिळणें त्यांना अवघड झालें. आम्ही पुढें जाऊं, तुम्ही उगाच मागें पडून शत्रूच्या हातीं सांपडाल असा 'भेद' करून पाहिला. त्यांना सर्व समजत होतें. ते म्हणाले "सगळें खरें, पण आतां उठणें शक्यच नाहीं. तुम्ही पुढें जा, आम्ही व शत्रु पाहून घेऊं. पण, साहेब, शत्रूच्या हातीं लागण्यापेक्षां तुम्हीच आपल्या हातानें गोळी घालून आम्हांला येथल्या येथेंच कां ठार करीत नाहीं?" आमचें मन द्रवलें, पण नाइलाज होता. शेवटीं एकेका शिपायाबरोबर आमच्या पलटणीचा एकेक शिपायी देऊन लळत लोंबत, दादा बाबा करीत, मध्येंच 'सटकावीत,' त्यांना पुढच्या मुक्कामापर्यंत कसेंबसें नेऊन गुदरविलें!

**इंग्रजी शासनपद्धति**

मोठी वाखाणण्यासारखी आहे. विहंगम दृष्टीनें पाहिले तर ही पद्धति पाहून अचंबा वाटल्याखेरीज राहात नाहीं. एखादी पद्धति मुळांत चुकीची असेल, जाचक व त्रासाची असेल, त्यांत व्यक्तिविषयक गाऱ्हाणीं असूं



वायव्य सरहद्दीवरील एक नेहमींचें दृश्य

शकतील, पण एकंदरीनें पाहिले तर मुळीं पद्धतच नमणें व वाईट पद्धत असणें यांत जमीन-अस्मानाचें अंतर आहे. जोन्स व रॉबर्ट साहेब एकाच तंबूंत राहत असले व जोन्सला रॉबर्ट साहेबाच्या 'बेअररला' ( गड्याला ) कांहीं क्षुल्लकहि काम सांगावयाचें असले तरी तो रॉबर्टसाहेबाची आधीं परवानगी घेतो. एकदम तडक बेअररला सांगत नाहीं. ही गोष्ट अगदीं क्षुल्लक आहे, पण यांतहि एक तत्त्व आहे. मुंबईच्या गोदींत जा, दारेसलामला जा, कोठेंहि जा, तेथें आगबोटींच्या प्रवाससंबंधी बंदोबस्त करणारा एक वरिष्ठ ऑफिसर असावयाचाच, व त्याचें कामहि ठरलेलें. स्थलकाल-परिस्थितिमाना-प्रमाणें कांहीं फरक पडतो. पण तत्त्व कायम राखिले जातें. कामाची विभागणी, प्रत्येक कामाला एकेक जबाबदार मनुष्य व देखरेख ही सर्वत्र असावयाचींच. एकदां पेशावर शहरांतून फिरत असतां सहज माझे लक्ष एका तांबड्या ( नांवाच्या ) पाटीकडे गेलें. ती पाटी वाचण्याचें कारणच पडले नाहीं. तो लाल रंग, त्यावरील तीं पांढरीं अक्षरें, तो पाटीचा विशिष्ट आकार, वगैरे उठावावरून मीं ओळखले, कीं, तें पोष्ट ऑफिस असावें; व तें पोष्ट ऑफिस होतें. कोणत्याहि पोस्ट ऑफिसची पाटी पहा नमुना एक. मला वाटले होतें, कीं, साधारण भुसावळ सुटले, कीं सर्वच बदलेल. रेल्वे, तार, पोस्ट सगळीकडे एकच पद्धत व एकच तऱ्हा. ही गोष्ट विचार केल्यास कोणाच्याहि लक्षांत

येईल, पण १५०० मैलावर प्रत्यक्ष तशी पाहिल्यामुळें आश्चर्य वाटलें, दुसरें कांहीं नाहीं. यावरून दुसरी एक गोष्ट आठवते. 'रेड् टेपिझम्'वर इंग्रजसुद्धां तोंडसुख घेतात, पण तसें कांही असल्याशिवाय कारभार सुरळीत चालावयाचा नाहीं. खालचे अधिकारी सैल सुटतील, व गोंधळ उडेल. आतां 'अति तेथं माती' हें मात्र नाकबूल करतां यावयाचें नाहीं. नोकरीवर रुजू होतांना मी सीनिअर मेडिकल ऑफिसरला रिपोर्ट दिला. त्यानें सांगितलें, कीं, आतां दुपारीं ए. डी. एम्. एस्. ला जाऊन रिपोर्ट करा. मी गेलों तों मघांचाच म्हातारा ए. डी. एम्. एस. च्या खुर्चीवर! खरा ए. डी. एम्. एस्. रजेवर असल्यामुळें हा एस्. एम्. ओ. च त्याचे काम पहात होता. तेथील व्हिजिट-बुकांत मीं आपलें नांव घातलें. नंतर त्यानें त्या हुद्याच्या नात्यानें मला कांही प्रश्न विचारले व उपदेश केला. नोकरीवर रुजू झाल्यावर कोणाकोणाला भेटा-वयाचें याची त्यान मला यादी दिली. त्यातील मोठ-मोठीं नांवें पाहून तर मी घाबरूनच गेलों. स्टेशन स्टाफ ऑफिसर, ब्रिगेड कमांडर, जनरल ऑफिसर कमांडिंग पेशावर डिव्हिजन, वगैरे! छोटा जर्नेलसाब, बडा जर्नेल, बडा लाट साहेब (म्हणजे चीफ कमिशनर) अशा तऱ्हेच्या नांवांनीं वरील ऑफिसरांना टमटमवाले ओळखतात. एक गाव सोडून दुसऱ्या स्टेशनमध्यें गेलें म्हणजे देखील अशा भेटी द्याव्या लागतात. भेटी म्हणजे नांवाच्याच भेटी असतात. फक्त व्हिजिटबुकांत नाव लिहिलें, कीं, झालें काम. फॉर्म, फॉर्मेलिटी, एटिकेट, म्हणजे शिष्टाचार, औचित्य वगैरेचें फारच प्रस्थ आहे. त्याचें एक स्वतंत्र शास्त्रच होईल. 'थँक यू,' 'एक्स्क्यूज मी,' 'ऑफुलि सॉरी' वगैरेंचा भयंकर सुळसुळाट आहे. कोणत्या वेळेला कोणता पोशाख, वगैरे सर्व कांहीं नियमबद्ध आहे. जेवावयाला येण्याला उशीर झाला तर खेद प्रदर्शित करावयाचा असतो. निजावयाला जाताना विचारून 'गुड नाइट' केलें पाहिजे. एखाद्यानें भाषण संपविण्यापूर्वी कोणी मध्येंच चुकून बोलला तर त्यानें क्षमा मागितली पाहिजे. हातरुमालांत नाक शिंकरावयाचें पण मग 'एक्स्क्यूज मी' म्हटलें पाहिजे. शिंक अगर ढेंकर येऊन गेली, तर 'आय् ॲम् सॉरी' म्हणा-वयाचें. जाणूनबुजून करावयाच्या गोष्टीला 'एक्स्क्यूज मी' व होऊन गेलेल्या गोष्टीला 'सॉरी' असें म्हणतात! जसें मध्येंच उठून जाणें हे पहिल्याचें उदा-हरण, व दुसऱ्याचें उदाहरण म्हणजे चुकून मिठाचें भांडें लवंडणें. या

फॉर्मेलिटीमुळं जरी पुष्कळ त्रास होतो, तरी त्यामुळें समाजांत वागतांना एक प्रकारची गोडी येते.

पेशावरला पोहोचल्याच्या दुसऱ्या दिवशीं सकाळीं दहा वाजतां जेथें मी उतरलों होतों तेथून बाहेर पडलों. अंगात लोंकरीचा सूट होता तरी थंडीमुळें मी कुडकुडत होतों व दातखिळी वाजत होती. तेथील लोक तर म्हणूं लागले, कीं, ही थंडी तर कांहींच नाहीं. आतां हिवाळ्याचे दिवस संपत आले आहेत ! मी तेथें असतांना (मार्चच्या सुमारास) हवेची सर्वांत कमी उष्णता ४८° असावी. पुष्कळदां 'हार्थ' चीं वर्णनें वाचण्यांत आली असतील, पण या ठिकाणींच तीं प्रथम पहावयास व अनुभवावयास मला मिळालीं.



पेशावरी गुलाब

पेशावरांतील सर्व प्रेक्षणीय स्थळे मीं पाहिली. पंचतीर्थ म्हणून एक स्थान आहे, तेथें नकुल, सहदेव वगैरे पांच कुंडें आहेत. एक आर्टेझिअन विहीरहि पाहिली. ही विहीरीसारखी विहीर आहे, पण तिचें पाणी तुडुंब भरून जाऊन बाहेर सांडत आहे. ( झऱ्याचाच हा एक प्रकार होय. ) झुऑलॉजिकल गार्डन्स चांगले व विस्तीर्ण आहेत. एक म्युझिअम आहे त्यांत कांहीं अंतरावरील लेण्यांतून खणून आणलेले प्राचीन शिल्पकलेचे जिन्नस ठेवले आहेत. त्यांत दोन अडीच



' घंटीघर, ' पेशावर

फूट उंचीचा एक दगडी बुद्ध आहे. त्याचें आसन नेहमींप्रमाणें असून तो तपश्चर्या करीत आहे. त्याला अनुसरून त्याचें शरीर अगदीं कृश झाल्याचें दाखविलें आहे. बरगडीन बरगडी मोजून घ्यावी. पुतळा फारच नामी साधला आहे. जुने दिवे, ब्रासवर्क, नाणीं, इ० स० ९०० व १६०० सालची अरबी हस्तलिखितें, वगैरे येथ आहेत.

**खैबर घाट**

एखादें स्थळ पहाण्यापूर्वी त्याबद्दल आपल्या अतिशयोक्तियुक्त व भलत्याच कल्पना असतात. " खैबर घाट " म्हटलें, कीं, एक प्रकारची भीतिच वाटते.

खैबर घाट म्हणजे एक अत्यंत अवघड व दुस्तर घाट असून तो अति भयंकर आणि भव्य असेल अशी आमची कल्पना होती. ऐतिहासिक व राजकीय दृष्ट्या जरी त्याचे महत्त्व असले तरी दिसावयाला हा घाट निदान अली-मशीदपर्यंत साधारण 'चारचौघांसारखाच' आहे. सिंहगडावर जसें नुसतें कल्पनासुख अनु-भवावयाचें, प्रत्यक्ष पहाण्यालायक सुंदर अगर भव्य तेथें कांहींच नाहीं, तसेंच या खैबर घाटाचें आहे. ज्या खिंडींतून महमद तघलख, गझनीचे बादशहा, तैमुरलंग, जगज्जेता अलेक्झँडर वगैरे महापराक्रमी योध्दे पंजाबांत घुसले, प्रत्यक्ष त्याच खिंडींत उभे असल्यावर साहजिकच नाना तऱ्हेचे विचार मनांत येतात. पण ज्यानें बोरघाट अगर कात्रजचाहि घांट पाहिला असेल त्याला खैबरचें विशेष कांहीच वाटणार नाही. मात्र खैबर घाटांतील रस्ता अतिशय अरुंद, कित्येक ठिकाणीं केवळ एकच गाडी जेमतेम जाण्याइतका आहे व वळणेंहि अवघड आहेत. घाटाची एकंदर लांबी सुमारें वीस मैल आहे. घाटाच्या अलीकडच्या पायथ्याशी पेशावरहून सुमारें नऊ मैलांवर जमरूद नांवाचा (भुईकोट) किल्ला आहे. येथें परवानगीचा पास दाखवून एका बुकांत सही करावी लागते. वाट धोक्याची असल्यामुळें फक्त मंगळवारीं व शुक्रवारींच तिकडे जाऊं देत असत. या दोन दिवशीं हांकेहांकेंच्या अंतरावर सबंध घाटभर पहारेकरी उभे केलेले असत. मालाची ने-आण याच दिवशीं विशेष होई. सर्व माल उंटावरून यावयाचा. उंटांचे तांडे जाण्याची निराळी वाट आहे. विशेषतः मिलिटरीच्या सोयीकरितां आणखी एक चांगला खडीचा रस्ता करण्याचे काम तेव्हां चाललें होते. एक रेल्वे आतां घालीत आहेत असे ऐकतों. (जमरूदपर्यंत तेव्हां रेलवे होतीच.) अकराव्या मैलावर अलिमशीद हा (डोंगरी) किल्ला आहे, तेथे नेहमीं लष्कर असतें. घाटाच्या पलीकडच्या पायथ्याशीं लंडीकोटल म्हणून ब्रिटिशांचें 'आउट पोस्ट' आहे. या घाटांतून आपल्यासारख्यांना पायीं अगर सायकलवरून जाऊं देत नाहींत; टांगा किंवा मोटारच पाहिजे, असें ऐकिलें. अलिमशीदजवळ पुष्कळ अफगाण व बलुची लोक जुन्या तलवारी, भाले, पिस्तुलें, नाणीं वगैरे जिन्नस विकण्याकरितां किंवा अदलाबदल करण्याकरितां घेऊन उभे असतात.

या बाजूला फोटो वगैरे घेण्याची मनाई असेल असा माझा गैरसमज अस-ल्यामुळें मी पेशावरपासून चार मैलांवर जाऊन हळूच लांब दिसणाऱ्या सुलेमान



स्टेशन हॉस्पिटल, पेशावर



फील्ड हॉस्पिटलच्या झोपडींत, पेशावर

पर्वताच्या बर्फाच्छादित शिखराचे फोटो घेतले. आजन्मात अशा तऱ्हेचें बर्फ प्रथमच पाहिलें असल्यामुळें मला मोठें कौतुक वाटलें.

खैबरहून परत येताना वाटेत इस्लामिया कॉलेज पाहिलें. इमारत सुंदर असून विद्यार्थ्यांकरितां बांधलेलीं वसतिगृहें प्रशस्त व विपुल आहेत. पण दुर्दैव, की, तेथें विद्यार्थ्यांची संख्या अत्यंत अल्प आहे. एडवर्ड कॉलेजची अशीच स्थिति आहे, असें तेथील एका बंगाली प्रोफेसरानें सांगितलें. पेशावरहून गालिचे वगैरे आणण्यापेक्षां कांहीं रिकाम्या खोल्या जर तिकडून इकडे आणतां आल्या तर काय बहार होईल !

## आमची कवाईत !

एक महिनाभर आम्हांला ड्रिल शिकविण्यांत आले. प्रत्यक्ष लढाईच्या वेळीं शिपायाच्या हालचाली, ड्रिलमध्यें जसे हुकूम देतात तसे हुकूम देऊन होत नाहींत. तेव्हा वेळ पडेल तसें करावें लागतें. पण ड्रिल शिकून एक तर उत्तम व्यायाम होतो, शिस्त लागते व आपोआप बिनतक्रार हुकूम पाळण्याची संवय होते. प्रथम प्रथम एखाद्या हुकुमाचा (उदाहरणार्थ, ' राइट टर्न, ' ' फॉर्म फोर्स, इत्यादि ) मनांत विचार करावा लागतो, पण संवयीनें आपोआप आर्डर मिळाल्याबरोबर ती कृति न जाणून आपल्या हातून घडते. सैन्याच्या शिस्तीला, तक्रार न करतां अगर कार्यकारणभाव न पहातां, दिलेला हुकूम पाळणें, याची फार आवश्यकता आहे. नाहीं तर प्रत्येक शिपाई जर तर्क-वितर्क करूं लागला-विचार करूं लागला, तर त्याच्या हातून त्वरित कांहींच व्हावयाचें नाहीं. शिपायांमध्यें जर मतभेद झाला तर बेबंदशाही माजून याचें तोंड इकडे तर त्याचें तोंड तिकडे असा प्रकार व्हावयाचा ! सैन्यांत विचार करण्याची सक्त मनाई आहे ! एका पलटणींतील कर्नल, ऑफिसर व शिपायी यांचा विचार जर जमला नाहीं तर पलटणची पलटण डोळे मिटून विचार करण्यांत गढली असतां शत्रूच्या वेढ्यांत आयतीच सांपडावयाची ! कांहीं गोष्टींत कर्नलनें अगर कमांडर-इन्-चीफनें सुद्धां विचार करावयाचा नसतो. तो मक्ता फक्त वॉर-ऑफिसांतील बड्या धेंडांनाच दिला आहे, असें म्हणतात ! रोजरोज सकाळसंध्याकाळ हुकूम ऐकावयाला लावून हुकुमाचे बंदे गुलाम करण्याकरितां परेड करावयाची असते. यामुळें जें मानसिक शिक्षण मिळतें तें खरोखर राष्ट्रीय तसेंच व्यक्तिदृष्ट्या प्रत्येकाला मिळणें अत्यंत जरूर आहे. साधी ड्रिल आणि स्ट्रेचरड्रिल

दोन्ही आमच्याकडून करून घेत. स्ट्रेचरड्रिलमध्यें रोग्याला नेण्याची जी पद्धति शिकविली जाते त्या पद्धतीनें प्रत्यक्ष लढाईत क्वचित्च जखमी शिपाई नेला जातो, हे निराळें; पण यांतहि व्यायाम व शिस्त यांचें तत्त्व भरलेले आहे. खऱ्या लढाईत एवढेंच लक्षांत ठेवावयाचे कीं, कसाबसा एकदाचा जखमी मनुष्य परत आणावयाचा. तेव्हां कोठले आले आहे ' वन् टू ' आणि, ' लिफ्ट स्ट्रेचर ' !

आमची परेड मोठी पहाण्यासारखी होती. साध्या गोष्टी पण पुष्कळांना त्या करणें म्हणजे एक जिवावरचे संकटच वाटे. याचे कारण शारीरिक व मानसिक शैथिल्य. शिस्त किंवा चापल्य कसे ते त्यांना ठाऊकच नव्हते ! त्यामुळें 'अटें-शन् 'चा हुकूम मिळाला असला, तरी कित्येक ऑफिसर निष्काळजीपणाने कोटाची गुंडी नीट करीत बसत अगर भलतीकडेच पहात ! एका ओळींत पळण्याच्या वेळीं तर फारच त्रेधा उडे. एक दोन फूट पुढें, तर दुसरा चार हात डाव्या बाजूला. शेजारच्या कॅंपांतील डोलीवाले, शिपाई वगैरे येऊन या परेडचा फार्स पहात व आपापसात टवाळो करीत ! रोज सकाळीं ७ ते ८ या परेडचा छान व्यायाम होई. पहाणाराला वाटतें, कीं, परेड किंवा घोड्यावर बसणें यांत कसला व्यायाम ? पण परेडने उत्तमपैकी व्यायाम घडतो व घोड्यावर बसण्याने तर बोलावयालाच नको.

## आमचा मेस



आमचा बंगला

आम्ही पांचसहा जण मिळून एकाच बंगल्यांत रहात होतों, व एकाच क्लबांत एकत्र जेवीत होतों. सबंध बंग-ल्याचे भाडें पन्नास रुपये होतें. शिवाय माळी, भिस्ती, चौकीदार वगैरे मिळून चाळीस रुपये वांटून घेत

होतो. जेवणाचा खर्च सुमारें सत्तर रुपये येई. शिवाय फर्निचर वगैरे मिळून राहण्याचा व जेवणाचा एकंदर खर्च शंभरांच्या घरांत जाई. प्रत्येकाला एक गडी ( बेअरर ) असे, त्याचा पगार वीस रुपये.

कांहीं दिवस आम्हांला जनावरांच्या रोगांबद्दल वगैरे पाठ देण्यांत आले. मिलिटरींत मनुष्यानें हरकाम्या असावें लागतें. प्रत्येक विषयाला तज्ज्ञ असतातच, पण प्रत्येकाला सगळयांतले थोडथोडें शिकविण्याची काळजीपूर्वक सोय करतात.

## कोर्ट मार्शल

लष्करांत शिरावयाचें व तेंहि एकदम पेशावरसारख्या लांबच्या व सरहद्दीवरच्या ठिकाणीं, म्हणजे एक प्रकारची गंभीर भीति वाटते. कित्येकांची अशी कल्पना असते, कीं, सैन्यांत थोडेंसें चुकलें अगर गुन्हा घडला तरी खाडदिशी 'कोर्टमार्शल' व्हावयाचीं; व एकदां कोर्ट मार्शल झाली, कीं, फांशीच्या शिक्षेशिवाय बात नाहीं ! सोल्जरकडे बोट दाखवूं नये, नाहीं तर तो बोट कापून घेतो अशी आमची लहानपणीं समजूत करून दिली होती ! तार इतक्या लवकर दुसऱ्या गांवीं जाते कशी, तर तारेच्या पिवळया किंवा तांबड्या लिफाफ्याला जी एक बारीक वाटोळी कडी बसविलेली असते ती टेलिग्राफच्या खांबावरील तारेंत अडकवून तो लिफाफा जोरानें ढकलावयाचा म्हणजे तो भर्रदिशी सरकत सरकत त्या तारेवरून दुसऱ्या गांवीं पोहोंचतो, असाहि लहानपणीं तर्क होई. अद्याप कांहीं लोकांचा असा भ्रम आहे, कीं, लढाईत एकाद्या माणसाला गोळी लागली, कीं, तो ठार झालाच म्हणून समजावें !

मिलिटरींत जितकी शिस्त तितकीच अंदाधुंदीहि असते ! 'फोर्थ-वुइथ्' या इंग्रजी शब्दाचा अर्थ कोश उघडून पहातां 'ताबडतोब' 'त्याच पावलीं' असा निघेल. पण मिलिटरींत 'रिपोर्ट फोर्थ-वुईथ्' असा हुकूम आल्यावर साधारण स्थलकालमानाप्रमाणें तीनचार दिवसांपासून एका आठवड्याच्या आंतबाहेर रिपोर्ट केला तरी फोर्थवुइथच मानतात ! इतर खात्यांप्रमाणें सैन्यांतहि पुष्कळदां कामाचा व्यर्थ घोळ अगर गोंधळ घालण्यांत येतो. 'प्रॉपर चॅनल' म्हणजे योग्य मार्गाचें बंड फार. विशेषतः फील्डसर्व्हिसवर कामाची जबाबदारी एकमेकांवर पडल्यामुळें नसत्या भानगडी उपस्थित होतात. कायद्याच्या, नियमांच्या

दृष्टीनें कामाची पद्धत पूर्ण व पक्क असते, पण फील्डसर्व्हिससारख्या धामधुमीच्या ठिकाणीं रोजच्या व्यवहाराला ती त्रासाची व अव्यवहार्य ठरते.

**माझें भविष्य !**

फील्डसर्व्हिसवर जाण्याकरितां मी धडपडत होतों. दुसऱ्या कोणाच्या बदली



डूसर्स व मी, पेशावर

मेसोपॉट वगैरेकडे जाण्याकरितां पुष्कळ खटपट केली. पण इतक्या नवख्या ऑफिसरला सहसा फील्डसर्व्हिसवर पाठवीत नाहींत. त्याला मिलिटरीची साधारण माहिती होऊन तो मुरांब्याप्रमाणें थोडा मुरला म्हणजे मग धाडतात. निराळें बिऱ्हाड करण्यापूर्वी सुनेला जसें कांहीं दिवस तरी सासूच्या हाताखालीं वळण घ्यावें लागतें, तसेंच हें ! हिंदुस्तानच्या बाहेर पडण्याकरितां, सर्व्हिसवर जाऊन लढाई पहाण्याकरितां—कदाचित् गोळी लागून मरण्याकरितां मी आधींच प्राण टाकीत होतों ! पण

कांहींच चिन्ह दिसेना. एकदां एक हिंदुस्तानी ज्योतिषी आमच्या बंगल्यांत आला. त्याच्याजवळ मोठमोठ्या मिलिटरी ऑफिसर्सचीं उत्तमोत्तम सर्टिफिकिटें होतीं. त्याचाच सल्ला घेण्याचें मी ठरविलें! गणित, ज्योतिष आणि हस्तरेषा व अनुमान-धपका यांच्या साहाय्यानें त्यानें सांगितलेल्या बऱ्याच गोष्टी मला पटल्या. कांहीं अगदीं तंतोतंत खऱ्या होत्या. त्या घटकेला माझ्या मनांत प्रबलपणें वावरणारी इच्छा कोणती आहे हेंहि त्यानें बरोबर सांगितलें,—इतकें बरोबर, कीं, त्यानें काय युक्ति केली असावी,—मी इतके डोळ्यांत तेल घालून पहात असतां,—याचें मला अद्याप आश्चर्य वाटतें. माझ्या हाताचा झोंक अगर वळण त्याला दिसणार नाहीं अशी पूर्ण खबरदारी घेऊन मीं एका चिठ्ठीवर पुढीलप्रमाणें माझ्या मनांतील विचार लिहिला. "I wish to go abroad" व ती चिठ्ठी मी लपवून ठेवली. हा वेळपर्यंत ज्योतिषीबुवा तोंड फिरवून बसले होते, व त्यांच्याजवळ आरसा नव्हता अशी मीं खात्री करून घेतली होती. नंतर गणित वगैरे करून त्यानें एका कागदावर अक्षरें काढली तीं अशीं— "IW ISH T OGO ABROAD!" नंतर एका कागदावर १ असा आंकडा काढून तो म्हणाला. "या महिन्यांत तुमचा जन्म आहे. वाचा पाहूं काय आंकडा आहे?" मीं म्हटलें, "हा मराठी १ चा आंकडा आहे." पण तो म्हणाला, "तुम्ही चुकला." व चटकन् कागद फिरवून त्यानें माझ्याकडे टाकला. तों इंग्रजी सहाचा आंकडा ( 6 ) झाला! फिरून चुकलें! मग ती उभी रेघ जरा वाढवून त्यानें त्याचें इंग्रजी नऊ ( 9 ) केलें व कागद पुनः उलटला! तो महिना खरा ठरला! शेवटीं तुमचें लग्न अमुक वर्षीं अमक्या महिन्यांत अमुक तारखेला होईल असें भविष्य करून तें खरें ठरल्यास वीस रुपयांचें बक्षिस स्वतःच ठरवून घेऊन ज्योतिषीबुवा दुसरीं लग्नें ठरवावयास निघून गेले. मला जलपर्यटनाचा योग एप्रिलमध्यें आहे असें त्यांनीं सांगून ठेविलें होतें. पण लढाईच्या गडबडींत आकाशांतील तारे विस्कळीत झाले असल्यामुळें म्हणा, अगर कशामुळें म्हणा, तो योग पुढें दोन महिन्यांनीं घडून आला.

## फील्ड सर्व्हिसचा हुकूम!

एका सीनिअर ऑफिसरवर आफ्रिकेंत जाण्याची पाळी आली. ही बातमी समजल्यापासून त्याचें तोंड घड्याळाच्या फुटक्या कांचेप्रमाणें झालें. सहज

बोलणें निघाल्यावरून तो म्हणाला, "जातोस का तूं माझ्या जागीं ?" मला तेंच पाहिजे होतें. लागलीच त्यानें जाऊन ए. डी. एम्. एस्. ला माझें नांव सुचविलें, व मला आफ्रिकेंत जाण्याची आर्डर येतांच मूठभर मांस चढल्यासारखें झालें ! मला एकीकडून ब्रह्मानंद होत होता तर हिंदुस्तान सोडावयाचें म्हणून एकीकडून वाईट वाटत होतें. ती मनःस्थिति विलक्षण होती. कोणाला माहीत आपण सुखरूप परत येतों, कीं, तेथेंच गाढले जातो ! कांहीं सुचेनासें झालें. पण त्या वेळीं काम बरेंच असल्यामुळें अधिक वाईट वाटून घेण्यास वेळच नव्हता. फील्डसर्व्हिसची कांहींच कल्पना नसल्यामुळें बरे वाईट विचार मनांत येऊं लागले, पण जाण्याची तर उत्कंठा लागून राहिली. जितके हाल जास्त, जितक्या अधिक गैरसोयी, तितकी मला मजा वाटे ! नाहीं तर सर्वच गोष्टी सुरळीत चालल्या तर त्यांत काय गोडी ? ती कसली लढाई आणि कुठली मिलिटरी सर्व्हिस ? मग घरींच, हिंदुस्तानांतच राहावें आणि युनिफॉर्म घालून रस्त्यांतून मोटारी उडवाव्या !



कॅंपांतील लंघर ( स्वयंपाक घर ), पेशावर

## साहेब व ब्राह्मण

पेशावरला असतांना एक गोष्ट माझ्या विशेष लक्षांत आली. आपले घर सोडून हजार-बाराशें मैलांवर जाऊन राहणें आपल्याला जितके कष्टाचे, गैरसोयीचें व दुःखाचें वाटतें तितके सहा हजार मैलांवरून येणाऱ्या गोऱ्या लोकांना जाचक अगर त्रासाचे होत नाहीं. याचे कारण असें, कीं, गोरे लोक कोठेंहि जावोत—हॉंगकॉंग, न्यू झीलंड, ईजिप्त, साउथ आफ्रिका—वाटेल तिकडे पृथ्वीच्या पाठीवर गेले तरी त्यांचे जातभाई त्यांना भेटतात. त्यांचा धर्म एक, राहणी एक, परंपरा एक, भाषा एक; सर्वच सारखे असल्यामुळें त्यांच्या लवकर ओळखी होतात व आपल्याच लोकांत गेल्यासारखें त्यांना वाटतें. म्हणून इतका त्रास होत नाहीं, किंवा परकेपणा वाटत नाहीं. त्यांचे क्लब असतात, जिमखाने असतात, सर्व कांहीं घरच्यासारखें असतें. शिवाय त्यांच्यापैकीं बायका व मुलेंहि भेटण्याचा संभव त्यांना अधिक असतो व त्यामुळें मन रमतें. कॅनडांतून एक ऑफिसर बायकामुलें व मेडिकल सर्व्हिसमध्ये तात्पुरतें कमिशन घेऊन पेशावरला आला होता, पण त्याला आमच्यापेक्षां तेथें किती तरी आपलेपणा वाटे! आपण काय, एकदां महाराष्ट्र सोडले, कीं, कोणीकडच्या कोणीकडे वाळींत टाकल्यासारखे होतों. भाषा निराळया, रूढी निराळया, पोषाख निराळे, धर्म निराळे, सर्वच निराळें! एकदां महाराष्ट्र सोडले, कीं, कानपूर काय, रंगून काय, क्वेटा काय आणि आफ्रिका काय, सारखेंच. आपली भाषा बोलणारा—निदान समजणारा मनुष्य भेटणें विरळाच! व अशा दूरच्या ठिकाणीं अनोळखी मनुष्यें आपापसांत मराठी बोलत असतांना ऐकिली तर अशी गम्मत वाटते, कीं, पुसूं नये! एवंच, ब्राह्मण होऊन पेशावरला परक्या लोकांत रहाण्यापेक्षां साहेब होऊन अन्टार्टिकमध्ये आपल्याच मंडळीत रहाणें किती तरी सुखावह!

## फील्ड् सर्व्हिसची पूर्वतयारी

जलपर्यटनापूर्वी शिपायांना जीं दिव्यें सहन करावीं लागतात त्यांपैकीं टोंचून घेणें याला महत्त्व दिले पाहिजे. अगोदर तो फील्ड् सर्व्हिसला जाण्याइतका धट्टाकट्टा व निरोगी आहे कीं नाहीं, हें पहावयाचे. नंतर त्याला देवी काढावयाच्या; विषमज्वर टोंचावयाचा; प्लेगची सांथ असल्यास 'इनॉक्युलेशन' करावयाचें; कॉलरा नसला तरी टोंचावयाचा; व इन्फ्लुएंझा असला तर त्याची

खुषी असल्यास ' फ्ल् ' टोचावयाचा. त्याच्याजवळ नियमाप्रमाणें ठरलेली चीजवस्तु आहे कीं नाहीं ते पहावयाचे. फील्ड्सर्व्हिसला काय काय जिनसा न्यावयाच्या त्याचे कोष्टकच छापलेले आहे. ऑपरेशनवर ऑफिसर्सनी किती पौंड वजनाचे सामान व तें कोणतं घ्यावयाचे याची जी यादी आहे तीन " रिस्ट-वॉच्—२ औंस " व " पुस्तकें २ पौंड " इतका बारीक तपशील दिला आहे ! खासगी मालकीच्या मौल्यवान् जिनसा फील्ड्सर्व्हिसवर होतां-होईतो नेऊं नयेत. मनुष्य ओळखण्याकरितां एक ' आयडेंटिटी डिस्क ' म्हणजे नांव, नंबर व रेजिमेंट कोरलेली एक चकती मनगटावर रिस्टवॉचसारखी बांधतात. ती कांहीं ऑफिसर रुप्याची वगैरे करतात. पण त्यांतील रुप्याच्या आशेनें जर ती कोणी लांबविली ( ऑफिसर मेल्यानंतर ) तर तो ऑफिसर कोण, कुठला कांहींच ओळखावयास मिळत नाही. ( ऐन चकमकींत एखादा मनुष्य मेला तर कित्येकदां तो कोण हें त्याच्या खिशांतील पे-बुकवरून अगर या चकतीवरूनच ओळखावें लागतें. ) उष्ण कटिबंधांत जाताना विशेषतः मच्छरदाणीकडे लक्ष पुरवावें लागतें.

फील्ड्सर्व्हिस टाळण्याकरितां कित्येकजण खोटे आजारी पडतात. पण आफ्रिकेंत जाण्याची मला इतकी उत्कंठा लागली होती, कीं, मी चांगलाच आजारी असतांहि बरा असल्याचें सांग आणिले होतें ! इन्फ्लुएंझा नुकताच इकडे आला होता तेव्हांची ही गोष्ट. पण हा फ्लू असावा असें तेव्हां ओळखले गेले नव्हते. अंगांत उठून उभे रहाण्याचीहि शक्ति नव्हती तरी मी आनंदाने व उत्साहानें निघालों. आतां घर–दार सोडणार म्हणून दुःख, आजारामुळें आलेली म्लानता, मॅनिटरी सेक्शनचा कमांडिंग ऑफिसर असल्यामुळें जबाबदारीची जाणीव आणि आतां काय काय गमती पहावयाला सांपडणार म्हणून औत्सुक्य अशा विचारांच्या गर्दीत मी आपल्या सेक्शनसह आगबोटीवर चढलों.

## आगबोट व मुंबई

राहणीच्या बाबतींत आगबोटीची तुलना मुंबईशीं करितां येईल. जागा लहान आणि त्यांत गडबड ! मुंबईत ज्याप्रमाणें घरांत बसण्यापेक्षां बाहेरच वेळ काढा-वासा वाटतो तसें आगबोटींतहि आपल्या केबिनमध्यें बसण्याऐवजीं डेकवरच सुखाचें असतें. कामाच्या बाबतींत मात्र अगदीं उलट आहे. मुंबईस काम

करावयाला फुरसत नसते तर आगबोटींतील मुख्य उद्योग म्हणजे शक्य तितके उशीरां उठून ब्रेकफास्टच्या घंटेची वाट पहावयाची, नंतर टिफिनच्या घंटेकडे कान लावून बसावयाचें, टिफिन झाल्यावर चारच्या चहाची वाट पहावयाची, व राहिलेला दिवस डिनरच्या घंटेची मार्गप्रतीक्षा करण्यांत घालवावयाचा! आगबोटीवर अगदींच करमणूक नसते असं नाही. नुसते पाहून व ऐकूनच किती तरी गोष्टी शिकण्यासारख्या असतात. शिवाय पिआनो, ग्रामोफोन,



नशिबाशीं खेळ—शिपायांना नेहमींच खेळावा लागतो

डेकवरील लहानसे गमतीचे खेळ, वाचनालय, पत्ते, आगबोट थांबली असल्यास मासे पकडणें, वगैरे करमणुकीची साधनें असतात. बिनतारी तारेने आलेल्या बातम्या नोटीस बोर्डावर टाइपराइट करून लावतात. कोणी गातात, कोणी फिडल वाजवून दाखवितात. एकंदरीत वाटतो तितका कंटाळा मुळीच न येतां

उलट वेळ मजेत जातो. आगगाडीपेक्षां हा प्रवास पुष्कळ बाबतींत शतपटीनें बरा. एक तर महासमुद्रांत ( पावसाळा नसल्यास ) बोट मुळींच हालत नाहीं. आगगाडीच्या पहिल्या वर्गाच्या डब्यांतसुद्धां नीट लिहितां येत नाहीं, धक्के बसतात. पण आगबोटींत बशाने चित्रे काढतां येत असत. आगबोट किंचित् झोंके खात असते, पण त्यामुळें धक्के कधीं बसत नाहींत, अगदीं अलगज चाललेली असते. एंजिनचा धाक् धुक् धाक्–धुक् असा सारखा ताल ऐकूं येत असल्यामुळें व ' ऊंऽऽऽ ' असा पंख्याचा सूर धरला गेल्यामुळें गावयाला फार मदत होते ! संध्याकाळी डेकवरून तोल सांभाळून फिरण्याची फार मजा वाटते. आमची ' पालमकोटा ' आगबोट म्हणजे एक लहानसें जवळजवळ ' कंडेम् ' जुने जहाज होतें. त्याचें टनेज कमी व दिवस पावसाळ्याचे असल्यामुळें ते भयंकर हेलकावे खात होतें. पुष्कळदां टेबलावरचे ग्लास पडतील या भीतीनें हाताने धरून ठेवावे लागत व पेय पदार्थ भांड्यांतून सांडू नये म्हणून मोठ्या कौशल्याने व हस्तचलाखीनें सांवरून धरून, आगबोटीच्या उलट गति त्याला द्यावी लागे. कशाचा तरी आधार घेतल्याखेरीज सरळ उभे राहण्याची मारामार ! मंत्री शिपायांच्या परेडच्या वेळेस तर हंसूं आल्यावांचून रहात नसे. अटेंशनचा हुकूम पण झिंगलेल्या लोकांसारखे ते दिसत, व आमच्या पेशावरच्या ऑफिसराच्या परेडपेक्षां यांची ही ' शन् ' ची पद्धत हास्यास्पद दिसे !

मुंबईच्या गोदींतून बाहेर पडतांना एक मध्यें जोडलेला पूल दोहों बाजूंनी वर उचलून धरतात व पाण्याच्या एका अत्यंत अरुंद बोळांतून आगबोटीला गोदींतून बाहेर पडावे लागतें. आंत येतांना असेंच. किनारा सोडतांना आगबोट एंजिनच्या साहाय्याने एकदम चालवीत नाहींत. प्रथम एक लहानशी स्टीम लॉंच दोरी बांधून त्या आगबोटीला खेंचते आणि आगबोट व धक्का यांमध्यें आगबोट वळण्याइतकें अंतर सुटलें म्हणजे दोरी सोडून देतात व आगबोट स्वतःच्या एंजीनने चालते. या सर्व प्रकाराने खूप करमणूक होते. आगबोटीवर डॉक्टरीचें मोठें स्तोम आहे. पुढच्या बंदरांत उतरेतोंपर्यंत तीनचारदां हा फार्स होतो. मुंबई बंदराच्या बाहेर पडल्यावर वाटेंत एक लहानशी ' बॉय् ' सारखी होडी तरत ठेविली आहे व तीवर एक आपोआप सतत वाजत राहणारी घंटा आहे. जवळ पास कोणी नाहीं आणि जिकडे तिकडे पाणीच पाणी अशा

स्थितींत ही घंटा भुताटकीची नर नव्हे असे वाटते. आमची आगबोट सरासरी ताशी दहाबारा मैल जात होती. चांगली मेल बोट अठ्ठावीस मैल जाते. मुंबई ते झांझीबारमधील अंतर सुमारे २७५० मैल आहे.

झोंपाळ्यावर झोंके घेतल्याने जशी कित्येकांना घेरी येते तर कित्येकांना मजा वाटते, तशीच हेलकाव्यामुळें पुष्कळाना आगबोट लागते, (विशेषतः आगबोटीला चाटून उसळणाऱ्या लाटा पाहून) तर कित्येकांना लागत नाहीं. खूप खाऊन नेहमीं पोट भरलेलें ठेवणे हा काहींच्या मते यावर रामबाण उपाय आहे तर कोणी म्हणतात, की, लंघन करणे उत्तम! आगबोटीवर तसा कांहींच व्यायाम होत नाहीं ही गोष्ट लक्षांत धरली तर इतकी भूक लागते कशी व जेवण तरी जिरते कसे याचें आश्चर्य वाटते.



# २ मी पूर्वआफ्रिकेंत जातों

## झांझीबार

बारा दिवस आणि १२ रात्रीं आगबोट सारखी चालली होती. आम्ही पश्चिमेकडे दिवसेंदिवस जात असल्यामुळे रोज घड्याळ १० मिनिटें मागें सारीत असूं. मुंबई व ईस्ट आफ्रिका येथील घड्याळांत साधारण २। तासांचे अंतर



बाजारपेठ, झांजीबार

आहे. मेसोपॉट व मुंबई यांत जवळजवळ २ तासांचे. मुंबई ते बस्त्रा १८०० मैल होतात. जर्मन ईस्ट आफ्रिकेची राजधानी दारेसलाम या ठिकाणीं आम्हांला उतरावयाचें होतें. वाटेंत झांझीबार बेटाला आमची बोट लागली. उद्यां

सकाळीं झांझीबार लागणार या बातमीनेंच आम्हांस हर्षातिशय झाला, व पहाटे-पासून लांबवर जमीन दिसते कीं काय तें पाहूं लागलों. आसपास जमीन लागेल कीं नाहीं हे ओळखण्याची अशी अटकळ आहे, कीं, 'सी-गल्स' म्हणजे पांढऱ्या खबुतरासारखे पक्षी विशेष उडलेले दिसूं लागले म्हणजे ओळखावें, कीं, जमीन एकदोन दिवसांच्या अंतरावर कोठें तरी आहे. कारण ते पक्षी जमिनी-पासून इतक्या दूर उडून येऊं शकतात. झांझीबार बेटांत एक नामधारी सुलतान आहे, पण खरा कारभार इंग्रजी गव्हर्नरकडे आहे. वस्ती स्वाहिली नांवाच्या निग्रो लोकांची; पण बोहरी, भाटिये वगैरे बरेच मूळचे हिंदुस्तानवासी व्यापारी येथें वर्षानुवर्षें रहात आहेत. मातृभूमीपासून इतक्या लांब 'सातासमुद्रांपलीकडे' कांहीं गुजराथी बायकामुले अनपेक्षित रीतीनें रस्त्यांतून जातांना दिसलेलीं पाहून फार गंमत वाटली. भाटिये, बोहरी हे लोक धाडसी खरे. कोठेंहि जा. हे आपले आम्हांला भेटावयाचे. मेसोपोटेमियांत, जर्मन ईस्ट आफ्रिकेत; पोर्तुगीज ईस्ट आफ्रिकेत तर अगदीं ओसाड एकीकडच्या प्रदेशांतसुद्धां यांचा शिरकाव आहे. कोणी वाणी आहेत, कोणी धान्यवाले, तर कोणी कापडकरी. मोठाल्या शहरीं यांचीं हरतऱ्हेचीं दुकानें आहेत; उदाहरणार्थ—स्टेशनरी, औषधी, केस कापण्याचें, क्युरिओशॉप वगैरे.

झांझीबारजवळ आगबोट येतांच कित्येक निग्रो पोहत पोहत बोटीजवळ आले व 'टूपा टूपा' म्हणजे, टाका—पैसे टाका, असें ओरडूं लागले. मग कोणी अधेली, कोणी रुपया, कोणी पैसा असे डेकवरून टाकूं लागले. नाणी समुद्रांत पडतांच हे निग्रो बुडी मारून तीं पकडीत व तोंडांत धरून वर येत व तीं दाखवीत. चांगलें ४–५ फूट पाण्यांत खोल जाईपर्यंत नाणें वरून दिसत असतें. जितके आपण जास्त उंचीवर तितके ते अधिक खोलपर्यंत दिसते. तासभर यांतच आम्ही व्यग्र होऊन गेलों. झांझीबारला आगबोट थोडावेळ थांबणार असल्यामुळें आम्ही गांवांत सहल करून आलों. बारा दिवस सतत धांवत्या बोटींत बसल्यामुळें आगबोटींतून उतरल्यापासून जवळजवळ दोन तास डोक्यांत एक प्रकारचें भ्रमण होत होतें—एका जागीं उभे असले तरी वाटे, आपण चाललोंच आहों–हलत आहों !

## दारेसलाम

प्रवासाच्या बाराव्या दिवशीं रात्रीं बोट पुनः चालू झाली व १३ व्या दिवशीं सकाळीं दारेसलामच्या बंदरांत आली. बंदरांत एक कोनीग नांवाची जर्मन बोट अर्धवट बुडालेली दिसत होती. असें ऐकिलें, कीं, ब्रिटिशांच्या जहाजांना बंदरांत येण्यास अडथळा व्हावा म्हणून जर्मन लोकांनीं ही बोट मुद्दाम मध्येंच नेऊन बुडविली होती ! आफ्रिकेच्या किनाऱ्याची खूण म्हणजे उंच उंच दिसणारीं नारळाचीं झाडें. वाटेंत एखादी आगबोट भेटली म्हणजे एक उत्सवच असतो. दोन्ही बोटींवरचे लोक मोठमोठ्यानें ओरडतात, कोणी शिंगांतून बोलतात, शिट्या वाजवतात व हातरुमाल उडवितात.



बुडविलेली बोट, दारेसलाम

किनाऱ्यावरून आंत येण्याचा परवानगी-इषारा मिळाल्यावांचून आगबोट बंदरांत जाऊं शकत नाहीं. बंदरांत शिरूं लागल्यापासून एकाहून एक बडे ऑफिसर उतरून घ्यावयाला येऊं लागले. प्रथम पोर्ट हेल्थ ऑफिसर सांथीच्या रोगाची चौकशी करून जातो. नंतर ज्या ज्या खात्यांतील उतारू यावयाचे असतात त्यांचे त्याठिकाणचे मुख्य अधिकारी अगर प्रतिनिधि प्रवेश करतात. कधींकधीं जनरलहि येतो. आफ्रिकेंत उतारूंची ये-जा, वारंट, पास वगैरे सर्व कामे 'मिलिटरी लँडिंग ऑफिसरकडे' सोंपवलेलीं असत. यालाच मुंबईस एम्बार्केशन कमांडंट म्हणत. आमच्या बोटीवर एक नर्सहि होती.

दारेसलाम गांव बरेंच मोठें आहे. गांवांत कांहीं मूळचे कोंकणप्रांतांतील मराठी लोक रहातात. त्यांत कोणी वकील, व व्यापारी आहेत. कांहीं चांगलीं



मी व कांहीं ' बाबू ' लोक, दारेसलाम

पक्कीं बांधलेलीं घरें आहेत. गरीब निग्रो लोकांच्या बहुतकरून झोंपड्याच दिसल्या. अरण्यांत जाऊन झाडें तोडून काठ्या आणावयाच्या, गवत गोळा

करावयाचें व नारळीच्या फडाचें छप्पर बनवून घर उभारावयाचें. गांवाला लागूनच पूर्वीच्या सरकारी ( जर्मन ) इमारती आहेत. कोर्टें, पोलीस कचेरी, वगैरे किनाऱ्याला लागून मोठालीं हपीसें आहेत. इमारती अगदीं अप–टु–डेट आहेत. दगडी बांधकाम, विजेचे दिवे, पंखे वगैरे. यांतील बऱ्याच इमारतींत इंग्रजी ऑफिसें ठेविली होतीं. लष्करांतील रस्ते बेताचे रुंद असून बाजूंनीं झाडें लावलीं आहेत. मागल्या बाजूस राहण्याचीं घरें आहेत. येथें त्यावेळीं जर्मन बायकामुलें, उपाध्ये वगैरे लोक रहात होते. एखादी मोटार दिसली, कीं, 'मला थोडें फिरवून आण' असें मोडक्या इंग्रजींत म्हणून तीं मुलें ड्रायव्हरच्या मागे लागत. माझ्या सायकलच्या मागील पिन्वरून एकदां गमतीनें मीं एकाला नेलें. ऑफिसरांकरितां येथें अशी सोय केली होती, कीं, कांहीं भाड्याच्या मोटारी ठेविल्या होत्या. व त्यावर 'एंगेज्ड' व 'फॉर हायर' अशा पाट्या लावल्या होत्या. एखादी 'फॉर हायर' मोटार दिसली कीं ती थांबवावी व जेथें आपल्याला जावयाचें असेल तेथें जाऊन मोटरवाल्याच्या पुस्तकावर तसें



लिहून सही करावी. आपण पैसे वगैरे कांहीं द्यावयाचे नाहींत. ते मग सरकार एकदम हिशोब करून देई. अर्थात् फक्त सरकारी कामाकरितांच या सवलतीचा फायदा घेण्याची परवानगी असे. तेथील रहिवाश्यांचें सर्वमान्य वाहन म्हणजे रिक्शा. त्यांत बसलें म्हणजे पहिल्यानें पाडतील कीं काय अशी भीति वाटते ! दारेसलामला मोठाले निग्रो व्यापारीहि आहेत. दारेसलामहून अंतर्भागांत तीन–

एकशें (?) मैल नॅरो गेजची रेलवे काढली आहे. या रेलवेवर एक एस्. एम्. आर.चें एंजिन पाहून फार कौतुक वाटलें.

निग्रोंची राहणी आपल्या कल्पनेप्रमाणेंच असते. लष्करांत जे निग्रो मजूर म्हणून घेतले होते त्यांचें मुख्य खाणें म्हणजे खजूर, भात, गूळ व थोडें मांस. खजूर मुद्दाम मेसोपोटेमिआंतून आणीत.

## स्वाहिली भाषा

अत्यंत सोपी वाटली. आमच्या सेक्शनमध्यें दीडदोनशें निग्रो मजूर दिले असल्यामुळें मला पहिल्यानें थोडा त्रास झाला. पण लवकरच ती भाषा मीं उचलली; इतकी, कीं, त्या भाषेत मला सटकावतां येऊ लागलें. (रागे भरतां येणें ही भाषाज्ञानाची कसोटी होय!) मीं एक पुस्तक केलें व जसजसे शब्द अगर शब्दसमुच्चय लागत तसतसे ते अकारविल्ह्याप्रमाणें उतरून ठेवूं लागलों. त्या भाषेत, आनंदाची गोष्ट ही, कीं, नियमबद्ध व्याकरण नाहीं. कित्येक वेळां भूत; भविष्य आणि वर्तमान-काळ यांचे प्रयोग सारखेच असतात. ही भाषा फक्त बोलण्याची आहे. त्यांत मुळाक्षरें नाहींत. युगान्डा प्रांतांतील बऱ्याच नेटिव्हांना इंग्रजी येतें व ते लोक स्वाहिली भाषा इंग्रजी स्पेलिंग करून लिहितात. पहिल्यापहिल्यानें आमचा व्यवहार खुणांनीं चाले. (माझा गडीहि निग्रोच होता.) व थोडेसें बोलतां येऊं लागल्यावर कसें तरी करून आपला मतलब समजावतां येऊं लागला. (भाषा म्हणजे तरी आपले विचार दुसऱ्यास कळविणें.) तो असा, कीं, ज्या ठिकाणी विस्तवाशीं संबंध असेल त्या त्या ठिकाणीं योजण्याकरतां मी एकच शब्द धरून ठेविला. उदाहरणार्थ, 'आगपेटी आण' म्हणजे 'लेटि मोटो,' 'स्टोव्ह पेटीव,' म्हणजे 'वाशाटा मोटो' (हातानें पंप केल्याची खूण करून.) 'झोंपडीला आग लागली' म्हणजे 'मोटो जुम्बा,' निखाऱ्याला 'मोटो,' कचरा जाळण्याच्या भट्टीला 'मोटो,' उष्मा फार म्हणजे मोटोच! त्यांनाहि तें समजत असे. त्यांच्या भाषेत तरी कांही अंशी असाच प्रकार आहे. पुष्कळशा साधारण सारख्या गुणधर्माच्या वस्तूंना एकच नांव असते. ज्या वस्तूंचा आफ्रिकेंत सुधारणेबरोबर प्रवेश झाला त्या वस्तूंना अर्थात स्वाहिली नांव असणें शक्य नाहीं. जसें ट्रंक, बॅग, तिजोरी, कपाट वगैरे सर्व 'मआला किंवा संदूक' म्हणजे पेटी या नांवाखालीं मोडतात. स्वाहिलींत

हिंदी शब्द आतां पुष्कळच घुसडले गेले आहेत. रोजच्या व्यवहारांतील कांहीं साधे शब्द हिंदी किंवा मराठी प्रतिशब्दाशीं जुळतात. जसें ‘ मामा ’ म्हणजे आई. पोर्तुगीज हद्दींतील नेटिव्ह भाषा स्वाहिलीहून बरीच निराळी असल्यामुळें माझा फार गोंधळ उडे. तेथील लोकहि जास्त जंगली व अडाणी दिसले. शिस्त म्हणजे काय याची त्यांना ओळखहि नाहीं. यामुळें त्यांना वागवून घेणें जड जाई. या भाषेच्या बाबतींत तर एकदां फारच गम्मत झाली. मला एका रोग्याकरितां बर्फ मागवावयाचा होता. म्हणून हरतऱ्हेनें एका निग्रो डोलीवाल्याला सांगून पाहिले. “ इंग्रजींत ‘ आइस ’ म्हणतात तो आण, ” म्हटले. “ पाण्याचा करतात, कधीं आकाशांतून पावसाबरोबर पडतो, आधीं घट्ट असून मग पाण्यासारखा होतो, ” वगैरे निरनिराळ्या रितीनें सांगून पाहिले. पण त्याच्या डोक्यांत प्रकाश म्हणून पडेना. शेवटीं मीं थट्टेनें मराठींत स्वतः-शींच म्हटले “ लेका ! अरे बर्फ माहीत नाहीं तुला ? ” त्याबरोबर खांदे उड-वीत तो म्हणतो, “ आः ! बराफू ? मी मी न जुवो.” म्हणजे, ‘हा हां ! बर्फ होय ! तो मला माहीत आहे. ’

**मोझँबिकजवळ**

दारेसलामला दोनतीन दिवस राहून आम्ही पुनः सॅलॅमिस् आगबोटीवर तिसऱ्या प्रहरीं चढलों, व दुसरे दिवशीं दुपारीं दोन वाजतां आगबोट हलली. वाटेनें लिंडी, पोर्ट अमेलिया, वगैरे बंदरें घेत घेत पोर्तुगीज ईस्ट आफ्रिकेतील लंबो नांवाच्या बंदराला पांच दिवसांनीं लागलों. हें गांव मोझँबिकजवळच आहे. हा सुमारें ५३० मैलांचा प्रवास गमतींत झाला. आगबोट चांगल्यापैकीं होती. कारण तीवर त्यावेळच्या ईस्ट आफ्रिकन एक्स्पिडिशनरी फोर्सचा कमांडर –इन–चीफ होता. लंबो हे नांवाचें बंदर पण त्याला धक्का वगैरे कांहीं नाहीं. प्रथम सॅलॅमिसवरून आम्ही एका ट्रॉलरवर उतरलों. थोडा वेळ त्यांतून जाऊन मग एका लहानशा स्टीम लॅंचमध्यें बसलों. नंतर एका साध्या होडींत, व शेवटीं एका निग्रोच्या खांद्यावर बसून किनारा गांठला! ‘बेस’पासून लांब लांब जाऊं लागलें म्हणजे सुखसोयी कशा कमीकमी होत जातात, याचें या वेळीं मला चांगलेंच प्रत्यंतर आलें. एक पाय डॉकच्या धक्क्यावर ठेवून दुसरा आगबोटीच्या डेकवर टाकण्याची सोय मुंबईस आहे, तेंच दारेसलामला प्रथम एका लॅंचमध्यें उतरावें लागतें; आणि या लंबो गांवीं तर चार वाहनांतरें करावीं लागलीं!

लंबोहून आगगाडीनें पश्चिमेच्या बाजूस २५ एक मैल आम्ही आंत गेलों व 'मोनॅपो' गांवीं उतरलों. ही रेलवे बांधण्याचें काम नवीनच सुरू झाले असून अर्धवट टाकावें लागले होते. त्या वेळीं मोनॅपोपर्यंतच आगगाडी गेली होती. ही पोर्तुगीज रेलवे आहे. या रेलवेत गोव्याकडचे कांहीं खिश्चन लोक स्टेशनमास्तर, गार्ड,



पोर्तुगीज ईस्ट आफ्रिकन रेलवे (लंबो ते मोनॅपो)

वगैरे नेमले आहेत. रेल्वे नॅरो गेजची असून बाजूला तारांचें कंपाउंड वगैरे कांहीं नाहीं; त्यामुळे वाटेंत गुरेढोरें आली, की, गाडी थांबवून तीं हाकलून द्यावीं लागत. गांवापासून तीसएक मैलांवर लढाई चालू होती.

**कांहीं बाजारगप्पा !**

लढाईबद्दल कांहीं खऱ्या-खोट्या अशा बऱ्याच गप्पा चालतात, व अफवा उठतात. आपली स्वतःची मर्दुमकी दाखविण्याकरितां व आपलें कौतुक करून घेण्याकरितां आघाडीवर जाऊन आलेले कित्येक लोक बनावट गोष्टी सांगतात व पराचा कावळा होतो. तर्क-वितर्कांचें रूपांतर होत होत तें कायम केलें जातें व त्या ऐतिहासिक गोष्टी होऊन बसतात ! मोनॅपो गांवीं फील्ड अँब्युलन्सचें हॉस्पिटल होतें. तेथें आघाडीवरून जखमी होऊन अगर आजारी पडून आलेले रोगी येत. त्यांत कित्येक जर्मन कैदी होते. जर्मन कैद्यांची वर्तणूक मोठी मानी पण शिष्टाचारयुक्त दिसली. कोणतीहि माहिती विचारल्यास मात्र ते कानांवर

हात ठेवीत. अशी एक दंतकथा सांगतात, कीं, जर्मन लोक जेव्हां दारेसलाम सोडून दक्षिणेकडे पळाले तेव्हां इंग्रजांचें नुकसान करण्याकरितां त्यांनीं निरनिराळ्या युक्त्या करून ठेविल्या होत्या. त्यांतील एक युक्ति अशी: तिकडे हेलर म्हणून एक नाणे आहे, त्याला मध्ये भोंक पाडलेलें असते. अशीं कांहीं नाणीं एका दोऱ्यांत ओवून दरवाज्याच्या बाहेरच्या बाजूनें अर्धवट दिसतील अशा तऱ्हेनें अडकवून ठेविलीं होतीं. इंग्रजी सैन्य जेव्हां दारेसलाममध्यें घुसलें तेव्हां अर्थात् ती नाण्यांची माळ तशीच लोंबकळत राहिलेली त्यांच्याने पाहवेना. पण नाणीं ओरबडून तोडण्याच्या प्रयत्नांत एकदम बॉंबचा स्फोट होई ! दुसरी अशी गोष्ट ऐकिली, कीं, एका जर्मन ऑफिसरने इंग्लिश जनरलसारखा पोषाख केला व मोटरमधून सप्लाय ( म्हणजे अन्नसामग्री वगैरेंच्या ) ऑफिसांत जाऊन ३०–४० गाड्या सामुग्रीची अर्जंट ऑर्डर दिली व इंग्रजांच्या डोळ्यांदेखत इतका माल त्यांनीं लांबविला ! तसेंच एका इंग्रजी कॅंपांत असाच एक जनरलवेषधारी जर्मन ऑफिसर तपासण्यासाठीं मोठ्या ऐटींत गेला व त्यानें इंग्रजी सैन्याची परेड घेतली. नंतर त्यांना बंदुकीखेरीज धांवतां कसें काय येतें त्याची परीक्षा पहाण्याकरितां त्यांना इकडून तिकडून पळवीत मूळ कॅंपापासून दूरवर नेलें. इतक्यांत तपासणारा जनरल एकदम नाहींसा झाला. इंग्लिश सैन्य परत येऊन पहातें तों काय ?–बंदुकी, काडतुसें, खंजीर ठिकाणावर आहेत कोठें ? तीं केव्हांच जर्मनांनीं पळविलीं होतीं ! कां ? कसा आहे बाजारगप्पांचा मासला ? !

**व्हॉं लेटो**

जर्मन सैन्याचा मुख्य सेनापति व्हॉं लेटो म्हणून होता, तो अतिशय हुषार, कल्पक व चपळ होता. शिपाई, वाहतुकीचीं साधनें, अन्न, हत्यारें वगैरे युद्धसामुग्री बाहेरून–म्हणजे जर्मनीतून वगैरे–येण्याला त्याला मार्ग नव्हता; कारण किनाऱ्याचा कोणताहि भाग त्याच्याकडे राहिला नव्हता. त्याजजवळ वायरलेस असल्यामुळें फक्त कांहीं बातम्या मात्र त्याला मिळत ! पण अशा कचाट्यांत असतां त्यानें चार वर्षें कसा दम काढला असेल तो असो ! त्याबद्दल इंग्रज ऑफिसर्स देखील त्याची फार वाहवा करीत. कपडेसुद्धां त्यांना उरले नव्हते. मग इंग्रज कैद्यांचे, अस्करींचे ( म्हणजे निग्रो सैनिकांचे ) कपडेच जर्मन लोक वापरीत. यामुळें हे इंग्रजांच्या बाजूचे कीं जर्मनीच्या बाजूचे हें देखील ओळखूं येत

नसे. व्हॉन् लेटोचे बूटहि फाटून गेले होते, इतकी बारीक बातमी लागली होती. एका हातानें बिस्किट खात खात तो प्रसंगीं अनवाणी चाले असें सांगत! आफ्रिकेंत घोड्यांना 'सर्रा' या नांवाचा भयंकर सांथीचा रोग होतो, म्हणून तिकडे घोडे वगैरे इंग्रजांनींहि नेले नव्हते. सर्व वाहतुक मोटर-लॉरीज व निग्रोंचीं डोकीं व खांदे यांवर चाले. ते लोकहि मोठे राकट व शक्तिवान्.



युफ्रेटिसवरील तरता पूल

तेथील धुळींत आणि त्रासांत नुसते १०-१२ मैल चालणें म्हणजेच नाकीं नव येत. पण हे निग्रो मजूर ट्रंका, वळकट्या, पेट्या वगैरे जड पदार्थ डोक्यावर घेऊन सहज मार्ग आक्रमीत. जर्मन लोक रोगी व जखमी झालेल्यांना कसे वाहवून नेत कोण जाणे! व्हॉन् लेटोची अशी युक्ति होती म्हणे, कीं, ५-५० लोक शत्रूंना गुंतवण्याकरितां मागें ठेवून आपण बाकीच्या सैन्यासह पुढे कूच करावयाचें. इंग्रजांना वाटावें, कीं, हेंच व्हॉन् लेटोचें सैन्य व आतां आपण त्याला पकडल्याशिवाय सोडीत नाहीं! पण पहातात तों काय? अशा प्रकारें लपंडाव खेळत, युद्धसामुग्रीच्या अभावी त्यानें पांच सातशें मैल इंग्रजांना

पाठलाग करावयास लावून आर्मिस्टिस होईपर्यंत घुमविले. अखेर युद्धतहकुबी झाल्यानंतर त्याला वायरलेसने तसा निरोप पाठविण्यांत आला व एका इंग्रजी जनरलची त्याकडे रवानगी करून त्याला दारेसलामला आणला. नंतर बाकीच्या जर्मन सैनिकांसह त्याला स्वदेशीं रवाना केले. ही व्यक्ति दारेसलामला होती तेव्हां आम्हीं ओझरती पाहिली. रुहोमा नांवाची एक मोठी नदी जर्मन व पोर्तुगीज ईस्ट आफ्रिकेच्या सरहद्दीवर आहे. एका रात्रींत इंग्रजांच्या नकळत तो ती केव्हां तरून गेला हे त्याच्या पाठीशींच तळ देऊन बसलेल्या इंग्रजांना समजले सुद्धां नाहीं म्हणे! ते सकाळीं उठून डोळे चोळून पहातात तों व्हॉ लेटो ५-१० मैल नदीपलीकडे गेलेला, असे त्यांना आढळून आले! इंग्रजांचें खटलेंच निराळें. सर्व अगदीं नियमित व पद्धतशीर असावयाचें. नदीवर एक तात्पुरता पूल टाकून इंग्रजी सैन्य पलीकडे जाईपर्यंत व्हॉ लेटो कोणीकडच्या कोणीकडे निघून गेला होता! जर्मन लोक इतके कल्पक, कीं, औषधे संपली तीं वनस्पतीपासून ते काढूं लागले. बॅंडेजीस, कापूस वगैरे झाडांच्या सालीचीं तयार करूं लागले. वल्कला-पासून गॉज बनूं लागली! तिकडे साधारण रताळ्यासारखे एक प्रकारचे मूळ जमिनींत उगवतें. चवहि रताळ्यासारखी असते, त्याला 'किआझी म्हणतात. हेंच त्यांचे मुख्य खाणें बनले! वाटेने रिक्रूटभरतीहि होतच होती. व्हॉन् लेटो सांगूं लागला, कीं, "पहा आतां इंग्रजांची पिच्छेहाट होणार आहे. मी चाललों परत आपल्या राजधानींत, दारेसलामला. पुनः माझे राज्य झाल्यावर पाहीन तुमची गम्मत!" असाहि तो धाक घाली, असे ऐकले.

**'लग्नाचा बाजार'**

विशेषतः या प्रांतांत बायका आणि लग्न यासंबंधीं एक अत्यन्त चमत्कारिक व विलक्षण प्रकार आढळला. हिंदुस्तानांत जशा 'नेटिव्ह' शिपायांच्या पलटणी आहेत तशा येथेहि नेटिव्ह म्हणजे निग्रो लोकांच्या पलटणी भरल्या आहेत. त्यांना किंग्ज् आफ्रिकन रायफल्स् अशी संज्ञा आहे. हे लोक जरी धाटगण व जंगली असतात तरी लढाईच्या कामीं फार भित्रे आहेत, असे ऐकलें. फील्डसर्व्हिसवर किंवा ऑपरेशनवरहि या शिपायांना आपल्या बायका बरोबर नेण्याची सवलत ठेवली आहे. शिवाय बोजा वाहण्याकडेहि त्यांचा फुकटांत उपयोग करून घेतां येतो! एकादीचें मूल असल्यास ते पाठकुळीं बांधून इतर सामान डोक्यावर घेऊन ती पलटणीबरोबर 'मार्च' करते. पुढें पलटण आणि

मागें झनाना अशी ही मिरवणूक निघते. कॅपांत मुक्कामाला उतरलें, कीं बायकांकरितां जरा बाजूला निराळा कॅप करतात. आमच्या सॅनिटरी सेक्शनमधील मजुरांच्या बायकामुलांकरितांहि एका निराळया कंपाउंडांत "खास औरतनुं



माझा निग्रो नोकर व त्याची बिबी.

माटे" कॅंप करून दिला होता. आतां समजा, एकाद्या ठिकाणाहून दुसऱ्या पोष्टकडे कूच करण्याचा पलटणीला हुकूम मिळाला व एखाद्या बायकोच्या मनांत जावयाचे नसले, तर ती तो नवरा सोडून तेथेच रहाते व मग दुसरा एखादा नवरा पहाते. तो पसंत पडला नाहीं अगर तोहि पोष्ट सोडून जाऊं लागला तर तोहि टाकते आणि तिसरें स्थळ शोधते. बरें, तेवढ्यांत पहिला नवरा माघारी आला तर तिसऱ्या नवऱ्याशीं काडी मोडून वाटल्यास पहिल्याचीच माघारीण बनते. एखाद्या साध्वीच्या मनांत दुसऱ्या गांवीं जाण्याचें आलें तर ती स्थानिक पतीचा त्याग करून त्या गांवाला जाणारा एखादा पति गांठते,

अगर त्या गांवीं जाऊन तेथें लग्न करते. नवऱ्यांनाहि वरील सर्व हक्क आहेत. त्याला दुसरी स्त्री आवडली तर पहिलीला टाकायला त्याला वेळ लागत नाहीं. लग्नाची ठरवाठरव होऊन सुपारी देण्याचा प्रकार मी एकदां प्रत्यक्ष पाहिला तो साधारण असाः—स्थळ, कॅंपाच्या बाजूचा रस्ता. एक अस्कॅरी ( शिपाई ) आपला पट्टा साफ करीत आहे. तिकडून एक बिबी प्रवेश करते. अस्कॅरी डोळे मिचकावतो. इतर शिपाई थट्टा करतात. पट्टा तसाच टाकून अस्कॅरी रस्त्यावर येतो, व " जाम्बो " म्हणजे ' नमस्कार ' म्हणतो. तीहि " जाम्बो अलिघानी " म्हणजे ' नमस्कार; कसे काय ? ' असे प्रत्युत्तर देते. अस्कॅरीः " मझूरी " ( ठीक आहे. ) " राहतेस का माझ्या घरी ? " बिबीः " काय देशील ? " अस्कॅरीः " पांच रुपये. शिवाय सिगारेट. " बिबीः " एक किटाम्बा देत असशील तर राहीन बापडी ! " अस्कॅरीः " बरं, चल, ये. "

किटाम्बा म्हणजे लुगडें, म्हणजे कमरेभोंवतीं दीड दोन वेढे गुंडाळतां येईल इतक्या लांबीचा व छातीपासून गुडघे झांकतील इतक्या रुंदीचा चिटासारखा रंगीबेरंगी नक्षी काढलेला कापडाचा तुकडा. याला २ पासून ५–७ रुपये पडत.

याप्रमाणें हुंडा, मानपान वगैरे ठरून तीं नवरा बायको होत. अर्थात् यामुळें आठवड्यांतून २–३ वेळां बायको पळविल्याबद्दलचे खटले आमच्या पुढें येत. " काय हो, या वाड्यांत एखादा नवरा मुलगा आहे का ? " या भाषाप्रचारांत व " राहतेस का माझ्या घरी ? " या प्रकारांत फारसा भेद दिसत नाही ! अमेरिकेसारख्या सुधारलेल्या देशांत अशाच तऱ्हेचीं कंत्राटी लग्नें होत असल्याचें ऐकल्यामुळें आमच्या स्वाहिली बांधवांस हंसावें कीं कसें याचा आम्हांला घोटाळाच पडला !

## साहेब आणि ' नेटिव्ह '

इंग्रजांचा मुख्य सेनापति व्हॅन् डि व्हेंटर हा जातीचा डच. दक्षिणआफ्रिकेंतील बरेंच मनुष्यबळ व सामुग्री या ठिकाणीं आणली होती. येथील डच लोक एकंदरींत धटिंगण व कमी संस्कृतीचे दिसले, तरी त्यांचे सार्जंट वगैरे आम्हांला मान देत असत तितका ब्रिटिश सार्जंट देत नसत. याचें कारण हिंदु लोकांशीं त्यांचा फारसा संबंध न आल्यामुळें त्यांच्याबद्दल त्यांना आदर होता. हिंदु लोकांना तुच्छतेनें व कस्पटाप्रमाणें लेखण्याचें–' पायींची वहाण पायींच'

ठेवण्याच्या प्रयत्नाचें अँग्लो-इंडियनांना जसें बाळकडू पाजलें जातें म्हणतात तसें त्यांना पाजलें गेलें नसेल !

हिंदुस्तानांत कांहीं दिवस राहून ‘ शिकलेला ’ व निर्ढावलेला, हिंदूंचीं बिंगें जाणणारा जुना साहेब व नुकताच विलायतेहून आलेला अननुभविक साहेब या दोघांचें हिंदूंशीं जें वर्तन असतें त्यांत फार फरक आहे. ब्रिटिश सैन्यांतील ऑफिसर व हिंदी सैन्यांतील ऑफिसर यांच्या वागणुकीवरून हा फरक चटकन् ठळकपणें लक्षांत भरतो. इंडियन मेडिकल सर्व्हिसमधील अधिकाऱ्यांपेक्षां रॉयल आर्मी मेडिकल कोरमधील अधिकारी खुल्या दिलानें वागत. एकंदरींत इंग्रज लोकांचें हिंदु लोकांविषयीं मत म्हटलें म्हणजे असें, कीं, हिंदुलोक अडाणी, अज्ञानी आणि गलिच्छ; त्यांना शिस्त नाहीं व त्यांच्यांत संस्कृति कमी; चालीरीति घाणेरड्या, समाजबंधनें मूर्खपणाचीं व अपरिपक्व, आणि धर्ममतें रानटी; खोटे बोलणारे नंबर एकचे ! ! आतां एखाद्या साहेबाला एखादा हिंदु आवडत असेल, पण तें व्यक्ति विषयक झालें. समाजाचें समाजाबद्दल मत म्हणजे वरीलप्रमाणेंच. साहेबांना मनांतून जितका तिटकारा असतो तितका ते बाहेर दाखवीत नाहींत. तितका मनोनिग्रह, तितका शिष्टाचार त्यांना आहे. गोऱ्या ऑफिसरांची आमच्याशीं वागणूक चांगली होती. ते मन मोकळें करून बोलत, आमच्यांत मिसळत व आम्हांला त्यांच्यांत मिसळूं देत, व बरोबरीच्या नात्यानें वागवीत. किंबहुना आम्हांला असें वाटूं नये, कीं, आम्ही ‘नेटिव्ह’ म्हणून आपल्याला कोणींच विचारीत नाहीं अगर आपली काळजी घेत नाहीं, म्हणून कित्येक प्रसंगीं हे गोरे ऑफिसर मुद्दाम जाणूनबुजून अधिक मायाळूपणें वागत व आमच्या गरजा भागविण्याकडे व आमच्या “ बंदोबस्तांत ” कमी न पडूं देण्याकडे विशेष लक्ष पुरवीत. पण ही सगळी एका गोऱ्या ऑफिसरची एका हिंदी ऑफिसरशीं वागण्याची पद्धत. समाजाचा समाजाविषयीं ग्रह एकच, म्हणजे वाईटच ! उदाहरणार्थ, पलटणींत ऑफिसरांकरितां घोडे पुरवावयाचे असले व घोड्यांची तूट असली तर काळ्या आय्. एम्. एस्. ऑफिसरला कांहींना कांहीं सबबी काढून वगळावयाचा. पण प्रत्यक्ष कूच करतेवेळीं त्याला कोणीना कोणी गोरा ऑफिसर स्वतःचा घोडा आग्रह करून बसावयाला देत असे. किंवा कर्नलला दोन घोडे असतात त्यांपैकीं एक तो देई. एखादें त्रासाचें किंवा अवघड काम असलें, कीं, पाठवा एखाद्या ‘ काळ्या ’ डॉक्टरला ! मात्र,

उन्हाळ्यांत ' हिल स्टेशनवर ' गोऱ्या डॉक्टरची नेमणूक व्हावयाची ! शक्य तितकें हिंदूला कमांडिंग ऑफिसर करावयाचें नाहीं. पेशावरला असतांना एका सीनियर दक्षिणी ऑफिसराच्या हक्काची धडधडीत पायमल्ली करून एक ज्युनिअर गोरा ऑफिसर कमांडंट केला. तक्रार झाली, पण त्याचा निकाल असा झाला, कीं, त्या दक्षिणी ऑफिसरापेक्षां सीनियर असलेल्या एका गोऱ्याची बदली त्या ठिकाणीं करवून अर्थात् त्यालाच कमांड देण्यांत आली. किंवा त्या सिनियर हिंदूची दुसरीकडे उचलबांगडी करावयाची. मिळून पांढऱ्यावर काळें करावयाचें नाहीं, हा इंग्रजी गुण कांहीं आधुनिक कवि व लेखकांनीं उचलण्यासारखा आहे ! मेसोपॉटमध्यें असतांना आमच्या मेसमध्ये जर पुडिंग कमी असलें तर आधीं ' डॉक् ' ला ( म्हणजे डॉक्टरला-मला ) घेऊं द्यावयाचें, व मग बाकीच्या गोऱ्या ऑफिसरांना. माझ्या तंबूची व्यवस्था झाली कीं नाही, ते मुद्दाम पहावयाचें. मला घोडा आहे कीं नाहीं, याची चवकशी करावयाची. कोणत्याहि खेळांत मला मुद्दाम बोलावून न्यावयाचें. जागेची अडचण असली तर कर्नलनें स्वत:च्या तंबूंत मला घ्यावें. तात्पर्य, हिंदु ' लोक ' या दृष्टीनें जरी त्यांचें मन कलुषित असलें तरी प्रत्यक्ष व्यक्ति या नात्यानें-समोरासमोर असतांना आम्हांला ते विशेष सवलतीनें व बरोबरीनें वागवीत, असा निदान माझा अनुभव आहे.

ऑफिसरांच्या या वर्तणुकींत व नॉन कमिशन्ड ऑफिसर व इतर खालच्या दर्जाचे लोक यांत जमीन अस्मानाचें-मोठ्या मनाचें व क्षुद्र बुद्धीचें अंतर दिसलें. काळे लोक म्हणजे 'जनावरें' अशी या सार्जंट वगैरे सोल्जरांची कल्पना होती. व आपल्या कल्पना ते कृतींत उतरवीत. काळ्या शिपायापेक्षां गोरा शिपाई अधिक ' सुधारलेला ' असतो खरा, पण सर्वच गुणांत तो कसा श्रेष्ठ असणार ? पुष्कळ गोरे सार्जंट वगैरे इंडियन आय्. एम्. एस्. व कमिशन्ड ऑफिसरांना सलाम करीत नसत. ' काळ्या आदमी ' ला सलाम करावयाचा म्हणजे काय ? केवढी मानहानि ! केवढा कमीपणा ! पेशावरला असतांना यासंबंधीं कांहीं हातपाय हलवावे, असें पुष्कळ लोकांच्या मनांत होते. पण मांजराच्या गळ्यांत ही घंटा बांधावयाची कोणीं ? या बाबतीत मीं पुष्कळच खटपट केली, अगदीं डिव्हिजनल कमांडरपर्यंत गेलों, पण त्यांनीं अखेर सारवासारवच केली ! आव ' मोठा ' आणला, पण झालें नाहीं कांहींच !

**मायभूमी**

मायभूमीपासून मी आतां ३१७५ मैल लांब आलों होतों. जसजसा मी हिंदुस्तानपासून लांब जाऊं लागलों, तसतसें त्याबद्दल प्रेम वाढूं लागले. प्रकृति ढासळल्याशिवाय तिची खरी किमत कळत नाहीं. तसे घर सोडल्याशिवाय घराची माया कळत नाहीं. इंग्रज वगैरे पाश्चात्य लोक घरादारापासून हजारों मैल लांब जातात, तेथें वस्ती करतात, म्हणूनच 'होम, स्वीट होम' त्यांना इतकें प्रिय आहे; व 'होम' चें त्यांच्यांत एवढें बंड आहे तें उगीच नव्हे! 'होम' या शब्दांत भरलेला अर्थ पूर्णपणें दर्शविणारा प्रतिशब्द मराठींत नाहीं. 'होम स्वीट होम' ची कविता शाळामास्तरांनीं मुलांना किती जरी विशद करून सांगितली व मुलांनींहि माना डोलविल्या तरी शिकणारांना किंवा शिकविणारांना त्यांतील खरें स्वारस्य क्वचितच समजेल! होमबद्दल निराळें लिहिण्यापेक्षां त्या वेळच्या माझ्या एका पत्रांतील मतितार्थच येथें देतों:—"सहा महिने झाले नाहींत तोंच घराची कोण ओढ लागली आहे! घर म्हणजे कादंबरींतील 'लहान पण टुमदार' बंगलीच असली पाहिजे असें नाहीं, अगर चौसोपी वाडा नको. आपलें असेल तसें बेताबाताचें घर, त्यांतील आपली आवडती बसावयाची खोली, आवडतें टेबल; घर म्हणजे आपलें पेटंट फिरण्याचें ठिकाण, चोरून पोहावयाला जावयाची विहीर; घर म्हणजे प्लेगच्या झोंपडींत असतांना सोसलेल्या हाल-अपेष्टा, मजेत गेलेले दिवस, ट्रिप्स, मेजवान्या, लग्न, हळद-



मि. विंस्टन चर्चिल.

कुंकवाची डाळ, अंधारांत वेड्यावाकड्या जिन्यांतील पायऱ्यांवरून घसरून खोंक पडल्याची आठवण, आजारीपण, लहानपणचीं भांडणें व गट्टी, मोठेपणींचे डाव-पेंच व दंभ, प्रिय माणसाचें निधन, मित्र, प्रेमकहाणी, रोज दिसणारा म्युनिसिपालिटीचा कंदील, कॉलेजची घंटा, एखाद्या विशेष चांगल्या अगर विशेष वाईट दिवसाची अगर प्रसंगाची आठवण, एखादी भाऊबीज; एकूण आवडणाऱ्या व नावडणाऱ्या सुखाच्या व दुःखाच्या सर्व गोष्टींचें माहेरघर म्हणजे होम ! ”

तहान लागत चालली म्हणजे थोड्या वेळानें अनावर होते, व जवळपास पाणी नाहीं असे कळल्यावर तर कंठशोष होऊन प्राणांतिक अवस्था येते. ती वेळ एकदां टळली, कीं, तहान मरते. घराच्या ओढीचें असेंच आहे.

जितकी संस्कृति जास्त तितकी माया अधिक. शिपाई, फॉलोअर वगैरे लोकांना घराचा तितका ळळा नसतो. कांहीं लोक वर्षावर्षात घरीं पत्र पाठवीत नाहींत, कीं, त्यांना घरची डांक येत नाहीं. घरून निघतांना तो मेला असेंच जणों त्याचे आप्तेष्ट समजतात ! मेलेल्या माणसाचा व आपला तरी कोठें पत्रव्यवहार असतो ? या लोकांत ‘ काव्य ’ मुळींच नसून ते अगदीं व्यवहारी असतात. याविषयींची एक गोष्ट मला फार गमतीदार वाटली. अठराएकोणीस वर्षें वयाच्या एका शिपायाला फील्ड सर्व्हिसला ( काळजाच्या विकारामुळें ) नालायक करून दोन वेळां मीं हॉस्पिटलमध्यें पाठविला होता. पण त्याला चार दिवस ठेवून घेऊन परत कामावर ‘ लायक ’ म्हणून धाडीत. एकदां आमच्या-वर धांदलीनें रिट्रीट करण्याचा प्रसंग आला होता. या रिट्रीटला ‘ पद्धतशीर माघार ’ क्वचितच म्हणतां येईल ! बाकीची ब्रिगेड केव्हांच झपाझप पुढें निघून गेली, आमच्या पलटणीकडे रिअर गार्डचें काम होतें व स्वारीवर निघतांना ॲड्व्हान्स् गार्डला जितकें जबाबदारीचें काम असतें त्या मानानें रिट्रीटमध्यें रिअर गार्डवर अधिकच जोखीम असते. शत्रु अगदीं मागें येऊन भिडला होता--अगदीं हांकेच्या अंतराच्या अलीकडेपर्यंत. सपासप गोळ्या येतच होत्या व ज्यांना जखमी झाल्यामुळें पळतां येणें अशक्य होतें व डोलींत घालून परत आणण्याइतकी परिस्थिति नव्हती, ते नेमके शत्रूच्या हातीं लागले असतील ! अशा आणीबाणीच्या प्रसंगीं शिस्त ढिली पडली व एकच गोंधळ होऊन जो तो जीव घेऊन पळूं लागला ! या धांवपळींत, या प्रत्यक्ष जीवनकलहांत त्या बिचाऱ्या पोराला पळतां येईना. तो थकला, मागें

पडला व शत्रूच्या हातीं लागला. तो गोळी लागून खालीं पडल्याचें पाहिलेलेंहि एका शिपायानें सांगितलें. पण त्या धांदलींत जिवंत जखमी सुद्धां तसेच मागें सोडून द्यावे लागले असतील, मग मेलेल्यांना मूठमाती कोण देणार? पुढें महिन्यादीडमहिन्यानें त्या मुलाचें आमच्या पलटणींतील एका दोस्ताला पत्र आलें. त्यांत 'सलाम अलेकम्'-नंतर इतकाच मजकूर होता, कीं, फलाण्या सेक्शनमधील फलाण्या शिपायाजवळ माझें कंबळ (म्हणजे ब्लँकेट) राहिले आहे तें त्याच्यापासून घेऊन हवालदाराच्या ताब्यांत द्यावें. वारे गडी! आपण मागे कसे पडलों, मेलेल्याचे जिवंत कसे झालों, वगैरे आपल्या सुटकेसंबंधीं एक अक्षर बाळानें लिहिलें नाहीं. नंतर जेव्हां फिरून तो आमच्या पलटणींत आला तेव्हां त्याला भेटून मीं सगळी हकीगत विचारली. तो म्हणाला, "प्रथम छाती भरून आल्यामुळे दमून मी मागे पडलों, व तीन अरबांनीं मला पकडून माझी सर्व चीजवस्तु, बंदूक काडतुसें, खंजीर, कपडे वगैरे काढून घेतलीं. नंतर त्यांच्याबरोबर दक्षिण दिशेला दोन दिवस प्रवास केला. रात्रीं एखाद्या मशिदींत मुक्काम होई. ते जे खान-खुब्ज म्हणजे लठ्ठ पोळी व भात-त्यांतीलच मला देत. मी मोकळाच असे. निजतांना देखील मी त्यांच्यांत मोकळाच निजे. एके दिवशीं रात्रीं साधारण चांदणें पडले असतां दक्षिणेच्या बाजूकडून मला तोफा उडाल्याचा अस्पष्ट आवाज ऐकूं येऊं लागला. मला माहीत होतें, कीं, दक्षिणेच्या बाजूनें 'समावा' कॉलम 'वर' येत आहे. सर्व झोंपी गेले आहेत असें पाहून मी उठलो व हळूच पाय न वाजवितां मशिदीच्या बाहेर पडलो. नंतर कानोसा घेत तोफांच्या आवाजाच्या रोखानें भराभर मार्ग आक्रमूं लागलों. राहिलेली सारी रात्र चालत पहाटेस मी समावा कॉलमला जाऊन मिळालों व तेथें माझी एका पलटणींत तात्पुरती सोय करून दिली."

## रजेचें तंत्र

बायकामुलें, घरदार, शेतवाडी वगैरे बंधनें असलेला शिपाई कंटाळला पण रजा मिळाली नाहीं, तर त्याला सारखीं पत्रे येऊं लागतात. त्यांतील मुख्य मुद्दे असेः—तुझा भाऊ वारला तर आतां पुतण्याची सोय करण्याकरितां त्वरित निघून ये. अगर तुझा बाप वारला, व तुझा काका इस्टेट लांबविण्याच्या खटपटींत आहे म्हणून रजा घेऊन ताबडतोब येणें. किंवा तुझें घर जळालें असून बायको दुसऱ्यानें पळविली! साधारणतः बापच विशेष मरत व दुसऱ्याचा हात



मोनॅपो रेल्वे स्टेशन. ( या आगगाडीनें परत लंबोस गेलो. )



युद्ध–तहकुबीचा हर्षोत्सव, मोनॅपो.

धरून जाण्यांत बायकोचा नंबर दुसरा लागे. बाप अगर काका अगोदरच मेलेले असले तर बायकापोरांचा सांभाळ करणारा पालकच त्यांच्या मरणाचें ॲक्टिंग काम करी! यांतील सगळींच पत्रें खोटीं नसत, अगर सगळेच लोक लुच्चे नव्हेत. पण जे कोणी असतील त्यांना–बायकोला आणण्यास गांवीं जाण्याकरितां 'सिक रिपोर्ट' करणारे, अगर रजा मिळविण्याकरितां आई अत्यवस्थ असल्याची तार मागविणारे आपले कांहीं नोकर–बंधु क्षमा करतील असें वाटतें!

सर्व प्रकारची रजा शास्त्रांत सांगितली आहे, पण रूढि निराळी असते. जो खटपट करतो, साहेबाला भेटतो, त्याला बहुतकरून रजा मिळते. जो आपल्या पाळीची वाट पहातो, त्याला नोकरी सोडीपर्यंत वाटच पहावी लागते! फील्डसर्व्हिसवर गेला, कीं, अडकलाच! सर्व तऱ्हेची रजा घेण्याचा प्रत्येकाला हक्क असला तरी नियमांत एक मोठी गोम आहे, ती ही, कीं, 'अडीअडचणी नसल्यास' असे शब्द टाकून सोडवणूक करून ठेवली आहे. पेशावरला गेल्यानंतर मला रजा मिळाली असती, पण आफ्रिकेंत जाण्याच्या ओढीमुळें मला रजेला मुकावें लागले. त्यानंतर उभ्या तीन वर्षात–म्हणजे राजिनामा मंजूर होईपर्यंत मला फक्त वीसएक दिवसांची रजा उपभोगावयास सांपडली! म्हणजे अशी, कीं, फील्डसर्व्हिसवरून परत आल्यावर दोन महिने वॉर लीव्ह द्यावी व आपल्या घरापर्यंत जाण्यायेण्याच्या प्रवासाचा पास द्यावा, असा नियम आहे. त्याप्रमाणें भवति न भवति होऊन मला तितकी रजा मंजूर तर झाली, पण मघां सांगितलेली 'अडचण' मध्यें आली, व वीस दिवस रजेचे पुरे होतात न होतात तों तारेनें मला परत बोलावण्यांत आलें! व तेंहि पुनः फील्डसर्व्हिसवर जाण्याकरितां! रजा मिळाल्याबरोबर, आतां दोन महिने मजेत काढावयाचे या आशेच्या भरांत व पुढें पुरे दोन महिने दिसत असल्यामुळें त्यांतील एकोणीस दिवस संयुक्त प्रांतांतील कांहीं प्रसिद्ध स्थळें पहाण्यांत घालविण्यास मला कांहींच वाटलें नाहीं. (तेव्हां मी अलाहाबादला होतों.) पण परत घरीं येतांना वाटेंतच मला तारेनें परत बोलावल्याचें कळलें. घर केलें म्हणजे घरांत जशी 'अडचण' ही नेहमीं असावयाचीच, त्याप्रमाणेंच लढाई एकदां सुरू असली–मग युद्धतहकुबी कां होऊन गेलेली असेना–म्हणजे यांच्या 'अडचणी' कधीं संपावयाच्या नाहींत! महिन्यांचे महिने सतत रजेशिवाय काम करणें आणि तेंहि फील्डसर्व्हिसवर म्हणजे जीव अगदीं कंटाळून जातो. असें

' पे वुइदाउट लीव्ह ' वर रखडण्यापेक्षां ' लीव्ह वुइदाउट पे ' घ्यावी, तर तेंहि शक्य नाहीं !

सैन्याच्या कारभारांतील ' अंदाधुंदीच्या शिस्ती ' चा एक मासला देतों. सगळाच सांवळागोंधळ ! मला अलाहाबादला असतांना रजा मिळाली व मी पुण्यास जाणार होतों. मला परत बोलावले ते मेसापोटेमियांत जाण्याकरिता. आतां एखाद्या साधारण व्यवहारी माणसानें मला तार केली असती ती अशी. कीं, मेसापॉटमध्ये नेमणूक झाली आहे तर मुंबईस जाऊन एम्बार्केशनला भेटा. पण या लोकांनीं मला परत अलाहाबादला बोलाविले व तेथे जाऊन पोहोंचताच माझ्या हातांत हुकूम दिला तो असा:—" मुंबईस जाऊन एम्बार्केशनला भेटा. तुम्हांला मेसापॉटमध्ये जावयाचे. " आहे कीं नाहीं कामाचा उरक आणि काटकसर ! पुण्याहून परस्पर मुंबईला जावयास सांगण्याचा सरळ मार्ग सोडून विनाकारण पहिल्या वर्गाच्या १६०० मैल प्रवासाच्या खर्चात सरकार पडले, व दिवस व्यर्थ मोडले ते निराळेच !

**हिशेबी गों ळ**

अलाहाबादहून मुंबईपर्यंतचा वाटखर्च मी स्वतःच्या पैशांतून केला होता तो परत मिळण्यास मला वर्ष-दीड वर्ष भांडावे लागले ! असे वाटे, कीं, कांहीं मिलिटरी अकाउंट ऑफिसें जणूं हिशोबांचा गोंधळ घालण्याकरिताच निर्माण झालीं आहेत ! कामाची टोलवाटोलवी कशी करावी हें यांच्यापासून शिकावें. आफ्रिकेतून एक पत्र यावयास साधारण एक महिना लागे. ते दमून आल्यामुळेंच कीं काय, चारआठ दिवस ' पेंडिंग फाइल 'मध्ये विश्रांति घेई. नंतर 'अ' ऑफिसनें उत्तर पाठवावें, कीं, तुम्हीं आपलें पत्र ' ब ' ऑफिसकडे धाडावें: उत्तर आमच्या हातांत येण्यास पुनः एक महिना जावा. वस्तुतः हें ' ब ' ऑफिस, ' अ ' ऑफिसच्या शेजारच्या इमारतींत असूं शकेल ! किंबहुना या दोन ऑफिसांत एक लांकडी पडद्याचेंच अंतर असूं शकेल. याप्रमाणें आमचें पत्र 'ब' च्या ऑफिसांत जाऊन पोहोंचेतोंपर्यंत तीन महिने निघून जात. मग 'ब' नें तें मलत्याच ऑफिसांत कोलवावें. नंतर तें पत्र पेशावर अलाहाबाद लखनौ डिव्हिजन वगैरे तीर्थयात्रा करून शेवटीं 'ब' ऑफिसमध्येच पुनः यावें. इतक्यांत आम्ही हिंदुस्तानांत परत येऊन मेसापॉटमध्ये गेलेले असावयाचे आणि पुनः टक्के-टोणपे खातखात ती कागदाची गुंडाळी आमच्याकडे येई. फिरून आम्हीं तीच

गुंडाळी आणखी एखाद्या 'योग्य' अधिकाऱ्याकडे हिंदुस्तानांत पाठवावी. यांनीं लिहावें, कीं, "अमक्या आर्मी फॉर्मवर नीट भरून पाठवा." पण फील्ड सर्व्हिसवर, तेंहि एखाद्या खोलांतल्या कँपांत आर्मी फॉर्म आणावयाचा कोठून? शेवटीं पुण्याहून त्यांनीं कोरे आर्मी फॉर्म पाठवावे. इतक्यांत आम्ही पुनः हिंदुस्तानांत परत! मग हें चक्र फिरून सुरू व्हावें! एकंदरींत पहातां हिशेबनिसांना 'क्लेम' फेटाळून लावण्याचा फार नाद दिसला!–कित्येकदां तर भलतीच ॲथॉरिटी ते 'क्वोट' करीत! एकदां बगदादचे हिशेबबहाद्दर माझ्या नांवाची कांहीं शिल्लक माझ्याच आडनांवाच्या दुसऱ्या एका ऑफिसराला देऊन मोकळे झाले! कांहीं लोकांची हक्काची व रास्त वसुली होत नाहीं, तर कांहींना फुकटच्या फाकट, चुकून स्टाफ पे भरला गेला आहे, असें ऐकिलें. पण येवढ्या मोठ्या लढाईच्या धुमश्चक्रींत असें व्हावयाचेंच.



रा. साने, आमच्या कँपांत, मोनॅपो

सर्व्हिसवर असतां घरची डांक येणें म्हणजे एक उत्सवच वाटतो. ईस्ट आफ्रिकेंत गेल्यानंतर पहिलें पत्र मिळण्यास मला तीन महिने लागले. पुढें साधारणतः एक महिना लागे. तो आनंद खरोखर अपूर्व होय. घरचें सर्व चित्र डोळ्यांपुढें उभें राही, व वाईट वाटून अंतःकरण भरून येई, पण पत्र आलें म्हणून हर्ष होत असे. साधारण मराठी मनुष्य दिसला म्हणजेहि आपलेपणा उत्पन्न होई.

## म्हशीची उत्तर क्रिया

आमच्या कँपाला लागूनच पोर्तुगीज लोकांचा कँप होता. त्या ठिकाणींच फक्त माझा पोर्तुगीज सैन्याशीं संबंध आला. तेथील लोक एकंदरींत स्वच्छता, शिक्षण व शिस्त यांत नमुनेदार दिसले नाहींत ! (म्हणजे इंग्रजांच्या मानानें.) त्यांचे 'संडास' चराचे असत व त्यांवर असंख्य माशा आणि भयंकर घाण ! दोन पोर्तुगीज शिपायी बरोबर जात असले तरी त्यांचे पाय बरोबर पडावयाचे नाहींत ! पोषाखहि गबाळाच. तेथील कँपांत जागोजागीं घाण ! पोर्तुगीज लोक स्वतःच्या कँपाची स्वच्छता वगैरे पहातच, पण मलाहि त्यांचे कँप तपासावे लागत. अर्थात् त्यांच्याशीं बोलण्याचा वरचेवर प्रसंग येई. त्यांतील एकाच डॉक्टरला मोडकेतोडके 'सोल्जर' इंग्लिश येत होतें. तो भेटला नाहीं म्हणजे फारच मजा उडे ! स्वाहिलींतून बोलावें तर त्यांना स्वाहिलीहि येत नव्हतें. तेव्हां त्यांच्याशीं बोलण्याकरितांहि मला एक नोटबुक करावें लागलें. नेहमीं लागणारे प्रचारांतील शब्द मीं एका दुभाष्याकडून उतरून ठेवले व जेव्हांजेव्हां बोलण्याचा प्रसंग येई व खुणांनीं किंवा चित्रांनीं भागत नसे, त्या वेळीं मी ते शब्द-विभक्ति, प्रत्यय वगैरेकडे न पहातां-जसेच्या तसे मूळस्वरूपांत एकापुढें एक लिहून वाचून दाखवीत असें ! जसें:—

| | | | |
|---|---|---|---|
| (म्हशीचें चित्र काढून) | Acabr<br>संपणें | | Dentro<br>आंत |
| Jumba,<br>झोंपडी | Dentro<br>आंत | | Hospital<br>हॉस्पिटल |
| Murar;<br>कुंपण | Please<br>प्लीज | Por<br>टाकणें | Dentro<br>आंत |
| Dique,<br>खड्डा | Um<br>एक | Mile<br>मैल | Cumrido<br>लांब |
| | Sujo<br>घाण | Mais<br>अधिक | |

या वाक्याचा अर्थ वाचकांना जितका समजला असेल तितकाच पोर्तुगिजांना कळे ?

त्यांच्या कॅंपांत म्हैस मेल्याची बिचाऱ्यांना दादहि नव्हती ! या म्हशीच्या वेळेस मला जीभ काढून व डोळे पांढरे करून मरण्याची क्रिया दर्शवावी लागली ! कारण मरणें याला शब्द मला माहित नव्हता.



रा. कतकर माझ्या झोपडीपुढें, मागें पा

वरवर पहातां तरी निदान पोर्तुगीज लोकांविषयीं माझे वेताचेंच मत झाले ! हिंदु शिपाई अस्करींना भित्रे समजतात तर या निग्रोंनीं पोर्तुगिजांच्या भित्रे-पणावर एक कवनहि केलें होतं, तें असें:—

**पोर्तुगीजी । नमिंबगा खवीसा ॥**
**कमूवाचा जिरेमानी क्वेंडा**
**न्यासा कुपीगाना ॥**

अर्थः—पोर्तुगीज फारच भित्रे बुवा ! जर्मन लोक लढाई करायला आल्या-बरोबर बेटे न्यासालॅंडमध्यें पळूनच गेले !

तेथील निग्रोकरितां असलेलें ‘ हॉस्पिटल ’ म्हणजे रोगाची थट्टा होती ! एक गोठ्यासारखी मोठी झोंपडी व तीहि एका बाजूनें सबंध उघडी. तींत नाहीं कॉट नाहीं अंथरुण ! धर्मशाळेसारखे रोगी पडलेले. त्यांच्या शुश्रूषेला त्यांचेच आप्तेष्ट असल्यास. औषधपाणी रोगी स्वतःचेंच करीत असें दिसलें. हॉस्पिटलपासून दोनशें यार्डावर एक आमांश झालेला रोगी स्वतःच्याच घाणींत पडला असून एक धुमी पेटवून पोट शेकीत निजलेला दिसला. त्याच्या कमरेला एक फडके होतें–तेवढेच त्याचे कपडे. विचारपूस करता मला असें समजलें, कीं, तो हॉस्पिटलमधील रोगी आहे ! तो अगदीं आसन्नमरण स्थितींत होता पण त्याच्या सोबतीला काळें कुत्रें देखील नव्हतें !

या प्रांतांत डांस अतिशय आहेत. दारेसलाममध्यें तर संध्याकाळ झाली, कीं, त्यांना ऊत येतो व ते वारीत बसणे हें एक महत्त्वाचें काम होऊन बसतें.

तेथें असा नियम केला होता कीं, सायंकाळीं सहाच्या पुढें शर्ट घालून हिंडावयाचें नाहीं अगर शर्टच्या बाह्याहि वर करावयाच्या नाहींत. मेसोपोटेमियांत ऑपरेशनवर असतां एका टेंकडाळ प्रदेशांत उघड्यावरच आम्हीं मुक्काम केला होता. तेथें डांस, चिलटें, घुंगुरटीं आणि इतर अपरिचित बारीक किडे तिनीसांजाच्या वेळीं इतके कांहीं आले कीं, खरोखर ते नाका-तोंडांत जाऊं नयेत म्हणून नाकापुढे हातरुमाल धरून हवा गाळून ओढावी लागली ! धुरानें डांस वगैरे घालविण्याकरितां मुद्दाम धुम्या पेटविल्या व सर्वांग आच्छादून ठेवावें लागलें. ग्लासावर हातरुमाल टाकून पाणी गाळून घ्यावे लागलें, तरी देखील कित्येक चिलट आंत घुसलीच ! दोन रात्रीं निरनिराळया कँपांत अशी त्रेधा झाली !

**पाणी पुरवठा**



पाणी-पुरवठा, मोनॅपो.

मोनॅपो गांवीं नदी वगैरे पाण्याची नैसर्गिक सोय कांहींच नव्हती. टेंकडयांच्या बाजूंनीं, झाडाच्या पानावरील शिरांच्या दिशेप्रमाणें, तिरपट नाले खणावयाचे ( सुमारें दोन फूट खोल ) व त्यांत आपोआप झिरपून पाणी येई.

तें मधल्या लांबच लांब मोठ्या नाल्यांत जाई. याप्रमाणें बऱ्याच अंतरावर—अर्ध्या एक फर्लांगावर—गेलें म्हणजे साधारण पाव मिनिटांत वॉटर बॉटल भरेल इतपत पाण्याचा प्रवाह तयार होई. कांहीं दिवसांनीं यांतील पाणी आटलें म्हणजे दुसऱ्या एखाद्या योग्यशा ठिकाणीं असे नाले काढावयाचे !

पोर्तुगीज ईस्ट आफ्रिका हवापाणी, झाडें, मुलूख या दृष्टीने महाराष्ट्रासारखी वाटली. उष्मा थोडा जास्त व थंडी अमळ कमी, आणि पाऊस बेताचाच.

स्वाहिली ' ङ्गोमा ' म्हणजे नाच फार गमतीचा व कुशलतेचा वाटला. नाच म्हणजे निग्रोंचा जीव कीं प्राण. आर्मिस्टिसची तार आली त्यावेळीं ठिकठिकाणीं कॅंपांत नाच झाले. (यांत ऑफिसरपासून शिपायापर्यंत सर्वांनींच भाग घेतला होता !) त्यांतल्या त्यांत दोन निग्रो बिबी फारच बहारीच्या नाचल्या. त्यांत विशेष हा होता, कीं, अंगाचा कोणताहि इष्ट भाग–छाती, जघन वगैरे–त्या नेमका हलवीत होत्या.

**जर्मानी क्वीशा !**

आर्मिस्टिसच्या नाचाच्या वेळीं पुढील पद फार प्रचारांत आलें. तें नोटेशन-सह खालीं दिलें आहे.

**ज मॉ नि, क्वी शा।**
ग रे ग नि ग
**ज मॉ नि, क्वी शा।**
ग रे ग नी ग
**कि लि या, न म्पें जी, मा मा॥**
प प म ग सा रे ग ग
**ह मू री या, स री का री, बा ना**
रे' रे' सा' नि सा' नि ध प ध प
**में जर, न, क प्ता नी॥**
म ग रे सा रे ग
**ई बा ना, अ ना स री का टी का।**
रे ग नि म ग रे सा रे ग ग

(अर्थ–जर्मनीचा पराजय झाला, आतां आईकडे परत घरीं जाईन. मेजरसाहेब, कप्तानसाहेब, सगळेच जाणार.)

भूमध्यरेषेच्या जितक्या उत्तरेस मुंबई आहे ( १९° ) तितक्याच खालीं साधारणपणें मोनॅपो गांव येईल. येथून दक्षिण ध्रुवाजवळील तारांची चौकडी एकाच वेळीं छान दिसत असे.

**आघाडीवरील बातम्या**

हिंदुस्तानांतच राहणाऱ्या लोकांचा असा समज असे, कीं, हिंदुस्तानांतील लोकांपेक्षां प्रत्यक्ष रणांगणावर असणाऱ्या इसमांना निरनिराळया आघाडीवरील बातम्या लवकर व इत्थंभूत माहीत होत असतील. पण आपापल्या आघाडीवरील माहिती देखील आम्हांस नीट समजावयाची नाहीं. कित्येकदां शेजारच्या ब्रिगेड ऑपरेशनसंबंधींची अगर अन्य माहिती आम्हांला महिन्या दीड महिन्यानें 'पायोनिअर 'वरून समजावी !

**खान्याच्या वेळीं**

साहेबांच्या टेबलावर नवशिक्या मनुष्याची पहिल्यापहिल्यानें जी त्रेधा उडते, ती सांगतां सोय नाहीं. कोणता पदार्थ आधीं खावा, कोणता मग, कोणता कशाशीं, हें कांहींच समजत नाहीं. यामुळें तो गोंधळून जातो व कित्येकदां कांट्यानें खाण्याचा पदार्थ चमच्यानें खाऊन, अगर फक्त कांट्यानें खाण्याच्या जिन्नसाला चमचा व कांटा यांचा उपयोग करून, हास्यास्पद चुका करतो. यांत त्याचा दोष नसतो. पण पहाणाराला गम्मत वाटल्यावांचून रहात नाहीं. साहेब लोक अशा चुकांकडे काना-डोळा करतात. अशा पेंचांत न सांपडण्याचा उत्तम उपाय म्हणजे दुसरा करील तसें करावें व माहीत नसल्यास खुशाल विचारावें.

साहेब लोकांत हात, तोंड व डोकें धुण्याचें आणि भांग काढण्याचें सत्र रात्रंदिवस चालू असतें. न्याहारीला, 'लंच 'ला व 'डिनर 'ला जातांना हे सर्व विधि व्हावयाचे. फिरावयाला किंवा खेळावयाला जातांना पुनः त्यांची आवृत्ति आहेच ! नाश्त्याला किंवा टिफिनला कसेंहि गेलें तरी चालते, पण रात्रीच्या खान्याला मात्र यांत कांहीं कमी पडतां कामा नये—बरोबर ड्रेस करून जावें लागतें. जरा कोठें कपडे घालण्यांत किंवा फिती लावण्यांत चूक झाली तर लागलीच 'तुम्ही नीट पोषाख केला नाहीं !' असा इषारा मिळतो, व अशीच चूक पुनः घडली, कीं, गम्मतीनें त्या ऑफिसरकडून 'ड्रिंक ' उकळतात ! यामुळें कांहीं ऑफिसर अशा चुका शोधून काढण्याकरितां डोळयांत तेल

घालून बसतात. नेहमींच्या चुका म्हणजे खांद्यावरील रेजिमेंटच्या नांवाची अक्षरें उलटीं लागणें अगर कोटावर रिबन्स बसवावयाला विसरणें, या होत.

ऑफिसर्स मेसमध्यें राजनिष्ठेचें बाळकडू असें पाजलें जातें, कीं, कांहीं विशेष प्रसंगीं भोजनोत्तर सर्वजण मिळून उठून राजाची 'हेल्थ' पितात. जेवणाला बॅंड वगैरे असेल तर शेवटीं ' गॉड् सेव्ह दि किंग् ' वाजवितांना सर्वांना उठून उभें रहावें लागतें.

साहेब आपल्याला ' काळा ' आदमी म्हणाले तर आपल्याला राग येतो, पण हिंदु लोक तेच शब्द निग्रोबद्दल वापरतांना आढळतात !

**डांक**

एकदां घर सोडलें, कीं, पन्नास मैल काय आणि पांचशें मैल काय, सारखेंच ! कुठेंहि आपली माणसें डोळयांनीं पहातां येत नाहींत किंवा त्यांच्याशीं बोलतां येत नाहीं. जवळ असलें म्हणजे मनाला एवढाच विसावा असतो, कीं, प्रसंग पडल्यास लवकर घरीं पोहोंचतां येईल. पण प्रत्यक्ष सुख-दुःखांत फारसा फरक नसतो. एवढें मात्र खरें, कीं, पत्रें लवकर येतात व बातम्या लवकर मिळतात. फील्ड सर्व्हिसवर पत्र यावयाला वेळ लागतो, पण आलेल्या दोन पत्रांतील अंतर साधारण सारखेंच असतें. बातम्या अर्थात् उशीरां कळतात. ( पुष्कळदां असें होतें, कीं, आली म्हणजे एकाच डाकेनें त्याच माणसाकडून दोन-दोन चार-चार पत्रें येतात, आणि मध्यंतरीं पुष्कळ खंड पडलेला असतो. ) डांकेचें पोतें अथवा पिशवी आली म्हणजे कर्नलपासून सगळे लोक जसे तिच्यावर तुटून पडतात ! व आपोआपच सॉर्टिंगचें काम होऊन जातें ! पोस्टाची व्यवस्था साधारणपणें अशी असते. बेस पोस्ट ऑफिसमध्यें सर्व डांक प्रथम येते. तेथें सॉर्ट होऊन निरनिराळया गांवच्या किंवा डिव्हिजनच्या पिशव्या रवाना होतात, व फील्ड पोस्ट ऑफिसमध्यें येतात. तेथें जाऊन ज्या त्या रेजिमेंटच्या इसमानें आपापल्या रेजिमेंटचीं वगैरे पत्रें कॅंपांत घेऊन जावें. आघाडीवरील पत्रें मोटरनें वगैरे ट्रेंचपर्यंत नेऊन पोहोंचवितात. अशा वेळीं फिरतीवरील पोस्टमास्तराचें जीवित फार धोक्यांत असतें. फील्ड सर्व्हिसवरील पत्रांना स्टॅंप लागत नसे. तीं फुकट जात व येत. ( त्यांतील बरींच न पोहोंचल्यामुळें अगर उशीरां पोहों-चल्यामुळें अक्षरशः फुकट जात ! ) प्रत्येक पत्र कमांडिंग ऑफिसरनें ' सेन्सार '

करावयाचें होतें. आलेलीं पत्रे देखील अगोदर पहावीं, असें शास्त्र आहे. अर्थात् तसेंच संशयाला कारण असल्याशिवाय कोणी पत्र फोडून पहात नाहीं.

## लष्करांतील गोंधळ

कित्येकदां आपल्याकडील लग्नांतील गोंधळाला लज्जा आणण्यासारखा असतो. आम्हांला आफ्रिकेंतून हिंदुस्तानांत परतण्याची ऑर्डर आली, पुढें दीडएक महिन्यानें पॅसेजहि मिळाला, आगबोट ठरली व आम्ही आगबोटीवर चढलों देखील. सामान वगैरे व्यवस्थित लाविले; एक जिंजरची बाटली घेऊन व लायब्ररींतून एक पुस्तक आणून वाचावयास आरंभ केला. इतक्यांत बोटीवरून उतरण्याचा हुकूम आला! कारण ती आगबोट मुंबासाकडे जाण्याचें ठरलें! झालें! पॅसेज न मिळाल्यामुळें दीड महिना दारेसलामला कुचंबत रहावें लागलें होतें, व आतां एकदाची आगबोट मिळाल्यामुळें जीव खालीं पडला होता. अर्थात् सर्व उतारूंची केवढी निराशा झाली असेल याची आतां आम्हांलाहि कल्पना होत नाहीं!



( पावसाळ्यात आगबोट हेलकावे खात असतां— ) " टेSSSन—शन्!"

झालें! जिंजरचे पैसे देऊन आम्ही गाशा गुंडाळला आणि विन्मुख होऊन परत आफ्रिकेच्या किनाऱ्यावर उतरलों!–' मुंबई ' आणि ' मुंबासा ' या नांवांचा

तर घोंटाळा झाला नसेल?—यामुळें माझा मात्र एक फायदा झाला. कारण माझा 'हरिकेन' कंदील मी तसाच उघडाच गड्याच्या हातांत दिला होता. पण अशा तऱ्हेच्या आगबोटीवर दिवा नेण्याची बंदी असल्यामुळें तो बोटीवर चढवूं देईनात, बंदरांतील स्टोअरमध्येंच ठेवा म्हणूं लागले! पण मग तो पुढें मला 'यकदानां'त घालून आणतां आला. (कंदील फील्ड सर्व्हिसवर जितका उपयोगी तितकाच दुर्मिळ आहे. एकादा ऑफिसर मेला तर त्याबद्दल दुसरा सहज आणतां येतो, पण कंदील फुटला अगर हरवला, कीं, कामच आटोपलें!) 'यकदान' म्हणजे एक पेटी—विशेष,—लांकडाच्या चापट फळयांवर कातड्यानें मढविलेली पेटी. याची बहुतक जोडी असते. उंटाच्या पाठीवर एकेका बाजूस या घालतां याव्या म्हणून एकीला कडी व दुसरीला कोयंडा अशी यांत व्यवस्था केलेली असते.



* लाइट्स्—आउट रात्रीं ९ वाजतां *

[ 'सापाचा फूत्कार ऐकूं येत आहे—पण दिवा तर लावायचा नाहीं ! आतां करूं काय ? ' ]

हिंदुस्तानांत परत जाण्याची वेळ लांब असली म्हणजे कांहींच वाटत नाहीं, ती वेळ जसजशी जवळ येईल तसतसें मन अधिकच अधीर होतें. शिजेपर्यंत दम निघतो, पण निवेपर्यंत धीर धरवत नाहीं !

कांहीं ऑफिसर निग्रो बायका 'ठेवीत' असें दिसले ! आपल्याच कॅंपाच्या बाजूस त्यांना झोंपड्या बांधून द्यावयाच्या. सराव झाला म्हणजे गोष्ट अंगवळणीं पडते ! प्रथम निग्रो बायका आवडल्या नाहींत तरी पुष्कळदां पाहून त्यांतल्या त्यांत गोऱ्या किंवा रूपवान् कोणत्या हें ओळखतां येऊं लागतें ! डब्यांतील दुधाची गोष्ट अशीच. प्रथम त्या दुधाचा चहा वाईट लागे, पण पुढें संवयीनें तें दूध इतकें आवडूं लागलें, कीं, कांहीं जण ताज्या दुधापेक्षां टिनमधील दूधच पसंत करूं लागले ! असो.

अखेर ता. १० रोजीं 'कारागोला' या बोटीनें आम्ही परत जाण्यास निघालों, ते १८ तारखेस रात्री आठाच्या सुमारास मुंबई बंदराबाहेर आलों. आगबोट चांगल्यापैकीं व महिना फेब्रुआरीचा असल्यामुळें हा प्रवास अत्यंत सुखकारक झाला. त्यांतून एक पूर्वींचे मित्र बोटीवर असल्यामुळें तर दुधांत साखर पडल्यासारखें झालें. मुंबईचा किनारा केव्हां दिसतो इकडे आम्ही नजर लावून बसलों होतों. फार लांबून दीपगृहाचा दिवा मधूनच चमकलेला दिसे. बंदर जसें जवळ येऊं लागलें तशी छाती धडधडूं लागली, व आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या. जिकडे तिकडे अंधार, पण वेटावरील अंधुक दिसणाऱ्या दिव्यांची ओळ मोठी मजेची दिसत होती. सगळ्याच्या आधीं ताजमहाल हॉटेल ओळखतां येऊं लागलें. सकाळपर्यंत बंदराबाहेरच बोट उभी होती. सकाळीं पोर्ट हेल्थ ऑफिसर येऊन गेला. नंतर कस्टमचे लोक आले. सैन्यांतील लोकांना कस्टमसंबंधीं कांहीं त्रास होत नाहीं. आदल्या दिवशीं आमच्याकडून एक फॉर्म भरून घेतला होता, त्यांत आमच्याजवळील कर बसूं शकणाऱ्या जिन्नसांची यादी होती. पन्नासांपेक्षां जास्त सिगारेट्स् जवळ असल्यास त्यांवर कर आहे. तसेंच आफ्रिकेंतून आणलेला हस्तिदंत, पर्शियांतील गालिचे वगैरेंवर कर घेतात. ऑफिसरला एक पिस्तुल, एक बंदुक, थोडीं काडतुसें इतकें बाळगण्याची परवानगी असते. याशिवाय जर त्यानें कोणतेंहि हत्यार आणलें तर कर पडतो. ( तलवार असते पण ती सर्व्हिसवर न्यावयाची नसते ! )

---



मेसोपोटेमिया
(इराक सन १९२०.)
मैल
0 ५० १०० १५० २०० २५० ३००
रेल्वे
N
W
E
S
४० ५० ४० ४० ३५ ३५ ३० ३० ४५ ५०
मोसल
अर्बिल
चमचमाल
कर्कुक
सुलेमानिया
बायजी
टिक्रीट
समारा
खानिकीन
करमानशा
दियाला
बकुबा
बगदाद
हिट
फेलुजा
कर्बला
हिला
दिवाणिया
नजफ
टायग्रीस
अमारा
युफ्रेटीस
कुर्णा
समावा
नसारिया
बसरा
महमरा
इराणी
आरबात
बुशायर
SKLP
B




( १ ) थंडीच्या कडाक्यांत पहाणाराला शिपायी कसा किंवा किती दिसतो.
( २ ) स्वत: शिपायाला आपण किती आहों असें वाटतें ?

तिच्याजवळ डेकवर येऊन उभें रहावयाचें; आफ्रिकेहून आम्ही परत आलों तेव्हां मुंबई बंदर येण्यापूर्वी चोवीस तास पाठीवर लाईफ-बेल्ट घालून बसण्याचा हुकूम सुटला होता. कारण बंदराजवळ सुरुंग लावून ठेवले असल्याची भीति होती, असें म्हणतात. रोजच्या लाईफ बेल्टच्या परेडच्या वेळीं, पुढें शिंग फुंकणारा एक सार्जंट व मागें कमांडिंग ऑफिसर, डॉक्टर, आगबोटीवरील एंजीनिअर वगैरे, अशी वरात निघे, तेवढीच करमणूक होई. कारण सबंध आगबोट फिरावी लागे. आगबोटीच्या खालच्या मजल्यावर अतिशय कुबट, उबट, ओलसर व कोंदट वाटतें. तेथें राहून प्रवास करणें म्हणजे शिक्षाच आहे. आगबोटीवरच्या एकंदर हवेंतच ( मुंबईसारखा पण त्याच्या पुष्कळ पट ) चिकटपणा असतो. जागेच्या टंचाईमुळें कित्येकदां आगबोटींतील पाण्याखालच्या मजल्यावर खूप गर्दी होते, व मग गोंधळ फार होतो. लंबोहून दारेसलामला ज्या बोटींतून आम्ही परतलों तिच्या खालच्या मजल्यावर, उतरण्याच्या दिवशीं सकाळीं एका निग्रोचें प्रेत सांपडलें. तो बहुतकरून इंफ्लुएंझानें मेला असावा.

सबंध आगबोटीवर मी व कमांडिंग ऑफिसर असे दोघेच ब्रिटिश ऑफिसर होतों. हे जलपर्यटन अत्यंत सुखावह झालें. समुद्र अगदीं शांत होता, व बोट मुळींच हालत नव्हती. दुसऱ्या दिवसापासून उजव्या बाजूच्या किनाऱ्यावरील डोंगर दिसूं लागले. हा बलुचिस्तान व इराणचा किनारा होय. आगबोटीवर एक तुर्की कर्नल आणि एक आर्मेनिअन डॉक्टर व त्याची बायको असे सिव्हिल पॅसेंजर होते. आर्मेनिअन डॉक्टर फ्रान्समध्ये शिकलेला होता. त्याला इंग्रजीहि येत होते. पण तुर्की कर्नलची व आमची खुणांची भाषा चाले. त्या सात दिवसांच्या प्रवासांत 'ला' म्हणजे 'नाहीं' यापलीकडे म्हणजे नकारापलीकडे तुर्की भाषेचें माझें ज्ञान गेलें नाहीं. फऱ्यामऱ्यासारखा एक खेळ ज्यांत बोलण्याची जरूर नसते, असा आम्ही खेळत असूं. आपल्याकडील लोक जसे अध्ययनाकरितां विशेषेंकरून इंग्लंडमध्ये जातात, तसे टर्की, ईजिप्त, वगैरे देशांतील लोक फ्रान्स अगर जर्मनींत जातात. शिकलेल्या लोकांना फ्रेंच भाषा येते.

२० तारखेस आम्हीं शट्ट् एल्-अरब म्हणजे टायग्रीस व युफ्रेटिस मिळून झालेल्या नदीच्या मुखाशीं आलों. येथें सिग्नल दिल्याशिवाय आगबोट आंत जाऊं देत नाहींत. येथून बसरा पन्नास साठ मैल आंत आहे. मधूनमधून

पॉट म्हणजे धूळखजुरीचें माहेरघर. बाकी झाडांच्या नांवानें शून्य! आणि डोळे दिपविणारें पांढरट जमिनीवर तळपणारें ऊन. धूळ म्हणजे इतकी, कीं, किती खणलें तरी मुरूमसुद्धां क्वचित्‌च लागावयाचा. इकडे तंबूच्या आंत जमीन खोदून काढण्याची वहिवाट होती. पांचचार फूट खोल ' डग् आऊट ' असलें तरी खालची जमीन टणक लागत नसे. अगदीं भुसभुशीत. पावसाळा या प्रांतांत बरा दिसला, व सगळीकडे मातीच माती असल्यामुळें जरा कुठें चार तुषार आले तरी देखील पुण्यांतील बुधवारच्या हमरस्त्यावरील ' खडी 'च्या तोंडांत मारणारा चिखल तयार होई, व तोहि निसरडा. या चिखलावरून घसरला नाही, असा मेसापॉटमध्ये शिपाई विरळाच असेल असे वाटतें. असें घसरडें मीं तोंपर्यंत कोठेंच पाहिले नव्हतें. तंबूच्या दरवाज्याजवळील उंबरठेवजा दरड ओलांडावयाची असली तरी त्रास होई. एखादी नऊ इंच रुंदीची नाली ओलांडायला अर्धेपाऊण मिनिट लागे; व बुद्धिबळांत जसा आधीं मनांत विचार करून, पुढची घरें कसकशी सरकावयाचीं हें आधीं ठरवून आपण प्यादें हलवितों, तसे पुढें कोणता पाय कोठें ठेवावयाचा, काठी कोठें टेकावयाची याचें अगोदर मनांत दूरदर्शीपणानें धोरण बांधून पहिलें पाऊल टाकावें लागे! एकदां फेरी बोटींतून नदीकिनाऱ्यावर उतरून एक तीनचार फुटांची दरड चढून जावयाचें होतें. पण तीनचारदां प्रयत्न केल्यावर कोठें यश आलें. दुसरं पाऊल उचलावयाला लागावें तों पहिले घसरूं लागे. सायकलच्या पॅडलप्रमाणें एक पाय पुढें मारला, कीं, दुसरा जसा आपोआप मागें जातो, तसेंच हें! विशेषतः बगदादला या निसरड्याचा मनस्वी त्रास झाला! बगदादला नदी आहे; पण तिच्या बाजूस खडक वगैरे कांही नाहीं. जसा सपाट जमीनीवर पाण्याचा पाट असावा तशीच ही विशाल नदी. म्हणजे दोन्ही बाजूला सपाट जमीन व जवळजवळ तिच्याच सरपट वाहणारी मध्यें नदी. कांहीं ठिकाणीं मात्र दहाबारा फूट उंचीचा किनारा आहे. बाकी फार तर दोनचार फूट. बगदादच्या वर बायजी, शरगाट येथपासून त्या नदीला कांहींसें नदीचें स्वरूप येतें. म्हणजे दोन्ही बाजूंला खडक, खोल पाणी, गारगोट्या इत्यादि. बगदादपासून खाली तिचे किनारे, म्हणजे सगळी माती. युफ्रेटीस नदीचेंहि असेंच, त्यामुळें या नद्यांचीं पात्रें नेहमीं बदलत असतात, व वरचेवर प्रवाह फिरला, कीं, तेथील खेडीं जलमय होऊन गेल्यामुळें उठवावीं लागतात. एका रात्रींत कित्येकदां

असा प्रवाह पार बदलला जातो, असें ऐकिलें. या नद्यांचीं पात्रें देखील कोठें अत्यंत रुंद–२००–४०० यार्ड, तर कोठें इतकीं अरुंद, कीं, पॅडल स्टीमर त्यांत जेमतेम मावे. वळणें फार, व तींहि तीव्र. या तीव्र वळणांतून आगबोट वळवावयाची म्हणजे मोठें अवघड व कौशल्याचें काम आहे. वळवतांना आगबोटीच्या कडा व टोकें थाड् थाड् किनाऱ्यावर आपटतात, व सारखी माती ढांसळत असते. पात्र कित्येक ठिकाणीं खोल तर कित्येक ठिकाणीं अगदींच उथळ. टायग्रीस नदीचा प्रवाह वेगाबद्दल प्रसिद्ध आहे. एका किनाऱ्यापासून खालच्या बाजूस जावयाचें असलें तरी होडी वरच्या बाजूला म्हणजे उलट दिशेला वल्हवावी लागते, म्हणजे ती आपोआप इच्छित स्थळीं पोहोंचते.

मी बसऱ्यास असतांना, ‘ बसरा टाईम्स ’ प्रमाणें तेथील हवेची उष्णता ४९° ते ९३° होती. उन्हाकरितां व धुळीकरितां झांपडीचा धुरकट चष्मा लावणें येथें अपरिहार्य होतें. तसेंच, येथें नेत्ररोग फार असतो.

खजुराच्या झाडांना या प्रांतांत सुमारच नाहीं. अर्थात् नदीच्या किंवा कालव्याच्या कांठानें हीं दिसतात. कित्येक ठिकाणीं यांचीं दाट वनेंच बनलीं आहेत. ऑपरेशनवर असतांना अशा दाट झाडांतून पन्नास यार्डापलीकडील शत्रु दिसणें कठिण होतें. म्हणून एका गांवीं तर हीं झाडें कापून काढावीं लागलीं. खजुराचा मोसम जुलईपासून सुरू होतो. हिरवा खजूर साधारण हिरव्या बोरासारखा टणक व रंगानें हिरवा असतो व खावयाला बरा लागतो. मार्चवर असतांना शिपायांना हिरवा खजूर खाण्यावांचून कांहीं सुचत नसे ! खजुराचें झाड आपल्याकडील ताडीच्या झाडासारखेंच असतें, पण जरा उंच व नारळीच्या झाडाहून ठेंगणें. बसऱ्याकडे ( ‘ ज्ञान–वृक्ष ’ सोडला तर ! ) खजुरावांचून इतर झाड क्वचित्च दृष्टीस पडतें. झुडपें आहेत, पण म्हणण्यासारखें झाड मुळीच नाहीं. नदीच्या व कालव्यांच्या आसपास पालेभाजी, व फळफळावळ आहे–वांगीं, टोमॅटो, भेंडी, मुळा वगैरे. मोठाल्या शहरीं बागा आहेत व त्यांत मात्र मुद्दाम लाविलेलीं झाडें दिसतात. जसजसें वायव्येकडे जावें, तसतशा अंजीर, द्राक्ष, नारिंग वगैरेंच्या बागा लागतात. प्राचीन काळीं, इ. स. चारसहा हजार वर्षांपूर्वीं मेसापॉट देशचें वैभव फार मोठें होतें व तेथील संस्कृति अतिशय पुढें गेलेली होती. बायबल या ठिकाणींच–म्हणजे शर्गाट, निनेवा, बॅबिलॉन येथें तयार झालें. त्या वेळच्या राजांनीं जिकडे तिकडे कालव्यांचें एक जाळेंच पस-

रून सर्व देशांतील जमीन सुपीक करून टाकली होती. ते कालवे अजूनहि-पण बहुतेक कोरडे–आहेत. कित्येक कालवे फारच मोठे–वीसपंचवीस फूट उंच बांध असलेले व पंधरातीस फूट रुंदीचे आहेत. कालव्यांच्या व नद्यांच्या बाजूंनीं लाविलेल्या फळभाज्यांचा आम्हांस लढाईच्या वेळीं फार उपयोग झाला. कांहीं दिवस रोज ताज्या भाज्या व फळें मिळत. नाही तर फील्ड–सर्व्हिसवर–त्यांतून ऑपरेशनवर इतके भाग्य कोठचें ?

आम्ही बसऱ्यास उतरलो होतों तेथें सुखसोयी पुष्कळच होत्या. एक सुंदर झोपडी, खोली स्वतंत्र, त्यांत एक स्प्रिंग कॉट, टेबल, खुर्ची, विजेचा पंखा, दिवा, ईझीचेअर वगैरे. त्यामुळें ईस्ट आफ्रिकेची आठवण होऊन येथें मला अगदीं चैन वाटली. ( पण ती फार वेळ टिकली नाहीं ! ) आफ्रिकेत एकशेंआठ पौंडी तंबूंत मला रहावें लागलें होतें, व त्यांतहि जमिनीवर अर्धा इंच वाळू ! मेसापॉटमध्यें न्हाणी व शौचकूप यांना प्रथमच मीं दारें पाहिलीं ! आफ्रिकेत निराळी न्हाणीच नसावयाची, व शौचकूपालाच काय, पण रहात्या झोंपडीला दरवाजा म्हणून कधीं नसावयाचा ! तिकडील पद्धतच तशी. अर्थात् मेसापॉटमध्यें सगळीकडे असें सुख मात्र अनुभवण्यास मिळालें नाहीं. जसजसें वर जावें तसतसें एकएक सुखसाधन कमी होऊं लागे व ऑपरेशनवर तर विचारावयालाच नको ! बसऱ्याला जेवणाखाणाची चांगली व्यवस्था होती. बगदादलाहि बरदास्त ठीक असे. पण बझिआन खिंडीकडे कूच करतांना, धडधडीत आळ्या झालेलीं व चकचकीत बुरा आलेलीं व सादळलेलीं डॉग-बिस्किटें पुरविण्यांत आलीं होतीं ! डॉग बिस्किटें कोंड्याचीं केलेलीं असून फार टणक असतात. हातानें मोडावयाला बराच जोर लागतो. पण दांतांनीं एकदम मोडले तर गाभ्यांतील आळया स्वाहा केल्या जातील, या भीतीनें टेबलावरच आधीं फोडावीं लागत व आळया व बुरा काढून टाकून मग तीं खावयाचीं ! मार्चवर भर दुपारीं एका २२×१५ च्या तंबूंत सहा किंवा अधिक ऑफिसरांची सोय असावयाची. म्हणजे एकमेकांला खेटून स्ट्रेचर घालून पडावयाला देखील अडचण पडे. अर्थात् तंबूची एक कनात नेहमीं उघडी ठेवणें भाग होतें, व हवेच्या दृष्टीनें तें हितकरहि असे. त्या अडचणींत अडचण मच्छरदाण्यांची ! रात्रीं निजावयाचें उघड्यावर. पुढच्या वर्षीं थंडीच्या दिवसांत असाच प्रसंग आल्यामुळें बाहेर निजणें अगर तंबूची कनात उघडी ठेवणें शक्य नसे. चांगल्या ठिकाणीं 'हार्थ'ची सोय

करतां येते, पण मार्चवर थंडींत कुडकुडावे लागावयाचें. एकदां तर एका ब्लँकेटानिशीं कूच करून दोन दिवस तेवढ्याच सामानावर काढले ! अंथरूण म्हणजे ब्लँकेटाची अर्धी लांबी व तीच दुमडून अंगावर घेतली, कीं, तें पांघरूण ! कैक दिवस पुरेसे पाणी मिळणें शक्य नव्हते. व तेव्हां तर जुलै म्हणजे उन्हाळ्याचा भर व त्यांतहि आम्ही ऑपरेशनवर आणि तोहि धादलीचा रिट्रीट ! प्रत्यक्ष लढाई चालू असतां एका रात्रीं टिनमधील फळाच्या एका फोडीवरच तहान व भूक दोन्हीं भागवावी लागली ! मी फ्रंटवरून परत येईपर्यंत आमच्या कर्नलनें ती अखेरची फोड माझ्याकरितां मुद्दाम राखून ठेवली होती !

**बसरा** गांव बरेंच मोठें आहे. अशार भागांत ' लीच् व वेवर्ने, ' ' इव्हॅन्स फ्रेजर ' अशा मोठाल्या फर्म्सच्या शाखा अलीकडे उघडल्या आहेत. " नेटिव्ह बसरा " अशारहून सुमारें दोन मैल लांब आहे. अशार हें बाजारपेठेसारखें आहे. आम्ही उतरलों होतों त्याला ' मकीना ' म्हणत. बसऱ्यास हिंदुस्तानवासी लोक लढाईच्या निमित्तानें गेलेले पुष्कळच आहेत. तार, पोस्ट, सप्लाय-ट्रॅन्सपोर्ट वगैरे खात्यांतून दक्षिणी लोकांचा बराच भरणा दिसला. यांपैकीं कांहीं ओळखीचे स्नेही अचानक भेटल्यामुळें अतिशय आनंद झाला. मेल स्टीमर मुंबईहून येथपर्यंत पांच दिवसांत येऊं शकते. अंतर सुमारें १८०० मैलांचें आहे. आमच्या कॅम्पापासून अशार आग्नेयेस दीडएक मैल होतें. येथें वाय्. एम्. सी. ए. च्या शाखा आहेत. बसऱ्याच्या स्टेशनपासून अशारपर्यंत एक लहानशी लोकल आगगाडी आहे, तिचें नांव बी. एल. आर्. म्हणजे बसरा लाईट रेल्वे. ( ईस्ट आफ्रिकेंत बार्शी लाईट रेल्वेचें एक एंजिन पाहून फारच गंमत वाटली. ) नदींतून पुष्कळ मोठाले कालवे आंत खणून आणले आहेत.

बसऱ्याहून मी पोहोंचल्याचा केबलग्रॅम केला त्याला शब्दाला नऊ आणेप्रमाणें आकार पडला.

मी चोवीस तारखेस संध्याकाळीं पांच वाजतां बसरा बगदाद मीटर गेज रेल्वेंत बसलों व पंचवीस रोजीं सकाळीं **अमाऱ्याला**–११० मैल लांब-पोहोंचलों. ही रेल्वे तेव्हां बगदादपर्यंत तयार झाली नव्हती. टायग्रीस नदीच्या उजव्या किनाऱ्याच्या बाजूनें म्हणजे दक्षिणेच्या कांठानें ही रेल्वे नेली आहे. अमाऱ्यापासून कूटपर्यंत सुमारें शंभर मैल होतात, पण मेल स्टीमरनें टायग्रीस-मधून चोवीस तासांचा रस्ता आहे. ( नदीच्या प्रवाहाच्या दिशेनें जावयास

वेळ कमी लागतो. ) कूटपासून बगदादपर्यंत दुसरी एक नॅरो गेजची रेल्वे लाईन टायग्रीसच्या उत्तरेच्या किनाऱ्यानें नेली आहे. अमाऱ्यास देखील करमणुकीचीं साधनें पुष्कळ होतीं. वाय्. एम्, सी. ए., टेनिस कोर्ट, एक्स्पिडिशनरी-फोर्स-कॅन्टिन, वगैरे. अमारा गांव नदीच्या उत्तर तीरावर आहे. इकडील बाजारांत बोहरी लोकांचीं दुकानें पुष्कळ दिसली. बऱ्याच बाजारपेठांच्या रस्त्यांवर छता-सारखें छप्पर असत. येथें ता० २७ रोजीं संध्याकाळीं ९७ नंबरच्या पॅडल-स्टीमरमध्यें मी चढलों तों ३० रोजीं दुपारीं दोन वाजतां कुट् एल्-अमाऱ्यास उतरलों. म्हणजे मेलला जेथें एक दिवस लागावयाचा त्याला आम्हीं अडीच दिवस लावले. या नदीतील आगबोटी संध्याकाळीं साडेसातपासून पहांटे चार वाजेपर्यंत चालवीत नाहींत; कारण नदीला वळणें तीव्र व पात्र तर फारच अरुंद आहे. आगबोटीवर असतांना हवेचें उष्णतामान १०६°–७° पर्यंत चढे. अमाऱ्याला १०४° होतें.

**कूट** गांव अगदींच साधारण आहे. घरें मातीचीं किंवा विटामातीचीं. नदीपलीकडे लढाईच्या वेळचे खंदक वगैरे पहाण्यासारखे आहेत. नदीपलीकडेच एक ॲसिटोनचा (?) कारखाना आहे. येथील कॅंपमध्यें झोंपड्या वीज वगैरे कांहीं नव्हतें. मी आधीं रेल्वेनेंच बगदादला जाणार होतों, पण एका बर्मन पलटणीबरोबर मला बोटीनें जावें लागलें. ३१ तारखेस सकाळीं नऊ वाजल्यापासून चवथ्या तारखेस दुपारीं तीन वाजेपर्यंत आम्हीं नदींतून वर बगदादपर्यंत गलों. म्हणजे रेल्वेने जेथें फक्त एक रात्र पुरली असती त्या-ठिकाणीं जवळजवळ पांच दिवस मला लागले. एक तर बोट हळू चालते, रात्रीं उभी राहते व शिवाय नदीला इतकीं नागमोडी



जनरल टाऊनशड

वळणें असतात, कीं, प्रत्यक्ष सरळ रेषेतील अंतरापेक्षां नदीच्या प्रवाहाच्या मार्गाचें अंतर जवळ जवळ दुपटीनें वाढतें ! बसरा व बगदाद यांमधील सरळ अंतर सुमारें अडीचशें मैल आहे, पण बोटीनें सुमारें चार पांचशे मैलांचा प्रवास होतो ! आजूबाजूला सगळेंच सपाट असल्यामुळें लांब अंतरावरून येणारी बोट वेड्यावांकड्या दिशेने येतांना पाहून फार मजा वाटते. हा प्रदेश इतका सपाट आहे, कीं, जसा कांहीं समुद्रच ! नदी ओळखण्याची खूण म्हणजे तिच्या कांठावरील खजुरीचीं झाडें. बगदादपर्यंत साधारण बोट चालविण्यासारखी नदी आहे.

**बगदाद** शहर माझ्या कल्पनेप्रमाणेंच दिसलें. शहर मोठें, दाट वस्तीचें व




अरब कुटुंब

गलिच्छ आहे. रस्ते अरुन्द. टैग्रीसवर एकदोन ठिकाणीं पूल केले आहेत.

वस्ती अठरापगड जातींची, पण अरब व ज्यू जास्त. तुर्क, अर्मेनिअन, इराणी, नीग्रो, भाटये, वोहरी, यूरोपिअन वगैरे सर्व जातींचे व देशांचे लोक येथें आढळतात. अरब स्त्रिया गोपा वापरतात. आपल्याकडील कांहीं नेटिव्ह ख्रिश्चनांप्रमाणें ज्यू लोकांचा पोशाख असतो. बायका एक झिरझिरीत पारदर्शक सफेत किंवा रंगीत फडके डोक्यांवर घेतात. प्रायः गांवांत श्रीमंती व दारिद्र्य यांची भेसळ दिसली. ज्यू लोक त्यांचा सर्वास परिचित असलेला धंदा करतात. रूपानें ते बरे आहेत व त्यांत गोरेपणाहि पुष्कळ असतो. पण एकंदरींत चेहरा फिकट. अरब लोक आपल्या इकडील शर्यतीचे घोडे पाळणाऱ्या अरबांप्रमाणें दिसतात. त्यांतील उच्च दर्जाचे लोक रंगाने गोरे व लाल असतात. बायकाहि उंच, अंगाने भरलेल्या व सुंदर; पण त्यांच्या तोंडावर कोमलता दिसत नाहीं. बगदादला आतां वीज आणली आहे. मोटारींचा फार सुळसुळाट माजला आहे. येथें व्यापार मोठ्या प्रमाणांत चालतो. नदीच्या पलीकडे एक मोठा बाग आहे. तेथें शनिवारीं संध्याकाळीं विशेषतः ज्यू लोक हवा खाण्यास जातात. शनिवार हा त्यांचा पवित्र दिवस होय. उकाड्यामुळें इकडे खुजांची फार जरूरी असते व तशा आकाराच्या मोठमोठ्या डेऱ्यांतून व मडक्यांतून विहिरींचें अगर हौदाचें पाणी वाहून नेणाऱ्या ‘ खुपसुरत अरब पऱ्या ’ पाहून खरोखरच ‘ अरेबिअन् नाइटस्‌ची ’ आठवण झाल्यावांचून रा.त नाहीं.

बगदादला दोन दिवस राहून सहाव्या तारखेस रात्रीं आगगाडीनें वायव्य दिशेकडे जाऊन मोसलच्या वाटेवर ‘ बायजी ’ या स्टेशनवर मी सकाळीं उतरलों. बगदाद बसऱ्यापासून अदमासें अडीचशे तीनशें मैल वायव्येकडे आहे हें वर सांगितलेंच आहे. वाटेंत शंभर शंभर मैलांवर अमारा व कुत-एल-अमारा हीं गांवें लागतात. बगदादपासून बायजी ११० मैल आहे. येथें कांहीं झाडें झुडपें दिसली. तीं पाहून मनाला आनंद वाटतो. नदी खडकांतून वहाते व लांब अंतरावर डोंगर दिसूं लागतात. पण येथें धूळ इतकी आहे, कीं, ती सारखी डोळयांत खुपते व ती झाडण्यासाठीं तोंड पुसून हुळहुळें होऊन जातें व एखादी मोटार गेली तर दोन मिनिटें अगदी दिसेनासें होतें.

**बायजीला** आल्यापासून पाहुणचाराच्या बाबतींत मला एक गोष्ट विशेष आढळली. ईस्ट आफ्रिकेंत कोणीच कोणाला विचारीत नसे. साधा शिष्टाचार-सुद्धां क्वचितच आढळला. तेच मेसोपॉटमध्यें एकमेकांना एकमेकांचें अगत्य

# ३ मेसोपोटेमियांत

## मेसोपोटेमिया

म्हणजे बारा महिने अठरा काळ एक अत्यंत ऊष्णतेचा प्रदेश अशी आपली कल्पना असते. पुण्यामुंबईकडे साधारण समशीतोष्णच ऋतु असतात. वायव्य सरहद्दीवर, पंजाबांत, एकंदरीत उत्तर हिंदुस्तानांत हिवाळयांत कडक थंडी पुष्कळ ठिकाणी बर्फ पडण्याइतकी, व उन्हाळयांत भयंकर उष्मा, असा प्रकार आहे. मेसापोटमधील हवा अशीच असते पण त्यांत विशेष हा आहे, कीं, उन्हाळयांतील तीव्र उष्मा फक्त पहांटेपासून रात्र पडेपर्यंत टिकतो, पण रात्रीं गार वारा सुटतो, त्यामुळें दिवसभर उन्हामुळें थकलेल्या जीवाला रात्रीं आराम वाटतो व पुनः हुषारी येते. उत्तर हिंदुस्तानांत रात्रभर अंगाची लाहीलाही होते व जीव गुदमरल्यासारखा वाटतो. म्हणूनच मेसोपॉटमधील रात्री रमणीय समजल्या गेल्या आहेत. बसरा अत्यंत उष्ण आहे. जुलाई-आगस्टमध्यें उन्हाळयाचा भर असतो व जानुआरी फेब्रुआरींत थंडीचा कडाका. उन्हाळयांत थर्मामिटर कित्येकदां १२८° वर जातें. मेसोपॉटमध्यें समुद्रकिनाऱ्यापासून जसजसें आंत जावें तसतशी उन्हाळयाची तीव्रता कमी होत जाते. अमारा, कूट, बगदाद येथें एकंदरीत खूपच उकाडा असतो, पण बसऱ्याच्या मानानें कमी. पण बसऱ्यास बर्फ क्वचितच पडतें. बगदादलाहि केव्हां तरी. मोसल, पर्शिअन सरहद्द ( शिराझ् वगैरे ), कुर्दस्तान या प्रांतांत सपाटून बर्फ पडतें. उन्हाळयांत बहुतेक लोक उघड्यावर अगर व्हरँडा गॅलरींत निजतात. विशेष काम नसलें म्हणजे या दिवसांतील दुपारचा उद्योग म्हणजे वरचेवर पलंगपोसावर पाणी शिंपडून त्यावर तळमळणें, एकसारखे कोंपराइतके हात वॉश-स्टँडमधील पाण्यांत बुडविणें, घाम व धूळ यांच्या चिखलानें लडबडलेले तोंड व डोकें पाण्यांत बुचकळून पुसून काढणें, शक्य असेल तेव्हां फसफसणारीं बर्फयुक्त पेयें पिणें व कोणा एकालाच न उद्देशून सरसकट शिव्याशाप देणें ! काम असलें म्हणजे विशेष त्रास भासत नाही. या ऋतूंत इकडे 'हीट-स्ट्रोक'च्या पुष्कळ ' केसेस ' होतात.

त्याकरितां ठिकठिकाणीं–रेल्वे स्टेशनावर, नाक्यावर, रस्त्याच्या चौकांत 'हीट स्ट्रोक ठाणीं' ठेवलेलीं असतात. (मोठाल्या शहरीं अगर कँपांत.) तेथें डेऱ्यांतून गार पाणी व बर्फ ठेवलेलें असतें. गवताचे भिजलेले पडदे लावलेले असून झोंपडीचें छप्पर उंच बांधलेलें असतें. थंडीच्या दिवसांत भर दुपारीं देखील अंगांत सबंध गरम कपडे तसेंच ठेवून, शिवाय ओव्हरकोट चढवून, खालीं दोन व वर चार ब्लॅंकेटें घेऊन निजावें तरी जवळ शेकोटी हवीशी वाटे! शक्य असेल तेथें (म्हणजे मोठ्या गांवीं अगर स्थायिक कॅंपांत) 'हार्थस्' असत, पण 'मार्च'वर फारच केंविलवाणी स्थिति होई. हात, पाय, नाक व कान इतके गारठून जात, कीं, बोलावयाची सोय नाहीं! ते अगदीं लाल–लाल होत! असें वाटे, कीं, जणूं काय हे पाय आपले नव्हतच! जसे बूट घातले आहेत, तसेंच कुठले तरी पाय आणून तंगड्यांना चिकटविले आहेत. पायांत कळा निघत. हात इतके निर्जीव होत–गारठून–, कीं, गुंड्या घालणें म्हणजे एक कामच होई. 'स्पॅनर' शिवाय एखादा घट्ट स्क्रू सैल करण्याचा प्रयत्न करावा, तसाच हा गुंडी घालण्याचा प्रयत्न होई. त्यामुळें थर्मोसमध्यें चहा असूनहि थर्मोसचें झांकण उघडणें जड जाई! घोड्याचा लगामहि धड धरतां येत नसे. नोटबुकांत कांहीं उतरून घेणें अवघड पडे. वॉश–स्टॅंडवरील पाणी सकाळीं उठून पहावें तों गोठलेलें! मग काठीनें वगैरे वरचें बर्फ फोडून खालील पाणी घ्यावयाचें! रात्रीं जेवण वगैरे नको वाटे–असें वाटे, कीं, जागचें हालूं नये. कित्येकदां अंगांत उष्णता आणण्याकरितां उगीच थोडी दौड करावी. इतकें खरें, कीं, प्रत्यक्ष बर्फ पडत असतां जितकी थंडी वाजते त्याहून तें वितळण्याच्या वेळीं अधिक जाचक होतें. तसेंच बर्फ न पडतां नुसतेंच पाणी गोठतें तेव्हां थंडीचा कडाका विलक्षण असतो. अर्बिल मुक्कामीं एकदां एका रात्रींत सहा इंच जाडीचा बर्फाचा थर जमिनीवर सांचला! तो पाहून मला फार गम्मत वाटली. यापूर्वी असें बर्फ पडलेलें मीं कधींच पाहिलें नव्हतें. पेशावरास दहा पंधरा मैलांवरील सुलेमान पर्वताच्या शिखरावरचें बर्फ लांबूनच पाहून मला कोण आनंद झाला होता! जमिनीवर, छपरावर, उघड्यावर असलेल्या सर्व वस्तूंवर बर्फ पडून अपूर्वच देखावा दिसत होता. रस्त्यानें जातांना बर्फाच्या चकाकीपुढें डोळे दिपत. बर्फावरून चालण्याची फार मजा आहे. पापडीसारखा कुर्रकुर्र असा तो बुटाखालीं वाजतो. पहिल्या दिवशीं मीं

फार दिसलें. कोठेंहि कोणत्याहि मेसमध्यें जा, ' ड्रिंक घेतां का ? ' 'इथेंच रहा,' 'निदान सिगारेट घ्या ' असें हटकून विचारीत. स्वतःची गैरसोय करून घेऊनहि




कुर्द बुवा व पाठमोरी बाई, अर्बिल

पाहुण्याची बरदास्त ठेविली जाई. अगदीं ऐन लढाईच्या धामधुमींत असा मनःपूर्वक पाहुणचार केला जात असे.

नऊ तारखेस सकाळीं सुमारें अकरा वाजतां कर्कुक नांवाच्या गांवाला जाण्याकरितां मी मोटारनें निघालों. हा पंचाहत्तर मैलांचा प्रवास करण्याला संध्याकाळीं सहा वाजले, व ११६ मराठा पलटणींत मी जाऊन पोहोंचलों. ही पलटण ५५ व्या ब्रिगेडबरोबर दोन दिवसांनीं ' साउथ कुर्दीस्तान फोर्स ' बरोबर ऑपरेशनवर जाणार होती.

एकंदरींत हिंदुस्तान सोडल्यापासून आपल्या कामावर रुजू व्हावयाला मला सत्तावीस दिवस लागले. ईस्ट आफ्रिकेंत जावयाला तीन आठवडे पुरले होते. (अर्थात् इतके दिवस केवळ गप्प बसूं देत नसत. आगबोटीच्या अगर ड्रॅफ्टच्या मेडिकल-ऑफिसरचे वगैरे काम देत.)

**कर्कुक** हें मोठ्या गांवांपैकीं एक आहे. याच्या उत्तरेस थोड्या मैलांपासून कुर्दिस्तानची हद्द सुरू होते. या गांवांत बहुतेक वस्ती कुर्द लोकांचीच आहे. कांहीं तुर्की व इराणीहि आहेत. धाटणी एकच, पण हा प्रदेश विशेष थंड व डोंगराळ असल्यामुळें कुर्दी लोक जास्त राकट बनले आहेत. अरबांच्या मानानें हे थोडे ठेंगणे दिसले. संस्कृतिहि कमीच. डोळ्यांत काजळ घालण्याचा फार प्रघात आहे. गोषाचे महत्त्व येथे आढळले नाहीं. घरें माडीचीं असून वर गच्ची असते. कांहीं इमारती विटा व चुना यांच्या असून भक्कम आहेत. येथे एक किल्ला म्हणजे जाड भिंतीचा एक वाडा आहे. तो दिसण्यांत भव्य दिसतो. यांतच आम्हीं रहात होतों. याला 'बिलेट' म्हणतात. म्हणजे सैन्याने उपयोगाकरितां घेतलेले घर, असा याचा अर्थ आहे.

## बझिआन खिंडींतील चकमक

येथून साऊथ-कुर्दिस्तान-फोर्सबरोबर आम्हीं निघालों. जन्मांत पहिल्यानेंच (व कदाचित् शेवटचीच) प्रत्यक्ष लढाई पहाण्याची आतां आशा होती. टप्प्याटप्प्यानें, मजल दरमजल करीत आमची ब्रिगेड पांच दिवसांनीं 'बझिआन पास'जवळ आली. वाटेंने 'कारा अजिर' म्हणून पंधरा मैलांवर एक गांव आहे. येथें काळ्या अंजिराचीं झाडे असल्यामुळें त्याचें नांव तसें पडलें आहे. पुढें येथून सोळा सतरा मैलांवर चमचमाल म्हणून एक गांव आहे. कर्कुकपासून येथपर्यंत वाटेंत दोन डोंगर (टेंकड्या वजा) लागतात. चमचमालला एक लहानशी टेंकडी आहे, व तिच्यावर लष्करी ठाणें होतें. सकाळीं टेकडीवरील सर्व जनावरें वगैरे टेंकडीखाली नेऊन पायथ्याशीं बांधावयाचीं व संध्याकाळीं सगळें लटांबर सुरक्षिततेकरितां वर घेऊन जावयाचें! आम्हीं आलों तेव्हां अर्थात् खालींच तळ दिला. चमचमालहून बारा मैलांवर बझिआनची खिंड आहे. या खिंडीच्या अलिकडे दोन-अडीच मैलांवर म्हणजे रायफल वगैरेच्या टप्प्याबाहेर आम्हीं कँप केला. तरी त्या दिवशीं रात्रीं आमच्या शेजारच्या

युनिटमधील एका ऑफिसरच्या पायाला, तो नुकताच निजण्याच्या बेतांत असतां, आंगठ्यापाशीं गोळी लागली. त्याच्या अगोदर कांहीं गोळीबार ऐकूं



कुर्द बाई गालिचा विणीत आहे.

येऊं लागला होता, पण 'कुत्रें भुंकत आहे व राजा ऐकतो आहे,' अशांतला प्रकार होता. पण कुत्रे नुसतेच भुंकत होतें तोंवर ठीक होतें. आतां प्रत्यक्ष चावावयाला लागल्यावर एकदम सगळी ब्रिगेड खडबडून उठली. आमच्या पिकेट्सनीं शत्रूच्या गोळ्यांना उलट जबाब देण्यास तडाख्यानें सुरवात केली. थोडा वेळ यांतच गेला व मग सामसूम झालें. एखाद्या अंधेऱ्या रात्रीं झोंपडी-वर दगड आले म्हणजे जशी थोडा वेळ गडबड होऊन कांहीं वेळानें शांतता होते, तसेंच हें! शत्रूचा गोळीबार प्रथमच ऐकल्यामुळें मलाहि फार गंमत वाटत होती. अशा वेळीं वास्तविक इतर सर्व ब्रिगेडनें जसेंचें तसें निजून राहावें,—कारण उठून इकडे तिकडे वावरूं लागल्यास गोळी लागण्याचा संभव अधिक असतो. पिकेटवरील त्या कामाकरितां नेमलेली मंडळी आपलें कर्तव्य बजाविते. आपलें त्या वेळचें जें काम—म्हणजे स्वस्थ निजण्याचें,—

तेंच आपण केले पाहिजे. पण जिज्ञासा ही प्रत्येकाला असतेच ! दर पिकेट-मध्यें पांच सहा शिपाई एका हवालदाराच्या हाताखालीं असतात. त्यांना हुकूम असा असतो, कीं, कांहीं प्रत्यक्ष फायदा होण्यासारखा असल्याशिवाय उगीच बंदुक झाडून गोळया खर्चू नयेत. शत्रु दिसत असला तर नेम धरून मारावा. अदमासानें हवेत गोळया सोडूं नयेत. साधारणपणें हजारांपैकीं एक गोळी काम करते असें म्हणतात. पण पिकेट मधील योद्धे आयत्या वेळीं सर्व विसरतात. व जरा कोठें खुट्ट झालें, कीं, गोळयांचा व्यर्थ एकच मारा करूं लागतात ! बझिआनच्या खिंडींतून तिसऱ्या दिवशी पुढें जावयाचें होतें व तेथे लढाई जुंपेल अशी अटकळ होती. पण दुसऱ्या दिवशीं माझी फार निराशा झाली ! माझी ११६ मराठांतून बदली होऊन परत कर्कुकला जाण्याचा मला हुकूम आला. कदाचित् मराठा पलटणींतून मराठीच डॉक्टर ठेवणें इष्ट नव्हतें म्हणून म्हणा, किंवा मला आदल्या दिवशीं १०४॥ पर्यंत ताप आला असतां मी तसाच 'दडपीत' होतों म्हणून म्हणा. पहांटेस मला ताप भरला. मीं रात्रीं हळूच काडी पेटवून थर्मामीटर पहात असतां शेजारींच निजलेला मेजर जागा झाला, त्यानें तें पाहिलें व सकाळीं कर्नलला सांगितलें. हॉस्पिटलमध्ये पाठवितील व मग लढाई पहाण्याचा योग बुडेल या भीतीनें मी कांहींच बोललों नव्हतों. रात्रीं दिवा लावूं नये, काडी सुद्धां होतां होईल तों ओढूं नये असें युद्धशास्त्र आहे; कारण त्यामुळें शत्रूला कॅम्प ओळखतां येतो.

**लढाई बुडली !**

तारीख १८ जून रोजीं रात्रीं मला इतकी गाढ झोंप लागली होती, कीं, अडीच मैलांवर झालेल्या लढाईच्या गोळीबाराची मला दादहि नव्हती. सकाळीं उठून पाहतों तों बहुतेक ब्रिगेड खिंडीपलीकडे गेली असें कळलें. पहांटे अडीच वाजतांच तिने तिकडे कुच केलें होतें. फील्ड-ॲम्ब्युलन्स वगैरे थोडे लोकच येथे राहिले होते. कांहीं वेळानें जखमी झालेले शिपाई वगैरे खिंडीकडून परत येऊं लागले. कोणाच्या पायाला, कोणाच्या कोंपराला, कोणाच्या पोटांतून अशा गोळया लागलेल्या होत्या. एकाच्या पाठींत एक गोळी रुतून बसली होती. एक गुरखा ऑफिसर होता त्याला दोन गोळया लागल्या अजून त्याला सुरीच्या तीन जखमा झाल्या होत्या. त्यांतील एक मोठी जखम

डोक्यावर होती. त्याचें सर्वांग व कपडे रक्तबंबाळ झाले होते, तरी तो मोठा आनंदी दिसला. एका कुर्दी सैनिकाशीं त्याची प्रत्यक्ष मारामारी झाली होती. शेवटीं गुरखा ऑफिसरने त्या कुर्दी सैनिकाला पळवून लावून त्याचा गोळ्या ठेवण्याचा पट्टा काढून आणला. कुर्द सैन्याचा सेनापति एक शेख महमद म्हणून होता तोहि जखमी होऊन पडलेला सांपडला. आपण कोण हे प्रथम तो सांगेचना ! ' मी एक आपला साधा शिपाई आहे ' असे तो म्हणे ! पण त्याची एकंदर वर्तणूक व रुबाब एखाद्या खानदानींतील सरदाराप्रमाणें होता. आम्हीं दिलेल्या अन्नाला तो नाक मुरडीत असे आणि एकदां तर पाणी पिण्यास ग्लासच पाहिजे असा हट्ट धरून बसला. त्याच्याजवळ दोन काडतुसें उरलीं होतीं. या शेखाच्या लिव्हरमधून एक गोळी गेली होती व दुसरी पायाला लागली होती. बगदादला याची पुढें चौकशी होऊन त्याला हद्दपारीची शिक्षा झाली व त्याला हिंदुस्तानांत पाठविण्यांत आले, असे म्हणतात. आणखी एक कुर्द शिपाई होता त्याच्याहि पोटांतून गोळी गेली होती, पण बेटा धट्टयाकट्टया माणसासारखा पोळी व डाळभात चापून बडवी !

त्याच दिवशी दुपारी जखमी सैनिकांचें लटांबर खटाऱ्यांत चढवून खिंडो-पलीकडे टेंकड्यांच्या मध्यभागीं तळ देऊन बसलेल्या ब्रिगेडला जाऊन आम्हीं मिळालों. जखमी व आजारी लोकांच्या वाहतुकीसंबंधीं एकाने सांगितलेली गोष्ट बोधप्रद आहे म्हणून ती येथें देतों. एकदां कमांडर इन् चीफ साहेबबहादुरांची खुद्द स्वारी थोडी आजारी पडली, व त्या वेळीं ' अडचण ' असल्यामुळें त्यांच्या वाट्याला खटाऱ्याचें वाहन आले. त्यांनीं मोटार ॲम्ब्युलन्सचा हट्ट घेतला. पण त्यांना डॉक्टरनें सांगितलें, कीं, विशेष आजारी व जखमी लोकांना मोटार ॲम्ब्युलन्सची अधिक जरूरी असल्यामुळें आपली सोय खटाऱ्यांत करावी लागत आहे, याबद्दल दिलगिर आहें ! बहुशा थाप !

### ब्रिगेडचा मार्च

एकंदरींत मार्चिंगमध्यें मजा म्हटली तर मजा असते, त्रास म्हटला तर त्रासहि असतो. कॉलममध्यें जितकीं युनिट्स् म्हणजे पलटणी वगैरे कमी, तितका तो मार्च सुखावह होतो. पण अगदींच एखादी पन्नासांचीच तुकडी असेल तर कंटाळवाणें वाटतें. सायकल्-ट्रिप सारखेंच हें आहे. अगदीं दोघेच सायक्लिस्ट असले तर प्रवास झरदिशीं होतो; पण चांगली करमणूक होत

नाही. अडी–अडचणीला आणखी सायकल–स्वार असले तर एकमेकांना एकमेकांचा उपयोग करून घेतां येतो. उलट जितके स्वार अधिक तितके अडथळे अधिक येतात. कधीं याला 'पंक्चर' झालेसें वाटल्यामुळें तो उतरतो, तर कधीं कोणाची 'चेन' च निघते. असे करीत करीत फार उशीर होतो. तद्वत्‌च ब्रिगेडबरोबर मार्च करावयाचा म्हणजे मधेंमधें खोळंबा फार होतो, व त्यामुळें थोड्या मैलांचाच प्रवास होऊं शकतो, व जीव थकून जातो. ताशीं चालणें तीन मैल–सतरा मिनिटांला एक मैल याप्रमाणें–व दहा मिनिटें विश्रांति असा क्रम असतो. एक ब्रिगेड म्हणजे सरासरी चारपांच हजार लोक असतात. यांत ब्रिगेडिअर जनरल व त्याचा स्टाफ ऑफिसर आणि इतर मदतनीस व नोकर; एक गोरी व तीन हिंदी पलटणी असतात. पांच शिपायांच्यावर एक हवालदार मिळून एक सेक्शन होतो. पन्नास शिपायांचें एक प्लॅटून व त्यावर एक इंडिअन ऑफिसर असतो. चार प्लॅटून्स म्हणजे एक कंपनी, यावर एक ब्रिटिश ऑफिसर असतो. चार कंपन्या मिळून एक रेजिमेंट. याचा मुख्य, कमांडिंग ऑफिसर. त्याच्या हाताखालीं एक सेकंड्–इन् कमांड; एक ॲड्ज्युटंट, सेक्रेटरीप्रमाणें सर्वसाधारण काम पहाणारा; एक क्वार्टर–मास्टर, कोठीवाल्याचें काम पहाणारा; एक ट्रॅन्सपोर्ट ऑफिसर, वाहतुकीचें काम पहाणारा; व एक मेडिकल ऑफिसर. शिवाय शक्य असल्यास एक सिग्नल



अड्जुटंट जमादार, सुभेदार-मेजर व क्वार्टर-मास्टर जमादार
(८७ पंजाबी)

ऑफिसर. हे सर्व मिळून, एका रेजिमेंटमध्यें लेफ्टनंट कर्नलच्या रांगेचा एक, मेजर एक, कॅप्टन्स् पांचसहा, लेफ्टनंट चारपांच, व सेकंड लेफ्टनंट चार पांच, मिळून पंधरा सतरा ब्रिटिश ऑफिसर असतात; पण लढाईच्या वेळीं बहुतकरून ऑफिसरांच्या दुर्मिळतेमुळें एकाच ऑफिसरला निरनिराळीं कामे करावीं लागतात. कित्येकदां पांच सहा ऑफिसरांवरच सर्व पलटणीचा भार पडे. एकदां तर आमचे दोन ऑफिसर जखमी झाल्यामुळे व बाकीचे तीन हॉस्पिटलमध्यें गेल्यामुळें एक कॅप्टन व एक मी असे दोघेच शिल्लक राहिलों होतों! ब्रिटिश ऑफिसर म्हणजे राजानें नेमलेला व इंडिअन ऑफिसर म्हणजे व्हॉइसरायनें नेमलेला. इंडिअन ऑफिसर सर्व हिंदीच असतात, पण ब्रिटिश ऑफिसरांमध्यें थोडे हिंदी लोक आहेत. त्यांना जे एकदा ब्रिटिश ऑफिसर नांव पडलें आहे तें पडलें आहे! इंडिअन ऑफिसर सुमारें दहा असतात. प्रत्येक प्लॅटूनवर एक जमादाराच्या रांगेचा, एक अॅड्ज्युटन्ट जमादार, एक जमादार व एक सुभेदार किंवा सुभेदार मेजर. हा बहुतकरून रिटायर व्हावयाच्या बेतांत आलेला असतो. याचें काम साधारणपणें शिपाई वगैरेंच्या बाबतीत कर्नलला सल्लामसलत देण्याचें असतें. कारण तो वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध असून पुष्कळ अनुभवशीर असतो. त्याची छाती बहुतकरून रिबन्सनीं भरलेली असते. प्रत्येक ऑफिसरला एक आर्डर्ली असतो. ब्रिटिश आफिसरला एक एक घोडा असतो. इंडिअन ऑफिसरला घोडा नसतो, पण आर्डर्ली त्यांनाहि मिळतो. ब्रिटिश रेजिमेंटमधील त्याच दर्जाच्या ब्रिटिश ऑफिसरला घोडा देतात. ऑफिसरानें वाटल्यास आपला खाजगी नोकर आणावा. कर्नलच्या नांवाचे दोन आर्डर्ली व दोन घोडे असतात. वाट चालतांना कर्नल, सेकंड इन कमांड, अॅड्ज्युटंट व मेडिकल ऑफिसर हे पुढें; त्या त्या कंपनी–कमांडरच्या मागे ती ती कंपनी, व त्या कंपनींतील प्रत्येक प्लॅटूनपुढें तिचा इंडिअन ऑफिसर, नंतर फॉलोअरचा तांडा, म्हणजे मेहेतर, पाणके वगैरे, अशी नेहमींची ठरलेली पद्धत असते. कर्नल, अॅड्ज्युटंट, मेजर व मेडिकल ऑफिसर हे देखरेखीकरितां मागे पुढें फेऱ्या करतात. यांच्या मागून रेजिमेंटचा ट्रॅन्सपोर्ट, म्हणजे सुमारें बावीस खेंचर–खटारा असतो. त्यांत रेजिमेंटचें सगळें सामान असतें. म्हणजे शिपायांच्या किट्बॅग्ज, ऑफिसर्सचें सामान, जेवणाचीं भांडीं व दोन तीन दिवसांचें अन्न. सगळ्याच्या मागें डोली–बेअरर,

औषधांच्या पेट्याकरितां दोन चार स्ट्रेचरें, असल्यास ॲम्ब्युलन्स गाडी, ड्रेसर, वगैरे. अशा थाटांत मग पलटण चालते. शिवाय प्रत्येक कंपनींत पांच सहा स्ट्रेचरें-ॲम्युनिशन्, सिग्नलची तार वगैरे-सामानाकरितां असतात. स्ट्रेचरांना मध्येंच उधळण्याचा फार नाद असतो.

याशिवाय ब्रिगेडबरोबर शंभर दीडशें गाड्या सप्लायच्या म्हणजे अन्न, सर्पण वगैरे सामानाच्या असतात. त्या सर्वांच्या मागे ठेवतात. त्यावर एक ऑफिसर व कांहीं स्टाफ असतो. वाटेनें जातांना सिग्नल सेक्शन म्हणून असतो तो मागच्या ठाण्याहून निघाल्यापासून पुढच्या मुक्कामावर जाईपर्यंत वाटेच्या कडेनें टेलिफोनची तार टाकीत जातो. यावरहि एक सिग्नलिंग ऑफिसर व इतर मदतनीस असतात. तसेंच एकदोन दुभाषेहि ब्रिगेडबरोबर असतात. एक मशिनगन सेक्शन व दोनचार तोफांचा ( रॉयल फील्ड आर्टिलरीचा वगैरे ) एक सेक्शन असतो. तोफांना अर्थात् फार जपतात. त्यांच्याबरोबर मुद्दाम एक सेक्शन गार्ड नेमतात. वायरलेस कंपनीहि असते. सॅपर्स-मायनर्सचेहि कांहीं लोक असतातच.

या ठिकाणी ओघानें एक गोष्ट येते. प्रत्येक युनिटमध्ये अशी व्यवस्था व सोय असते, कीं, युनिट सेल्फ-सपोर्टिंग व्हावें; म्हणजे रोजचे व्यवहार व आपलें काम करण्यास ज्या गोष्टी अगर साधनें लागतात तीं त्या युनिटमध्ये ठेवतात. तात्पर्य दुसऱ्याची मदत होतां होईतों लागूं नये. किंबहुना युनिट या शब्दाचा अर्थच असा आहे. उदाहरणार्थ, हॉस्पिटल असलें तरी रेजिमेंटमध्ये एक डॉक्टर असतो. तसेंच रेजिमेंटमध्यें एक सिग्नल ऑफिसर म्हणून ठेवतात. त्याच्या जवळ तार, टेलिफोन, पताका, आरसे वगैरे खुणांनीं बोलण्याचें सामान असतें. रेजिमेंटमध्यें एक मोची, एक कारागीर, एक मेस्त्री, व एक धोबी असे लोक असतात. म्हणजे कोणेंहि कशावांचून काम अडूं नये, यासाठीं ही व्यवस्था केलेली असते. यांतील कांहीं खरे शिपाई पण निरनिराळ्या कला येणारे असतात.

अशा लव्याजम्यानिशीं ब्रिगेड निघते. एकदां ती चालू झाली म्हणजे साधारण तिची लांबी दीड-दोन मैल होते. कारण चालतां चालतां साहजिकच मध्यें अंतर तुटत जातें. यामुळें निघण्याची वेळ जर पहांटे पांचला असली तर पुढचे स्काउट ( हेर ) निघाल्यापासून पाठीमागच्या ( रिअर ) गार्डला हालावयाला साडे-पांच होऊन जातात ! तसेंच पुढच्या लोकांना थांबण्याचा हुकूम होऊन

त्यांची विश्रांतीची वेळ संपून पुनः चालूं लागण्याचा हुकूम मिळाला तरी मागचे लोक त्यांना जाऊन मिळण्याकरितां अजून चालतच असतात. अशा वेळीं पुढच्या व मागच्या लोकांना पताकांच्या ( फ्लॅग ) सिग्नलनें निरोप कळवितात. ऑफिसरांना घोडे असले तरी अशा तऱ्हेनें थांबत थांबत हळुहळू घोड्यावर बसून जाणें फार त्रासाचें व कंटाळवाणें होतें व ऑर्डर्लीजवळ घोडा देऊन पायीं चालणेंच सोयीचें पडतें. त्यांतून शत्रूकडून मधूनच आडून गोळीबार होत असला ( स्नायपिंग ) तर घोड्यावरून जाणें धोक्याचेंहि असतें. कारण आपण उंच झाल्यामुळें लांबून शत्रूला दिसतों. साहेबी टोपीवर या शत्रूंचा फार कटाक्ष असे! एखाद्याचा घोडा दुर्दैवानें पांढरा असला तर फारच फजीती. माझी घोडी चोरीस गेल्यामुळें माझ्या नशीबीं एकदां पांढरा घोडा आला होता. पहिल्या सहा गोळ्या येईपर्यंत मीं घोड्यावरच बसावयाचें ठरविलें होतें. सातवी गोळी आली, की, मी खालीं उतरत असें! मी आपल्याकडून अशीहि 'खुबी' करी, कीं, घोड्याच्या जवळून चालण्याचा प्रसंग आला तर घोड्याला अगदीं खेटून जावें. वरवर पाहिलें तर असें करणें धोक्याचें दिसेल, कारण पांढरा घोडा हा शत्रूला चांगलेंच लक्ष्य असल्यामुळें नेमकी आपल्याला गोळी लागण्याची भीति असते. पण असाहि अनुभव आहे, कीं, मैल–अर्ध्या मैलावरून नेम धरून मारलेली गोळी क्वचितच नेमकी लागते, उलट खात्रीनें चुकावयाची! सहज उडविलेली गोळी कदाचित् कोणाला तरी हटकून लागेल! घोड्यापासून थोड्याशा अंतरावर उभे राहणें म्हणजे चुकलेला नेम नेमका आपल्या अंगावर लावून घेणें होय! घोडा असणें हा मनाला आधार आहे. मात्र तितका तो उपयोगांत आम्हीं आणीत नव्हतों; आम्हीं पायींच जात असूं.

हिंदी पलटणींतील प्लॅटून कमांडरचें काम करणाऱ्या इंडिअन ऑफिसरला ७५–१५० रुपये पगार असतो, हेंच काम करण्यास गोऱ्या रेजिमेंटमध्यें ब्रिटिश ऑफिसर असतो, त्याचा पगार ३००–३५० रुपये असतो. ( आंकडे अजमासें दिले आहेत. ) हिंदी शिपायाचा पगार ११, भत्ता ५ व वर इकडून तिकडून ( चांगल्या वर्तणुकीबद्दल वगैरे ) मिळून, १७–१८ रुपये होतात. गोऱ्या सोल्जराचा पगार ३० पर्यंत असतो. हवालदाराला सुमारें २५, सार्जेंटला ६०–७०. गोऱ्याला उन्हाळ्यांतील प्रवासांत वाटखर्च दीड रुपया तर 'काळ्याला' आठ आणे! सोल्जरला बर्फ व फसफसणाऱ्या पेयांकरितां आठ

आठ आणे देतात. काळयाला ऊष्णतेची संवयच असते ! थंडीच्या दिवसांत गोऱ्याला रोज दोन औंस रम् ( मदिराविशेष ) मिळे व काळयाला आठवड्यांतून दोन दिवस, एक औंसावर थंडी उबवावी लागे. ( मुसलमान लोक दारू पीत नाहींत, पण तंबाखू ओढतात. शीख लोक दारू पीत पण तंबाखू अब्रह्मण्यम् समजत.) फॉलोअर लोकांना जवळ जवळ शिपायाइतका-किंबहुना थोडा अधिकच पगार मिळतो पण त्यांचें रेशन ( खाणे ) कमी प्रतीचें असते. क्लार्क वगैरे लोकांना फॉलोअरमध्येच धरतात ! पण त्यांना पगार सरदारांप्रमाणे ( म्हणजे इंडिअन ऑफिसरप्रमाणे ), व खाणे ( वाटल्यास ) सोल्जराप्रमाणे, इतर बाबींत फॉलोअर-प्रमाणें वागविण्यांत येते. केव्हां स्वत:चे सामान डोक्यावरून वाहण्याचा प्रसंग त्यांच्यावर येतो ! पुष्कळदां असें होतें, कीं, एखाद्या सेकंड लेफ्टनंटला पगार ३५० च असतो, पण अमुक भत्ता, तमुक भत्ता मिळून ' काळ्या ' कॅप्टनच्या-पेक्षां अधिक पैसे तो काढतो. अलावन्सच्या जागा ' काळयां ' ना क्वचित्च मिळावयाच्या !

### मद्य व उन्हाचा मारा

माझा असा समज होता, कीं, इंग्रज लोकांना कडक थंडी आपल्याइतकी जाचक होत नसेल. कारण त्यांना संवय असते. हा समज कांहीं अंशींच खरा आहे. कारण इंग्लंडमध्यें जरी फार थंडी असली तरी तेथे तन्निवारणार्थ सोयी पुष्कळ आहेत. स्टव्हज; हार्थस् ; खोल्या, पलंग, वगैरे गरम राखण्याकरितां वीज; इत्यादि. पण फील्ड सर्व्हिसवर, त्यांतून ऑपरेशनमध्यें हे कोणतेच लाड सहसा चालत नाहींत ! इतकें मात्र खरें, कीं, आपल्यापेक्षां त्या लोकांना उन्हाळा जास्त बाधतो. कित्येक तज्ञांच्या मतें याचीं कारणें म्हणजे एक तर त्यांना संवय नसते व शिवाय ते लोक दारू पितात. सर व्हिक्टर हॉर्सले म्हणून एक मोठा मेंदूचा शस्त्रवैद्य होता, त्याविषयीं आमच्या कर्नलनें एक गोष्ट आम्हांस सांगितली. सर व्हिक्टर म्हणे, कीं, ' हीट-स्ट्रोक ' वगैरे उष्णतेमुळें होणारे रोग दारू प्याल्यामुळेंच अधिक बाधतात. दारूला शिवलें देखील नाहीं तर हीट स्ट्रोक होणें शक्यच नाहीं. असें म्हणूनच तो थांबला नाहीं. ( तो दारूचा कट्टा वैरी होता. ) मुद्दाम तो उघडया डोक्यानें उन्हांतून फिरे. उद्देश इतकाच, कीं, दारूला स्पर्श केला नाहीं तर हीट-स्ट्रोक होणें अशक्य असें त्याला सिद्ध करावयाचें होतें. पण दुर्दैवानें त्या थोर पुरुषाचाहि हीट-स्ट्रोकनेंच अंत झाला ! यामुळें कोणतीच गोष्ट

सिद्ध झाली नाहीं! दारू प्याल्यामुळेंच हीट-स्ट्रोक होतो हें खोटें ठरलें व दारू न प्याल्यास हीट-स्ट्रोक होत नाहीं हेंहि खोटेंच ठरले! यांत येवढेंच दिसलें, कीं दारू प्या किंवा पिऊं नका, निदान डोक्यावर छाया नसली तर हीट-स्ट्रोक होण्याचा संभव अधिक. म्हणूनच या तंबूतून शेजारच्या तंबूंत जावयाचें असलें तरी डोक्यावर टोपी वगैरे शिरस्त्राण चढवून जाण्याची नेहमीं खबरदारी घेतली जाते, व असे केलं नाहीं तर वरिष्ठाकडून बोलणें बसते.

मिलिटरी साहेबांस बहुतेक दारू पिण्याची संवय आहे. नाताळ व इतर सणाचे दिवस किंवा विशेष प्रसंग सोडून साधारणपणें मित प्रमाणांतच तिचें सेवन केले जातें. दारूला न शिवणारा मनुष्य शपथेलासुद्धां क्वचितच सांपडतो. किंवा शपथ घेणारा सांपडेल पण दारू न पिणारा विरळाच! सर्व साहेब एक-जात धूम्रपान करतात, तरी धूम्रपान न करणारे साहेब सांपडतील, पण मदिरापान न करणारा साहेब सांपडणें कठीण! मला आश्चर्य वाटे, कीं, बीअरच्या चारचार पांचपांच बाटल्या त्यांच्या पोटांत मावतात तरी कशा? एक बीअर-बॅटल म्हणजे साधारण स्पिरिटच्या बाटलीएवढी असते! तसेंच रात्रीं भोजनोत्तर विशेष प्रसंगीं गप्पा छाटीत अगर पत्ते वगैरे खेळत बसलें म्हणजे दारू व त्याबरोबर पांचसहा सोड्याच्या बाटल्या ते सहज पीत!

आमचा कर्नल नेहमी म्हणे, कीं, यूरोपियन रेजिमेंटपेक्षां हिंदी रेजिमेंटमधील लोक कितीतरी काटक व दमदार असतात. एकादा मार्च झाला, कीं, गोरा शिपाई गळून जातो. पुढे कॅपांत तंबू ठोकणें, चर खणणें, अशीं मेहनतीचीं कामें करावयाला त्याला अवसानच रहात नाहीं. हें झाले ज्या त्या रेजिमेंटचें काम. शिवाय ब्रिगेडकरितां कांहीं अन्य कामे करावयाचीं असतात.—जसें पिण्याच्या पाण्याचा बंदोबस्त, ब्रिगेडभोंवतीं खंदक करणे, झाडे तोडणें, इत्यादि:—अशा कांहीं प्रसंगीं गोऱ्या रेजिमेंटकरितां झोंपडीवजा छाया करण्याचें काम हिंदी लोकांवर येऊन पडे, म्हणून कर्नलला गोऱ्या लोकांच्या या लाडाबद्दल फार राग येई!

## एक हृदयद्रावक देखावा

कांहीं गोष्टी अशा असतात, कीं, त्या प्रत्यक्ष पाहिल्या तरच त्यांचा मनावर परिणाम होतो, नुसत्या ऐकून कांहींच वाटत नाहीं, तर कित्येक गोष्टींचें याच्या

उलट होतें. गोळीबार चालू असतांना ऐन माऱ्यांत सांपडलेल्या मनुष्याची मनःस्थिति कशी असेल याची, येथें बसून त्या गोष्टी ऐकत असतांना आपली जी कल्पना होते, तितकी भयंकर मनःस्थिति त्या मनुष्याची त्यावेळीं नसते. उलट एखादा मनुष्य प्रत्यक्ष वर्मी गोळी लागल्यामुळें खाली पडत असतां पाहिला म्हणजे जो देखावा दिसतो त्याची नुसतें ऐकून कल्पना करतां यावयाची नाहीं. बझिआनच्या डोंगरावर जो एक हृदयद्रावक देखावा मीं पाहिला तो मीं कधींहि विसरणार नाहीं. आम्ही बझिआनला पोहोंचल्यावर थोड्याच वेळानें पश्चिमेच्या टेंकडीकडून कोणीतरी मनुष्य मोठमोठ्यानें हेल काढून रडत असल्याचा आवाज ऐकूं येऊं लागला. त्याच दिवशीं पहांटे बझिआनच्या खिडींत लढाई झालेली होती. "कोणी जखमी मनुष्य—आपला किंवा शत्रूपैकीं—ओरडत असेल तर पाहून त्याला घेऊन ये," असा कर्नलनें मला हुकूम केला व सोबतीकरितां दोन ऑर्डर्ली घेऊन जाण्यास सांगितलें. आम्ही होतों तसेच कानोसा घेत घेत तीन वाटांनीं तिघे निघालों. वाटेंत दोन-तीन ठिकाणीं गोळ्या लागून मरून पडलेले कुर्द दिसले. त्यांची युद्धसामुग्री म्हणजे एक जंबियासारखी सुरी, काडतुसांचा पट्टा, (बंदुक त्यांच्या सोबत्यांनीं नेलेली असावी,) व रंगीबेरंगी हातरुमालांत बांधलेल्या दोन लठ्ठ पोळ्या (खुब्ज). बेताबातानें यापैकीं कोणाला धुगधुगी आहे कीं काय तें आम्हीं पाहिलें! पहात पहात आम्ही बरेच दूर गेलों. (धोका असल्यामुळें व आम्हीं पिस्तुल, रायफल वगैरे कांहींच बरोबर आणलें नसल्यामुळें आम्हीं एकमेकांना दिसूं इतक्या अंतरावरून चाललों होतों!) या ठिकाणीं कमरेइतकें उंच वाळलेले गवत होतें. वाटेंत कुर्दांनीं टाकलेल्या किंवा पडलेल्या बऱ्याच जिन्नसा दिसल्या. आणखी थोडे पुढें गेल्यावर एक जखमी घोडा मरून पडलेला दिसला. पुढें एक वणवा भेटला, व त्या वणव्यापासून पांच-सात फुटांच्या अंतरावर दुसरा एक घोडा जमिनीवर पडलेला दिसला! अर्थात् तो घोडाहि मेलेलाच असेल असें मला वाटलें. नाहीं तर त्या वणव्याच्या ज्वालांच्या इतक्या जवळ तो कसा राहील? पण घोडा जिवंत होता! त्याचा पुढचा उजवा व मागचा डावा असे दोन पाय गुडघ्यापाशीं तुटलेले—म्हणजे पार नायनाट झालेले होते. त्यामुळें अर्थात् त्या घोड्याला तेथून उठतां येणें शक्य नव्हतें! बहुतकरून वणव्यापासून लांब जाण्याकरितां त्यानें खूप खटपट केली असली पाहिजे असा तेथील खाणाखुणां-

धरून मीं तर्क केला. व शेवटीं अंगांत मुळींच ताकद न उरल्यामुळें तो घोडा निचेष्ट पडला होता! त्याच्या दुर्दैवानें वाऱ्याची दिशा त्याच्याच बाजूनें होती. ती आग घोड्याजवळ आली व त्याच्या पाठीवर मधूनच ज्वाळा जाऊं लागल्या. त्याला तेथून उठविण्याचा आम्हीं पुष्कळ प्रयत्न केला, पण तो थोडें फरफटत रांगण्याचा प्रयत्न करी व पुनः निचेष्ट पडे. त्याला उचलून बाजूला ठेवण्याचा आम्हीं यत्न केला, पण तें जमेना व ज्वाळा अधिकच जवळ येऊं लागून आमचे कपडे पेटण्याची भीति पडली. बरें त्याला गोळी घालून ठार करावें तर आम्हीं बंदुका वगैरे कांहींच आणलें नव्हते. हुकूम मिळाल्याबरोबर होते तसेच चालूं लागलों होतों. अखेर त्या पंगु प्राण्याला तसाच अग्नीच्या जबड्यांत टाकून आम्हांला आपला मार्ग धरावा लागला! या घोड्याच्याच ओरडण्याचा तो केविलवाणा शब्द होता.

लढाईच्या दिवसांत मुलांच्या पोटापाण्याकरितां भत्ता मिळत असे. पहिल्या मुलाला अमुक रुपये व पुढें प्रत्येक मुलामागें अमुक. ( कांहीं पाश्चात्य देशांत आतां लग्न करण्याबद्दल बक्षिसें देण्याचा विचार झाला आहे; निदान लग्नाचें वय असून अविवाहित राहिल्यास दंड ठेवणार आहेत असें म्हणतात. ) म्हणजे प्रथम लग्न करण्याबद्दल बक्षिस, मग मुलें होण्याबद्दल भत्ता व लढाईच्या वेळीं बायकोपासून दूर रहावें लागतें म्हणून सध्यां 'विरहभत्ता' ( Separation allowance ) मिळतच असे!

हॉस्पिटलमध्यें किंवा फील्ड ॲंब्युलन्समध्यें मेडिकल ऑफिसरांना माहेरघरा-सारखें वाटतें. तेंच रेजिमेंटमध्यें वगैरे फार परकेपणा वाटतो. हॉस्पिटलमध्यें तो आपल्याच वातावरणांत असतो, पण लढवय्या ऑफिसर्समध्यें त्याचें इतकें जमत नाहीं. पण शिपायाची ओळख व्हावयाला रेजिमेंटसारखें साधन नाहीं. प्रत्यक्ष लढाई, आघाडीवरील खंदक, लष्करांतील खुब्या, डावपेच, शिस्त वगैरे लष्करसंबंधीं सर्वसाधारण व विशेष माहिती रेजिमेंटमध्यें राहूनच होते. पण हालहि अधिक असतात. हॉस्पिटलमध्यें चैन करावयास सांपडते.

साहेब लोकांत अभिमान व कर्तव्यदक्षता हे गुण विशेष दिसून आले. मी नोकर खरा, पण जे काय माझ्याकडे सोंपविण्यांत आलें आहे त्याचा मी राजा आहें अशी त्यांची भावना असते. दुसऱ्याच्या नसत्या भानगडींत ते सहसा पडत नाहींत. व आपल्या कामांत दुसऱ्याला लुडबुडूं देत नाहींत.

तांबड्या ग्लासांत पाणी ओतलें तर तें तांबडें दिसतें, निळ्या ग्लासांत निळें दिसतें. तद्वत् साहेब आफिसांतील टेबलावर बसला, कीं, 'बिझिनेस'च्या बाहेरचें जग त्याला दिसत नाहीं. तो कामांत तद्रूप होऊन जातो. टेनिसकोर्टावर गेला, कीं, तो खेळखेळ खेळतो. खाना खातांना तल्लीन होतो. ज्यांत असतील त्यांत ते मग्न होऊन जातात. आयुष्य उपभोगाव कसें हें त्यांच्यापासून शिकावें. समरांगणावर किंबहुना आपल्याहि शक्य असेल तितकी ते मजा करतात. गैरसोयीत सोय करून घेणें इकडे त्यांचें फार लक्ष असतें. वेळ आली म्हणजे युक्त्याहि सुचतात. केरोसीन किंवा पेट्रोलच्या खोक्यांच्या पेट्या यांचीं टेबलें खुर्च्या बनविणें, गवताला बांधून आलेल्या तारांचा निरनिराळ्या ठिकाणीं उपयोग करून घेणें, विटा पाडून घरें उभारणें, वगैरे उद्योगधंदे त्यांचे नेहमीं चाललेले असतात. साहेब लोक मोठे खेळाडू. हॉकी, फुटबॉल वगैरे खेळ खेळण्याची सोय ते करून घेत. थंडीच्या दिवसांत आम्हीं दुपारीं दोन वाजल्यापासून हॉकी फुटबॉल वगैरे खेळत असूं. तसेंच थोडे दिवस मोडक्यातोडक्या बॅटीने रस्तेवजा कोर्टावर टेनिसहि खडविलें व तेंहि लढाईच्या धामधुमींत! शिपायांशीं खेळण्यांत एक तऱ्हेची मौज वाटते. कॅपांत शत्रूंच्या गोळ्या येत असल्या तरी ब्रिज वगैरे खेळ चालूच असावयाचे.

युद्ध ग्रस्त प्रदेशांत कामाच्या व जागेच्या इतक्या वेळां बदल्या होतात, कीं, कोणत्याहि एखाद्या ठिकाणीं सतत महिना-दीड महिना रहावें लागले, तर आतां बदलीचे दिवस जवळ आले आहेत असें समजावें. कर्मकला माझेंहि तसेंच झालें. जवळजवळ दोन महिने याच गांवीं मी (फील्ड ॲम्ब्युलंस) मध्यें कामाला होतों व मला पूर्व अनुभवावरून कळून चुकलें, कीं खास आतां कोठेंतरी माझी बदली होणार. लवकरच मला चमचमालला ८७ पंजाबींत नेमलें. एकाच ठिकाणीं आपलेपणा वाटूं लागण्याइतके जास्त दिवस कोणालाहि ठेवीत नाहींत!

### चमचमाल

सरता जून होता. त्या दिवसांत तेथे धुळीचीं भयंकर वादळे होत. त्यांतून आम्ही टेंकडीवर रहात होतों. चमचमालला माझी खोली मोठी अजब होती. आठ फूट लांब व सहा फूट रुंद. आंत शिरलें म्हणजे उजव्या हाताच्या भिंतींत

एक दरवाजा होता. पण त्याला दारें नसल्यामुळें एक धुळीनें माखलेला फाटका-तुटका चिकाचा पडदा अर्धवट लावला होता. पलीकडच्या खोलीत असेंच एक ऑफिस होतें व सिग्नलच्या टेलिग्राफचा 'पीं-पीं-पिप' असा बारीक कर्कश आवाज सारखा ऐकूं येई. आंत जाण्याच्या दाराला दरवाजे नसल्यामुळें मी एक ब्लॅंकेट बांधले होतें. पण उलट ते वाऱ्यामुळे फडफडून जास्तच धूळ उडत असे. जमिनीवर अर्धा-पाव इंच धुळीचा थर. सारखी नाकातोंडांत धूळ जाई. पत्र लिहावयास बसलें तर दर पंधरावीस सेकंदांला 'फू-फू' करून कागदावरील धूळ उडवावी लागे, तरी फाउंटन पेन खरखरत असे. अशी धूळ मी पूर्वी कधींहि कोठें पाहिली नव्हती ! वारा असा सोसाट्याचा, कीं, तोल संभाळून चालणें अवघड पडे. बगदादसारखी चिखलाची खडी व चमचमालसारखें धुळीचें वादळ मी अन्यत्र पाहिले नाहीं. तीं उपमान करावयास योग्य आहेत.

कर्कुकला असतांना मी एकदां नित्याप्रमाणें पहांटे उठून कांहीं वाचीत बसलों



कुर्दी नाच, अर्बिल

असतां मेजर मजकडे आला व म्हणाला, कीं, किल्ल्यांत शिवण्याचें साहित्य

घेऊन एका इंडिअन ऑफिसरला पहावयास ताबडतोब जा. " मी तसाच उठलों व जखम वगैरे झाली असेल अशा समजुतीने सुई, टांके वगैरे साहित्य घेऊन गेलों. पहातों तों एका मोठ्या लांबलचक हॉलसारख्या बराकींत एका सरदाराचें प्रेत पडलें आहे असा देखावा माझ्या दृष्टीस पडला ! त्याच्या पोटांत कोणी सुरी खुपसल्यामुळें आंतडीं बाहेर आलेली होतीं व एकदोन ठिकाणीं गोळ्या लागल्या होत्या ! त्याचे टांचण घेऊन व ते मेलेलेच पोट शिवून मी परत गेलों. पुढें चमचमालला गेल्यावर मला ' समरी जनरल ' कोर्टमार्शलपुढें साक्ष देण्याकरितां बायजी गांवास बोलाविलें. त्यावेळीं जशी माझी त्रेधा झाली अशी पूर्वीं क्वचित्च झाली असेल. मला वाटले आतां फेर तपासणींत आडवेतिडवे प्रश्न करतील. ' रेफरन्सला ' एकहि योग्य पुस्तक तेंथ नव्हते व इतर ऑफिसरांना तितपतच माहिती होती. मी जीव मुठींत धरून बायजीस गेलों. पण शेवटीं कांहींच झाले नाहीं. कोर्टमार्शलचा थाट पहाण्यासारखा असतो. पाहूनच एक प्रकारची भीति वाटते. मी आपले टांचण काढून पारिभाषिक शब्दांत वर्णन करून सांगूं लागलों. पण त्यांनीं मला आवरतें घेण्यास सांगून थोडक्यांत व सोप्या भाषेत सारांश लिहून घेतला ! उलट चार-पांच दिवस मग त्यांतच चैनींत गेले !

त्या ठिकाणीं मी गमतीनें पिस्तुल, बंदुक व लुइस-गन्‌ची प्रॅक्टिस करण्यास जात असें. पुढे बगदादला असतांना रेजिमेंटच्या ऑफिसर्सबरोबर मलाहि रिव्हॉल्व्हर प्रॅक्टिसचें सशास्त्र शिक्षण देण्यांत आलें.

लढाई जिंकण्याचें श्रेय गोळ्यांना जितकें देतां येईल तितकेंच खेंचरें व फॉलोअर लोकांना दिलें पाहिजे, असें मोठमोठे ऑफिसरसुद्धां म्हणतात. या प्राण्यांनीं जी कामगिरी केली आहे ती दिसून येत नाहीं, पण लढाई जिंकण्याच्या कामीं त्यांनीं मोठाच हातभार लावला आहे. खेंचरासारखें कष्टाळू जनावर नाहीं, व फॉलोअर लोकांसारखे श्रमाळू व एकनिष्ठ सेवकहि क्वचित्च सांपडतील. या लोकांचे हाल किती होतात आणि त्यांना किती कष्टमय काम करावें लागतें, याची कल्पनाहि करतां येणार नाहीं ! भिस्ती म्हणजे पाणके यांची कर्तबगारी वाखाणण्यासारखी असते. त्यांना एक गोष्ट माहित-ती ही, कीं, पहांटे उठून पाणी आणावयाला लागावयाचें. त्यांना कोणी वाट दाखवावयाला लागत नाहीं, सोबत लागत नाहीं-कावड खांद्यावर टाकली कीं चालले.

आघाडीवर यांना फार धोका असतो. कारण पाण्याच्या जागेवर शत्रू अगदी टपून–नेम रोखून बसलेला असे. पण त्याचें यांना कांहीं नाहीं. उठतात व चालूं लागतात. सारख्या गोळ्या येत असल्या तरी त्यांची यांना दादहि नसते. गोळ्याच जेव्हां आपली दाद लावून घेतील तेव्हां! एकदां असाच एक भिस्ती नदीवर पाण्याकरितां गेला असतां त्याच्या पायाला एक मोठी बोथट गोळी लागून त्याची तंगडी पार फुटून गेली व मांसाच्या चिंधड्या झाल्या! त्याच्या त्या तंगडीचा देखावा मी कधीहि विसरणार नाहीं! खरोखर या लोकांची शाबास आहे.

चमचमालहून मजल दरमजल करीत पायींच कर्कुकवरून **अर्बिल** गांवास



कुर्द मुली जळण नेत आहेत, अर्बिल

गेलों. या सबंध ९२ मैलांच्या प्रवासाला सात दिवस लागले. अर्बिलला दीड दोन महिने राहून पुनः कर्कुकवरून किंगरबान नांवाच्या रेलहेडला गेलों अर्बिलपासून किंगरबान १३२ मैल होईल. या ठिकाणीं यावयाला मध्यें एक दिवस विश्रांति घेऊन नऊ दिवस लागले. वाटेनें ताजा, टाक, टुझ अशीं गांवें लागलीं. सगळ्यांत जास्त एकाच सकाळीं २२॥ मैल चाललों. सरासरी रोज

चौदा पंधरा मैल पडत. रात्रीं किगरबानला आगगाडींत बसून बगदाद वेस्ट हिनायडी स्टेशनवर सकाळीं उतरलों. वाटेंत ‘ दयाला ’ नदी ओलांडली.

## लष्करी जीवन

लष्करांत राहण्याची एकदा संवय झाली म्हणजे असें वाटूं लागतें, कीं, या जगांत शिपाई आणि बंदुक याखेरीज कांहींच नाहीं. इतर रहिवासी मिलिटरीच्या सोयीकरतां आहेत, असा भ्रम होतो ! फील्ड सर्व्हिसवर हा गैरसमज अधिकच दृढ होतो !

लष्करांतील आयुष्य म्हणजे कधीं जितकी चैन तितकेच कधीं हाल. हें सांगण्याचें कारण, पुष्कळ लोक विचारतात, कीं, तिकडे राहण्याची व जेवणाखाण्याची काय सोय होती ? हवापाणी कसे काय होतें ? याला एक उत्तर देणें कठिण आहे, किंवा अत्यंत सोपेंहि आहे. तें हेंच, कीं, एकंदर राहणींत, हवापाण्यांत, जेवणाखाणांत जमीन–अस्मानाचें अंतर असतें. इतका विलक्षण फरक सिव्हिल लाईफमध्यें क्वचितच पहावयास सांपडेल. कित्येक ठिकाणीं उकाड्यामुळें अंगाची लाही होऊन जावयाची तर कित्येकदां थंडीमुळें जीव रडकुंडीस यावा. कधीं विजेच्या पंख्याखालीं तर कधीं ट्रेंचमध्यें गोळयांच्या वर्षावांत राहावें लागे. कधीं पंचपक्वान्नें तर कधीं फक्त सँडविच मिळत ! एरवीं नोकरचाकर, तर प्रसंगीं जखमी मनुष्याचा स्ट्रेचर उचलावा लागे ! एखाद्या कादंबरींत वर्णन असावें तशीच वस्तुस्थिति असते.

किगरबानहून बगदाद दक्षिणेस सुमारें १२५ मैल आहे. हा प्रवास आम्हीं आगगाडीच्या एका मालाच्या डब्यांत बसून केला. एका दृष्टीनें पहिल्या वर्गाच्या डब्यापेक्षां त्या मालाच्या डब्यांतच घरासारखें अधिक वाटे. कारण या डब्यांत आपल्या तंबूप्रमाणें प्रवासी पलंग, टेबल, आरसा, हरिकेन–बत्ती वगैरे आपलें सर्व सामान थाटतां येई ! बगदादच्या ईशान्येस सहा मैल असलेल्या हिनायडी स्टेशनवर आम्हीं उतरलों, व ‘ धर्मशाळेंत ’ तळ दिला. येथून आम्हांला ‘ टिक्रीट ’ गांवीं जावयाचें होतें. पण इतक्यांत असें समजलें, कीं, आमच्या पलटणीचे हेड्–क्वार्टर्स बगदादलाच डॉरा नांवाच्या कँपांत आहे. हा कँप बगदादपासून आग्नेयेस सहा मैलांवर नदीच्या दक्षिण कांठीं होता. तेव्हां ‘ फेरी ’ बोटींत बसून ४–३–२० ला आम्हीं आमच्या हेड्क्वार्टर्सला येऊन

मिळालों. टिक्रीटला निघण्याचा हुकूम आज येईल उद्यां येईल असें करतां करतां शेवटीं चार महिने गेले! प्रथम आगगाडींत जागा नाहीं म्हणूनच केवळ आमचें जाणे लांबणीवर पडत होतें. शेवटीं ज्या ठिकाणीं आम्ही वाटेंत केवळ मुक्कामाला म्हणून उतरलों त्या ठिकाणीं नाना अडचणी येऊन चार महिने



रेजिमेटचें दफ्तर, डॉरा कॅंप

आमचें रहाणें पडलें, व अन्य कारणांमुळें शेवटीं तिकडे जाण्याचा बेतच राहिला. ज्या ठिकाणी जास्त वेळ कॅंप पडेल अशी अपेक्षा असते तेथे तंबू उभारीपर्यंत, खुंट्या उपटून ते गुंडाळण्याचा हुकूम येतो व जेथें धर्मशाळेसारखे नुसते टेंकतों तेथें कित्येक दिवस तरी ठाणे पडते!

बगदादपासून **डॉरा कॅंपपर्यंत** एक लोकल फेरी बोट होती. तींतून आम्ही कित्येकदां बगदादला जात असूं. बगदादला ओळखीचे लोक बरेच भेटले व बऱ्याच नवीन ओळखीहि झाल्या. डॅारा कॅंपांत तुर्की कैद्यांचाहि एक कॅंप होता. या कॅंपाभोंवतीं दुहेरी तिहेरी कांट्यांच्या तारांचे कुंपण असून रखवालीकरितां इतर बंदोबस्त असावयाचा तो असून, लांबपर्यंत दिसावें

म्हणून एक उंच माचीसारखी जागा केली होती. पण आश्चर्य हें, कीं, याला न जुमानतां कांहीं धाडसी तुर्की कैदी यांतूनहि डोळे चुकवून पळ काढीत! महायुद्ध संपून दीड वर्ष झाले होतें व इतक्या कैद्यांना पोसणें हें एकपरीनें जडच जात होतें. तेव्हां कैद्यांनी पळून जाऊन आपापल्या पोटापाण्याची सोय पाहिली तर विषाद वाटण्याचें कारण नव्हते! अर्थात् बंदिवासांत त्यांना फुकट खावयाला मिळत नसे. त्यांच्याकडून रस्ते तयार करण्याचीं वगैरे कामे करून घेतली जात.

तुर्की कैद्यांना चांगल्या रीतीनें हिंदू लोकांच्या बरोबरीनें वागविण्यांत येत असे. तुरुंगांत एक कॉफीचें दुकान होतं व त्यांतच सिगारेट वगैरे जिन्नस त्यांना विकत मिळत. स्नानाची, कपडे धुण्याची वगैरे आमच्या कॅम्पांतल्यासारखीच सोय होती. थोडी जास्तच. शिवाय शौचकूप पुरेसे असून मध्ये आडपडदा असे! आजाऱ्यांकरितां एक दवाखाना असून त्यावर एक डाक्टर असे. (या कॅंपाचें आरोग्य पहाण्याचे व एकंदरींत औषधपाण्यावर नजर ठेवण्याचे काम मजकडे होतें.)


तुर्की कैदी

एके दिवशीं "तयारीनें असा" असा आमच्या पलटणीला हुकूम आला. कदाचित् कांहीं कारणाकरितां बगदाद वेस्ट स्टेशनवर आम्हांला जावें लागणार होतें. हो ना करतां करतां अखेर दिवे लागण्याच्या सुमारास तिकडे कूच करण्याचा आम्हांला हुकूम मिळाला व काय असेल, याबद्दल फावल्या वेळांत तर्कवितर्क करीत आम्हीं निघालों. कॅंप सोडून मैल दोन मैल गेलों असूं इतक्यांत परत फिरण्याचा हुकूम येऊन थडकला व आम्ही आमच्या 'तयारी' निशीं मागें फिरलों व झोंपीं गेलों!

त्या दिवशीं इराणचे शहा बगदाद स्टेशनवरून खानिकिनला जाणार होते. नुकतेच विलायतेहून ते इकडून इराणांत जावयास निघाले होते. वाटेंत या ठिकाणीं कदाचित् गडबड होईल या भीतीनें पलटणी स्टेशनबाहेर जमावयाच्या होत्या. पण कांहीं कारणाने शहासाहेब आलेच नाहींत. पुढे कांहीं दिवसांनीं ते आले. अमुक एक सिग्नल झाला, कीं पलटणीनें तयारींत असावयाचें व अमुक

सिग्नल झाल्यावर तिनें कुच करण्यास आरंभ करावयाचा असें ठरलें व त्याप्रमाणें एके दिवशीं संध्याकाळीं ( २५–५–२० ) आम्हीं बगदाद वेस्ट स्टेशनपर्यंत जाऊन तेथें रात्रभर तळ दिला व सकाळीं ' छोटा व बडा हजिरी ' घेऊन परतलों !

## पर्पेच्युअल मोशन

बगदादला डॉरा कॅपांत असतांना आमच्याकडे कांहीं पाहुण्यांना जेवावयाला बोलाविले होते. पण आमची पेयें अगदीं संपलीं होती. ती आणावयाला मला पाठविले. माझी घोडी नुकतीच व्याली असल्यामुळें मी कर्नलची घोडी घेऊन बगदादला निघालों. प्रथम जरी मी घोडीला नेत होतों, तरी कांही वेळानें तीच मला चारी पायांवर भरधांव घेऊन चालली. मला सहा मैल जावयाचें होते. माझ्या अपेक्षेच्या उलट जरी घडयाळाप्रमाणें निम्म्या वेळांत ती घोडी मला तेथे घेऊन गेली तरी तो वेळ मनाच्या समजुतीप्रमाणें मला चौपट लांबीचा वाटला. आणखी साठ कोटि, कीं, कितीशा अब्ज वर्षांनी जगाचा अंत होणार आहे म्हणतात. तितका वेळ मध्यंतरी जाऊन प्रळयकाल बगदादला पोहोंचण्याच्या आंतच केव्हां तरी येईल असें मला वाटलें. निदान माझ्या दृष्टीने तरी जगाचा अंतच होण्याची वेळ समीप येऊन ठेपली होती. लगामाकरवी मी तिला पुष्कळ समजूत दिली, माझा मनोदय निरनिराळ्या रीतीनें तिला समजावून सांगितला, पण गैरसमजामुळें म्हणा किंवा हट्टामुळें म्हणा तिने आपला हेका सोडला नाही. जग संपेपर्यंत जमीन व काळ या दोहोंच्या दृष्टीनें बेफाम पळत राहण्याचा तिचा विचार दिसला; पर्पेच्युअल मोशनची शक्यता संभवते अशा मताचा मी झालों. टैग्रीस नदीच्या किनाऱ्याच्या बाजूनें हा रस्ता जात होता व कित्येक ठिकाणीं तर तो अगदीं नदीजवळून जाई. थोड्याच वेळांत मी खुष्कीच्या मार्गानें बगदादला पोहोंचणार, कीं, जलमार्गानें बसऱ्यावरून इराणी आखातांत शिरणार तें कांहींच कळेना. पाय मोडणार कीं डोकें फुटणार येवढाच प्रश्न होता. प्रत्यक्ष त्या घोडीला मी सांगून पाहिलें, तिच्या आईबापांच्या नांवानें गळ घातली, देवाचा वशीला लावला; पण ती ताळ्यावर येईना. रस्त्यावर वाटसरू कोणीच नसल्यामुळें मी, घोडी व देव यांखेरीज सगळीकडे शुक्र होतें. इतक्यांत लांब अंतरावर मला

कांहीं तुर्की मजूर रस्ता दुरुस्त करीत असलेले दिसले. जगाचा अंत थांबविण्याऱ्या कामीं त्यांची कितपत मदत होते इकडे माझें आतां लक्ष लागलें. बगदादकडे जाणारी वाट ते नीट करीत होते, तर माझी स्वर्गाची वाट दुरुस्त करण्याचें काम माझ्या घोडीनें चालविले होते. इतक्यांत एकाएकीं घोडी थांबली, व जगाचा अंत लांबच राहिला. मी स्थिरस्थावर होऊन पहातों, तों मी हॉस्पिटलमध्यें नसून घोडीच्या पाठीवरच आहें असे मला आढळून आलें!

## माझी शिकार!

आणखी एकदां अशीच आमची स्वारी शिकारीला म्हणून दोघां सहऑफिसरांबरोबर निघाली. यावेळी जो घोडा मी उसना घेतला होता तो जरा लहरी आहे, असें मला सांगण्यांत आले होतें. मागल्या तंगड्या झाडण्याची त्याला केव्हां केव्हां हुक्की येई. आम्ही कँप सोडून आडरानांत शिरलों. वाटेत खांचाखळगे व कोरडे कालवे पुष्कळ होते. इतक्यांत त्या बादशाही घोड्याच्या अंगांत दौडत जाण्याचे वारें भरले. माझ्या टोपींतहि तें वारें भरून टोपी अर्धवट एका डोळयावर व अर्धवट मानेवर घसरली व हनुवटीवर फीत असल्यामुळें तशीच लोंबकळूं लागली! घोड्यांना अंधेरीची संवय असली तरी मला तें गैरसोयीचें वाटल्यावरून मीं टोपी काढून फेकून दिली. तोंच एक चांगला पांचसहा फूट रुंदीचा कोरडा कालवा माझ्यासमोर आडवा पडलेला दृष्टिपथांत आला. तो जणों मला झेलण्याकरितां ओंजळ पसरून उभा असल्यासारखा दिसला. पण घोड्याचें पोट गुडघ्यांनीं व तंगड्यांनी घट्ट आंवळल्यामुळें मी 'कॅच आऊट' झालों नाहीं. घोड्याला थांबविण्याची–रन् आऊट–मी शिकस्त करीत होतों, निदान त्यानें एकाच रेघेंत फार दूरवर जाऊं नये म्हणून एका बाजूचा लगाम जास्त खेचून तो वर्तुळाकार फिरेल असें करीत होतों. पण त्याचा परिणाम असा झाला कीं, तोच कालवा पुन वाटेंत आला. घोड्यानें जणों त्या कालव्याला मला 'कॅच आऊट' करण्याचा दुसरा 'चान्स' दिला! पण मीं आपले आसन सोडले नाहीं. ते अत्यंत डळमळीत झालें होते, पण रिकीबींतून मीं केव्हांच पाय काढून घेतला असल्यामुळें त्याचा परिणाम माझ्यावर फारसा झाला नाहीं. एखाद्या सर्कशींतील घोडेस्वाराप्रमाणें माझा घोडा आतां अर्ध्या फर्लांगाच्या त्रिज्जेंत एका रिंगणांत फिरूं लागला. दोनचार फेऱ्या घातल्यावर

घोड्याने हा प्रोग्रॅम आटोपला व (घोड्याबरोबर अक्षरशः) वरखालीं होत असलेला माझा जीव खालीं पडला.

बगदाद डॅारा कँपांत असतांना रिकामपण असल्यामुळें पलटणींतील डोली-वाल्यांकडून मी 'स्ट्रेचर ड्रिल'ची परेड करवून घेत असें. याच ठिकाणीं



छोटा मध्यस्थी !

आम्हांला रिव्हाल्व्हर प्रॅक्टिस दिलें. एक ऑफिसर फिझिकल ट्रेनिंग स्कूलमध्यें पाठविला. अशा व इतर प्रकारें फुरसतीच्या वेळीं वेळ फुकट न दवडतां सैन्यांतील लोकांना निरनिराळें शिक्षण आलटूनपालटून देण्यांत येतें. शिपायांनाहि कोणाला सिग्नलिंग, कोणाला लुईसगन, कंपनी ड्रिल, अशी प्रॅक्टिस देण्यांत येई.

### बंडाची वावटळ

अजून टिक्रीटला जाण्याचा हुकुम येण्याची रोज आम्हीं वाट पहात होतों. इतक्यांत ठिकठिकाणीं बंडाची वावटळ उडाल्याची वार्ता कानीं आली व टिक्रीटला आमची पलटण थोड्याफार आरामाकरितां जाणार ती कदाचित् शेवटचा राम म्हणण्याकरितां ऑपरेशन्सवर निघाली ! आतां सुधारलेली न कां होइना

पण निदान रानटी लोकांची तरी लढाई प्रत्यक्ष पहावयास मिळणार या आशेनें मला मूठभर मांस चढलें !

लष्करांत काम केलेल्या इतर मराठी ऑफिसर्सनीं वगैरे जर आपापले अनुभव प्रसिद्ध केले तर मनोरंजक होतील, व या निरनिराळ्या वैयक्तिक अनुभवावरून वाचकांना लष्करी जीवनाची साधारण कल्पना करण्यास मदत होईल.

हा लेख जर वाचकांना पसंत पडला तर या अरब बंडाच्या वेळच्या प्रत्यक्ष लढाईतील माझ्या आणखी कांहीं आठवणी लिहिण्याचा माझा विचार आहे. व हा लेख कोणाला आवडला नाहीं तर पुढचा तरी निदान आवडेल या आशेनें लिहिणार आहें !



# ४ आघाडीवर

## स्वारीवर !

तारीख ८-७-१९२० रोजीं दुपारीं २॥ वाजतां आम्हीं बगदादजवळील डॉरा कँप सोडला. फालतू सामान, तंबू वगैरे तेथेंच 'डम्प' करून त्यावर पहाऱ्यापुरते शिपाई मागें ठेवले. लढाईच्या तयारीनें आम्हीं निघालों होतों. ऑफिसरना वीस पौंड (?) व शिपायांना दहा पौंड (?) इतकेंच सामान नेण्याची परवानगी होती. अर्थात् वस्तुतः यांत बराच फेरबदल होत असे ! प्रथम सामान कितीहि कमी नेलें तरी तें हळू हळूं वाढत जातें !




जनरल जॉफ्रे

## सुधारलेलें व 'रानटी' युद्ध

आरंभीं हें सांगितलें पाहिजे कीं पश्चिम (फ्रान्स-मधील) फ्रॉंटिअरवर जे घनघोर युद्ध झालें त्या मानानें आमची ही लढाई म्हणजे नुसता पोरांचा हापटबार होता. त्यांची तुलनाच संभवत नाहीं. ५७ सालच्या बंडाच्या मानानेंहि आमची लढाई म्हणजे कांहींच नाहीं. पश्चिम रणांगणावरील किंवा गॅलिपोली, डार्डानेल्स येथील संग्रामाचे स्वानुभव जर कोणी तिकडे जाऊन आलेला मनुष्य लिहील तर ती कथा बोधप्रद तितकीच मनोरंजकहि खास होईल व ती वाचून कोणीही वाचक आश्चर्यविमूढ झाल्यावांचून राहणार नाहीं.

ती वाचतां वाचतां वारंवार रोमांच उभे राहतील. ट्रैंच वॉरफेअरमधील भयंकर हालअपेष्टा, जीविताची अशाश्वति, शेल शॉकसारखे विस्मयकारक रोग, विषारी धूर, बर्फ, चिखल, वरून विमानें, खालून सुरुंग, अशा नाना आपत्ति तिकडे होत्या. त्या मानानें आम्हीं किती तरी सुखरूप होतों. कारण आमच्या शत्रूजवळ विमानें नव्हतीं, मशीनगन्स् नव्हत्या, तोफा नव्हत्या,-फक्त त्यांना आपली बंदुक आणि सुरा माहीत. एकाद वेळ आमच्यापैकीं एकादी तोफ जरी त्यांच्या हातीं लागली तरी त्यांना ती उडवितां येत नसे व बहुतकरून ती त्यांच्या हाती जाईपर्यंत नादुरुस्त झालेली असे. एकदां जर्मन किंवा तुर्की तज्ञाकडून त्यांनीं नसरियाकडे अशा एका तोफेतून कांहीं गोळे सोडले म्हणतात. सुधारलेली लढाई व रानटी लढाई यांत अतिशय फरक आहे. सुधारलेल्या लढाईत कांहीं कांहीं गोष्टी नक्की माहीत असतात व हा सिद्धांत दोन्ही पक्षांना लागू असतो. कारण युद्धशास्त्राचीं मूलतत्त्वें दोहोंकडे सारखींच असतात. त्यामुळें पुष्कळ गोष्टींची शक्याशक्यता दोन्ही पक्षांना सहज अजमावतां येते. पण रानटी युद्धांत तसें कांहीं नाहीं. शत्रू साधारण गनीमी काव्यानें लढत असल्यामुळें कोण्या वेळेला काय होईल याचा नेम नसतो. महायुद्धांत पश्चिम रणांगणावर शत्रूंची व दोस्तांची हद्द रेखीव होती व मध्यें थोडेसे यार्ड जमीन वादांत असे. पण बंडांत शत्रू आपल्यांतच असतो, तो नेमका कोणता हें माहीत नसतें, त्यामुळे एकप्रकारें अशाश्वति उत्पन्न होते. दिवाणिया नांवाचें गांव सोडून ' रुमेथावर ' जेव्हां आम्ही चाल करून गेलों तेव्हां दिवाणियापासून आमच्या वाटेवर एक मैल असलेल्या गांवांतील लोक आमचे ' दोस्त ' होते, पण परत येतांना आम्हीं जेव्हां दिवाणियाचा त्याग करून माघारी फिरलों तेव्हां याच लोकांनीं-आमच्या अपेक्षेच्या व कल्पनेच्या उलट-आमच्या कांहीं सैनिकांना गोळ्या मारून निकामी केले. तसेंच अगदीं प्रथम आम्ही दिवाणियाला बगदादहून आगगाडींतून आलों पण येऊन पोहोंचल्यानंतर तीन-चार दिवसांतच मधली रेल्वे लाईन अरबांनीं उखळून टाकली. अर्थात् आमचें लोहमार्गाचें व पायरस्त्याचेंहि दळणवळण खुंटलें! रात्रीं-किंबहुना भर दिवसा छापा घालणेंहि गनीमी कावेवाल्यांना अवघड नसतें. कारण ते संख्येनें थोडे असून त्यांच्याबरोबर खटारे, खेंचरें, तोफा वगैरे अवडंबार नसल्यामुळें त्यांची चाहूल लवकर लागत नाहीं. शिवाय व्यक्तिशः ते धाडसी असतात! कारण विशेषतः धार्मिक ' वेड '

त्यांच्यांत भिनलेले असतें. ॲड्मिनिस्ट्रेशन किंवा कामाची पद्धतिहि त्यांच्यांत फारशी नसते. ते अधिक सुटक असतात, व तुटकपणें आपल्याला वाटेल तें करतात त्यामुळें त्यांच्या हालचालींचा अंदाज करणें कठिण जातें. तेच, आमच्या दोन तुकड्या म्हणजे सुमारें १००-१२५ सैन्य जरी कोठें निघाले तरी चार कोसावर सहज समजतें ! धूळ आणि खटाऱ्यांचा वगैरे आवाज जणों आपल्या आगमनाची वार्ताच देतात. आमचें काम यथास्थित असावयाचें ! शिधा-सामुग्री, कांटेरी कुंपण, टेलिफोन, टेलेग्राफ, वायरलेस, हेलिओग्राफ (आरशाच्या कवडशानें संदेश पाठविणें), लुईस व मशीनगन्स्, चालतें रुग्णालय, अशा नाना भानगडीच्या साहित्यासह आमची ब्रिगेड हलणार. यामुळें अर्थात् काम फत्ते व टिकाऊ होते. बंडाच्या आरंभीं पुष्कळ अत्याचार, खून, जाळपोळ, इत्यादि नुकसानी ठिकठिकाणीं एकदम किंवा लागोपाठ होते, पण तोंपर्यंत बंडखोर आपल्यांतच वावरत असल्यामुळें त्याला नाइलाज होतो. पण मग त्वरित व नेटानें पण शिस्तवार एक एक काम हातीं घेऊन तें यशस्वी व टिकाऊ करण्यांत येतें. बंडखोरांचें तसें नसतें. प्रथम जरी आपल्याला उलथून पाडण्याचा त्यांचा विचार असला तरी उघड दिसणाऱ्या कारणांमुळें तें तर शक्य होत नाहीं व मग उगाच नासधूस, जाळपोळ वगैरे करून ते आपली तहान भागवितात. अर्थात् त्यावेळीं प्रथम जरी त्यांची सरशी झालीशी वाटली तरी तें काम पायामजबूत नव्हे.

**कांहीं गटार-बातम्या !**

या अरब बंडाच्या कारणाबद्दल निरनिराळ्या गप्पा ऐकूं येत. कोणी त्यांना जर्मनांनीं चिथावलें म्हणत. कोणी म्हणत तुर्कांनीं भर दिली. (व पुढे अरबांच्या बाजूला कांहीं तज्ञ जर्मन व तुर्की सैनिक आहेत असे ऐकलें.) कोणीं म्हणत कर वाढविल्यामुळें अरब नाखुष झाले आहेत, तर कांहींचें म्हणणें असें कीं कित्येक पोलिटिकल ऑफिसरनीं जबरीनें करवसुली केली ! ! गटार बातम्याच त्या ! वाटेल त्यानें वाटेल तें उठवावें व इतरांनीं त्याच्यावर तर्क बांधावे. असें म्हणतात कीं, पूर्वी तुर्की अम्मल मेसोपोटेमियांत असतांना, तेथें गव्हर्नर असे, पण फक्त नांवाला, कर वसुलीपुरता. अंतस्थ कारभारांत ढवळाढवळ करण्याच्या भानगडींत तो पडत नसे. ठरलेली रक्कम गांवागांवांतील शेख लोकांनीं आणून सरकारांत भरली कीं संपलें. पण इंग्रज आल्यापासून ते ज्यांत

त्यांत आपलें डोकें घालूं लागले—शेताची मोजणी—त्यावर आकार—हत्यारांचें नियंत्रण, इत्यादि; तें अरबांना खपलें नाहीं असेंहि कित्येकांचें म्हणणें पडलें. पण या कारणांशीं आमचा कांही संबंध नव्हता. रण माजणार येवढेंच आम्हांस दिसत होतें.

डॉरा कॅंपला कदाचित् अखेरचा रामराम ठोकून आम्हीं बगदाद साउथ स्टेशनवर बसरा बगदादच्या आगगाडींत बसून दिवाणिया नांवाच्या गांवाकडे



दिवाणिया

नेघालों, व दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं तेथें पोहोंचलों. बगदादहून दिवाणिया आग्नेयेस सुमारें ११५ मैलांवर युफ्रेटिस नदीच्या कांठीं आहे. गांव बऱ्यापैकीं असून, रेलवेचें एक महत्त्वाचें स्टेशन आहे. येथें बर्फाची गिरणी व विजेचे इंस्टॉलेशन होते. नदीच्या उत्तरेस गांवाला लागूनच एक किल्ला आहे.

## इंजिनच्या शक्तीची चुणुक

बसरा बगदाद रेलवे पुरी होऊन, ती उघडण्याचा समारंभ झाल्याचें आम्हीं नुकतेंच वाचलें होतें.

रात्रीं स्टेशनच्या आवारांतच तळ दिला. आमचें जेवण्याचें टेबल दोन रेलवे

लाइनीमध्यें मांडलें होतें व जेवतां जेवतां तिकडून येणाऱ्या एका एंजिनचा धक्का, किंचित् वांकड्या ठेवलेल्या एका खुर्चीला लागल्यामुळें, खुर्ची, तींत बसलेले एक पाहुणे, जेवणाचें मेज आणि लेखकासह आणखी एक दोन ऑफिसर सगळ्यांचीच उलटापालट झाली !

## शीख पलटणीच्या आगगाडीवर हल्ला

दुसऱ्या दिवशीं सकाळीं पुनः आगगाडींत बसलों व पुढें १८ मैलांवर असलेल्या इमाम–हम्झा गांवीं पोहोंचलों. येथें एका शीख पलटणीनें आमच्या पलटणीला गरम दूध पाजून मनापासून स्वागत केलें. मला वाटतें आदल्याच दिवशीं ही पलटण येथून पुढें आगगाडींतून जात असतां वाटेंत ६–७ मैलांवर अरब बंडखोरांनीं अचानक तिच्यावर छापा घालून तिचें फार नुकसान केलें होतें. त्या पलटणीवर तेव्हां एक दक्षिणीच डॉक्टर होते. अरबांनीं छापा घातल्याबरोबर गाडी थांबविण्यांत आली होती व गाडीखालीं उतरून शीख लोक लढत होते. या लढणाऱ्या पक्षांमध्यें सुदैवानें एक धुळीचें वादळ झाले व त्यामुळें एकमेक एकमेकांना दिसेनासे झाले. त्या संधींत धुळीच्या आडपडद्यामागें आगगाडी मागें इमाम हंझाकडे काढून नेण्यांत आली. ८–१० दिवसांनंतर आम्हीं जेव्हां या जागेवरून कूच केलें तेव्हां त्या वेळेला झालेली लढाईतील भेसुर नुकसानी आम्हांला मूर्तिमंत दिसली !



आम्हीं इमाम हंझास उतरतां ( १०-७-२० )

## एक भयंकर बातमी

इमाम हंझा स्टेशनवरून आम्ही आगगाडीनेंच पुढें निघालों व चार–सहा मैल गेलों असूं इतक्यांत मागून कांहीं अरब, घोडे दामटीत येतांना दिसले. आदले दिवशीं अरबांनीं शीख आगगाडीवर छापा घातला होता तें हेंच

ठिकाण ! पण हे घोडेस्वार मित्रासारखे दिसत होते. त्यांचें काय काम असेल, इत्यादि विचार आमच्या मनांत चालले असतां ते घोडेस्वार आगगाडीच्या डब्यांच्या बाजूला आले. इकडे गाडीही थांबली. असें कळलें कीं हे अरब घोडेस्वार इमाम–हंझाहून कांहीं निरोप घेऊन आले आहेत. आम्हीं गाडी उलटविली ती परत दिवाणियाला संध्याकाळीं आणून पोहोंचविली. आदले दिवशीं रात्रीं दिवाणियाच्या वायव्येकडे ९ मैलांवर असलेल्या 'खान जडवाल' नांवाच्या स्टेशनवर बंडखोरांनीं हल्ला करून, पुढें दोन मैलांवर असलेला पूल जाळला आहे व रेलवे लाईन व तारा उद्ध्वस्त केल्या आहेत, अशी बातमी लागली. आदले दिवशीं संध्याकाळींच हें स्टेशन आम्हांला वाटेंत लागलें होतें.

## बंडखोरांचे अत्याचार.

रात्रीं दिवाणियाला पुन्हा मुक्काम करून उजाडतांच आम्हीं खान जडवालकडे आगगाडींतूनच निघालों. जडवाल स्टेशनच्या अलीकडे दीड-एक फर्लांगावर रेलवे लाइनीच्या कडेला एक म्हातारी रडत बसली होती. आमची गाडी येतांच ती उभी राहिली व गाडी थांबविण्याची खूण करीत मोठमोठ्यानें आक्रोश करीत ऊर व डोकें बडवून घेऊं लागली. एकाद्या वेड्या माणसाप्रमाणें तिचें वर्तन होतें. अरबी भाषेत केविलवाण्या स्वरानें ती आम्हांला कांहीं सांगत होती, व जमीनीकडे बोट करून दाखवी. तिला वेड लागण्याचें कारण आम्हांस लवकरच कळून आलें. शेजारींच एक मरून पडलेला मनुष्य दिसला. आदल्या रात्रीच्या चकमकींत तो–तिचा मुलगा ?–गोळी लागून मेला असला पाहीजे. पुढें स्टेशन-वर गेलों. ( आगगाडी अर्थात् अत्यंत हळू, सावधगिरीनें न्यावी लागत होती. ) स्टेशनवर म्हणण्यापेक्षां स्टेशन ज्या जागेत होते त्या ठिकाणीं असें म्हणणें शोभेल. कारण सर्व स्टेशन जळून खाक–जमीनीसपाट झालें होतें. हार्थ ( शेगडी ) मात्र विटा मातीचें असल्यामुळें उभे होते. पण ती भित आतां भिंतीसारखी राहिली नसून जाळीसारखी झाली होती,–इतक्या तिला गोळ्या लागून भोकें पडलीं होतीं. विशेषतः माऱ्याच्या दोन बाजूंवर तर तीन चौरस इंच जागा कांहीं अविच्छिन्न राहिली नव्हती. हार्थच्या धुराड्यावरहि किती तरी भोंकें होतीं. आजूबाजूस, जमीनीवर, रुळांच्या मध्ये, उडालेल्या गोळ्यांचा जणों सडा पडला होता. त्या रात्रीं कमालीचा गोळ्यांचा भडीमार झाला असला

पाहिजे. दिवाणियापर्यंत ९ मैलांवर त्याचा आवाज ऐकूं गेला म्हणे. स्टेशनवर कांहीं फार माणसें नव्हतीं, पण प्रतिकार तितक्याच नेटानें केला गेला असला पाहिजे हें उघड आहे. अगदी प्राणावर येईपर्यंत लोक आपलें काम बजावीत होते असें दिसलें. कारण 'धोक्याचा' एस्. ओ. एस्.-सिग्नल देतां देतां तारमास्तरचा हात एकदम बंद पडला असें ऐकिलें. नजीकच दोन चार माणसें मरून पडलेली दिसली. त्यांतील एक तर जळून कोळशासारखा काळा ठिक्कर पडला होता. पण आश्चर्य हें कीं त्याचे पायमोजे व पाय अगदीं शाबूत होते ! कोणाचें तरी इमानी कुत्रेहि रेलवे लाइनच्या पलीकडे मेलेलें आढळलें. लागलीच खड्डे खणून प्रेतांची वाट लावली व पुढें मैलावर गेलों. तेथें एक छोटासा पूल



शत्रूनें जाळलेला रेलवे पूल, खान जडवाल

जाळलेला होता तो आमच्या बरोबर आणलेल्या एंजिनिअर लोकांनीं, तात्पुरते धीरे देऊन व भर घालून कसाबसा दुरुस्त केला, व संध्याकाळीं दिवाणियाला मुक्कामाला आलों.

## मनाला उगीच ताण

दुसरे दिवशीं सकाळीं पुन्हा त्याच बाजूला म्हणजे खान जडवालच्या पुढें चार मैलावर बद्दू लोकांनीं तोडलेल्या टेलिग्राफच्या दुरुस्तीकरतां गेलों. जुलैची १२ तारीख. ऊन म्हणजे मी म्हणत होते. टेलिग्राफपैकीं कांहीं लोक, थोडे शिपाई व मी इतक्यांना तेथें सोडून व संध्याकाळीं परत येण्याचे आश्वासन देऊन बाकीची पलटण आगगाडीसह परत खान जडवालला गेली! तेव्हां मात्र एकटें एकटें वाटण्यासारखी परिस्थिति होती. आदलेच दिवशीं खान जडवालला पाहिलेला देखावा; बंडखोरांच्या मुलखांत; पलटण चार मैल निघून गेलेली. व आम्ही मूठभर लोक ओसाड सपाट मैदानांत एकटेच! आडोसा (म्हणजे कव्हरहि) कांहीं नाहीं! पण दुर्बिणींतून लांबवरची गम्मत पहाण्यांत व टेलिग्राफचे खांब उभारीत असतांनाचे वगैरे फोटो घेत मीं आपला वेळ मजेंत घालविला. शिवाय तुटलेल्या दोन तारा कशा जोडतात व तंग कशा करतात हें पाहण्यांतहि गोडी लागली. आमची पलटण घेऊन आगगाडी केव्हां परत येते इकडे आमचें लक्ष लागून राहिलें होतें.



टेलिग्राफची दुरुस्ती

## सावलीचे चमत्कार

जवळ नदी किंवा कालवा वगैरे कांहींच नसल्यामुळें खजुरीचीं झाडेंही नव्हतीं. व टीचभरदेखील कोठें छाया सांपडेना. आपल्याच शरीराची किंवा शेजारच्या माणसाची किंवा हत्यारांच्या पेटीची, येवढीच छाया, म्हणजे आम्हीं येतांना आणली होती, तेवढीच छाया तेथें उपलब्ध होती. तारेच्या खांबाच्या सांवलीचाहि फायदा घेण्याची युक्ति अद्याप मला सुचली नव्हती (व अजून तितकी वेळहि आली नव्हती.) लांबून ग्यांब पाहिला तर त्याच्या सांवलीचा पट्टा मोठा आशाजनक वाटत नाहीं पण खुद्द छायेखाली गेलें म्हणजे जवळ-जवळ सबंध तोंड व शरीराच्या भागाची सहा इंच रुंद पट्टी छायेखालीं झांकली जाते असें पुढें माझ्या अनुभवास आले. ओघानें सांवलीबद्दल सांगावयाची आणखी एक गोष्ट अशी कीं, खेंचराची किंवा घोड्याची सांवली सोयीची असते. दोघांच्या सांवल्या जरी रुंद व जनावराप्रमाणें लांबट असतात तरी घोड्याची सांवली एकंदरींत पहातां नाचरी असते पण खेचराची सांवली–विशेषतः ते अद्याप लादलेलेच असल्यास अधिक निश्चल व सुरक्षित असते. मनुष्याच्या सांवलींत निजणें एकंदरींत अप्रशस्तच. कारण एक तर तो सारखा निचळा उभा राहिला पाहिजे. आपले पाय त्याच्या पायाला भिडवून नेमके त्याच्या सांवलीत निजले पाहिजे, हा प्रकार दोघांनाही कसासाच वाटण्यासारखा आहे. मनुष्याच्या सांवलीचा एकच गुण आहे, कीं, तो जनावराप्रमाणें निदान तंगड्या झाडून आपल्याला जखमी तरी करणार नाहीं ! यापलीकडे मनुष्याच्या सांवलीत मुळींच राम नाहीं. सांवलीचा तिसरा महत्त्वाचा प्रकार म्हणजे तोफेच्या गाड्यांची सांवली. पण या ठिकाणीं ‘ गडबडीमुळें ’ झोंपमोड होण्याचा संभव अधिक ! खेचरांच्या गाड्यांच्या सांवलीचा फायदा घ्यावा तसा घेतां येत नाहीं कारण गाड्या सर्व कॉलमच्या पिछाडीस असल्यामुळे त्या सांवल्या जरा ‘ मागेच ’ पडतात ! दिनमानाप्रमाणें बदलणाऱ्या सांवलीच्या लांबीच्या क्षय-वृद्धीविरुद्ध माझी अशी तक्रार असे कीं भर दोनप्रहरी–म्हणजे जेव्हां लांबीत लांब सांवली हवी असते तेव्हां ती अत्यंत आंखुड असते. तसेंच ज्या वेळीं आपल्याला सांवलीची तितकीशी आवश्यकता नसते तेव्हां ती उगाच हातपाय लांब करून पडते. तात्पर्य सजीव प्राण्याऐवजीं निर्जीव वस्तूंची सांवलीच सारासार विचार

करतां मी पत्करतों व पुढें आठवड्यानंतर शंभर मैलांचा रिट्रीट करीत असतां जेव्हां जेव्हां थोडा फार वेळ वाटेत थांबण्याचे प्रसंग येत तेव्हां-खटाऱ्याच्या अभावीं-मी तारेचा खांब पसंत करीत असे. खांबाची सांवली चिरटोळी लांबट असली तरी स्वतंत्र, अचल व सुरक्षित असते. दक्षिणायन व उत्तरायणाची सूर्याची वहिवाट असल्यामुळें जरी सूर्य माथ्यावर असतांही थोड्या बहुत लांबीची सांवली पडतेच, तरी ती वारंवार जागची हलल्यामुळें सांवलीचा आश्रय करणाऱ्यालाही तिच्याबरोबर सरकावें लागतें, हा माझ्या मतें तिच्यांत मोठा अवगुण आहे ! एकाद्या खेचरास अगर मनुष्यास गोळी लागली तर तो आपल्या अंगावर पडण्याचा संभव आहे पण खांबाला गोळी लागली तर खांब अंगावर कोसळण्याची मुळींच भीति नाहीं ! विचाररूपी सूर्याच्या प्रकाशांतील, लेखणीरूपी खांबाची, कागदरूपी जमीनीवरील ही लिखाणरूपी सांवली, संध्याकाळच्या सांवलीप्रमाणें लांबतच गेली ! पण यावरून मेसोपॉटमवील भर उन्हाळ्यांत ऑपरेशन्समध्यें मार्चवर असतांना उन्हाचा मारा किती विलक्षण होतो, घामानें अंगाचे व तहानेनें मनाचे कसें पाणी पाणी होऊन जातें, याची कल्पना येईल. ती धूळ, तो कढत वारा, घाम आणि धूळ यांनीं झालेला कपाळावरील व डोळ्याभोंवतीचा चिखलाचा लडबडाट, घशाला पडलेली कोरड, पाण्याचा तुटवडा आणि लढाईची गडबड-मजा होती झाले !

## देवदूत

आमच्या वॉटर बॉटलमध्यें पाणी होतें, पण तें एव्हांना बरेंच तापलें होतें-अर्थात् पिण्याची सोय नव्हती. आमची आगगाडीही येईना. अशा सर्व अडचणींत मनाला थोडा वेळ करमणूक करण्यासाठींच कीं काय बगदादकडून एक आगगाडी येतांना दिसली. व मग आमचा आनंद कांहीं विचारूं नका ! लगेच गाडी थांबली. आम्हीं ऑफिसरांच्या डब्यांत शिरून ' थंडा सोडा ' वगैरे पिऊन तहान शमविली व थोडा वेळ गप्पागोष्टी केल्या. कारण या गाडींतून माझ्या ओळखीचीच पलटण चालली होती. थोड्या वेळानें एंजिननें शिटी फुकली व गाडी एकाद्या सुखस्वप्नाप्रमाणें निघून गेली. कांहीं वेळानें आणखी एक अशीच आगगाडी येऊन गेली व शेवटीं आमचीहि पलटण आम्हांस न्यावयास आली व आम्हीं पुनश्च दिवाणियाला गेलों.

### ब्रिगेडची जमवाजमव

१३ जुलैच्या सकाळीं आम्हीं दिवाणियाहून पायींच कूच केलें. कांहीं कंपन्या आगगाडीनें पुढें गेल्या. त्यांना ' नबी मड्यून ' येथें नऊ एक मैलांवर जाऊन आम्हीं गांठले. पुन्हा दुसरे दिवशीं इमाम इंझाला आणखी तितकेंच मैल चालून गेलों. व तीनचार दिवसांनीं त्याच्यापुढें चार मैलांवर जमलेल्या " रुमेथा कॉलम " ला १८ तारखेस जाऊन मिळालों. येथें ब्रिगेडची जमवाजमव चालली होती. कारण येथून १६ मैलांवर ( बगदादच्या दक्षिणेस १५३ मैलांवर ) असलेल्या रुमेथा नांवाच्या गांवाला अरबांनीं वेढा दिला होता तो उठविण्याकरितां आम्ही ' स्वारीवर ' निघणार होतों.

### ' फॉल आउट '

इमाम इंझालां आमचा मुक्काम असतां एके दिवशीं रात्र पडल्यावर मला कांहीं आजारी लोक पाहण्याकरतां बोलावणें आलें. एका मराठा पलटणींतील ४०–५० सैनिकांची एक तुकडी वरून नुकतीच येऊन कॅपांत थडकली होती, त्यांतील निम्याहून अधिक लोक ' फॉल आऊट ' झाले होते. कोणाला विलक्षण थकवा आला होता तर कोणाला अतिश्रमामुळें घेरी आल्यासारखे वाटून उलट्या होत होत्या. एक इंडियन ऑफिसरहि आजारी पडला होता. अव्वलपासून ह्या पलटणीने उत्तम कामगिरी करून शाबासकी मिळविली आहे. पण ४-५ वर्षं सतत लढल्यामुळे त्या तरुण शिपायांत तितका जोम उरला नव्हता.

इकडील रेलवे स्टेशन ओळखण्याची खूण म्हणजे लांबून दिसणारें उंचावर चढविलेले पाण्याचे लाल रगाचे टांके. हेलियोग्राफनें संदेश पाठविण्याकरतां या उंच टांक्यावर अत्यंत सोयीची जागा सांपडे. या टांकीवर चढून भोंवतालचा प्रदेश दुर्बिणींतून पहाण्यांत गम्मत वाटे.

### आणखी गप्पा

लढाईमधील गप्पापैकीं एक नमुना बरा आहे. आमच्या जनरलनें म्हणे शत्रूला असा निरोप पाठविला कीं रुमेथा सोडवायला आम्हीं तर कमरा कसल्या आहेत. तर बऱ्या बोलानें वेढा उठवितां कीं तो आम्हीं जबरीनेंच उठविला पाहिजे ? शत्रूकडून उत्तर आले कीं आमच्या कांहीं राजकीय मागण्या व इतर अटी आहेत त्या जर तुम्ही पुरवीत किंवा मानीत असाल

तर आम्हीं शस्त्र खालीं ठेवितों. त्यावर आमच्या जनरलनें अभिमानानें सांगितले कीं, मी राजकारण व अटी जाणत नाहीं. राजकारणाविषयीं बोलावयाचे असेल तर पोलिटिकल ऑफिसरजवळ बोला. मुकाट्यानें वेढा उठवितां कीं होऊं द्या दोन हात, येवढेच कळण्याची माझी इच्छा आहे. मी पडलों सोल्जर !



वॉटर्लूच्या लढाईचे आदले रात्रीं

दुसरे दिवशीं म्हणजे १९–७ च्या सकाळीं, सर्व सरंजामानिशीं रुमेथाचा वेढा उठविण्याकरतां आमच्या ब्रिगेडनें कूच केले. आघाडीला एक शीख पलटण होती व आम्ही मध्यें कॉलमच्या पोटांत होतों.

## लहानसें समरांगण

पूर्वी म्हणजे एका आठवड्यामागे आगगाडींतून प्रवास करणाऱ्या शीख पलटणीवर अरबांनीं हल्ला केला होता ती जागा आम्हांला वाटेंत लागली. हीच ती जागा हें ओळखणें कठिण नव्हतें. कारण लढाईतील अनन्वित प्रकार या


युफ्रेटीस नदी
घोंगडीवाले
पंजाबी
माझे ड्रेसींग स्टेशन
शीख ड्रेसींग स्टेशन
ब्रिगेडच्या मुख्य कॉलम
रस्ता
पंजाबी हेड क्वार्टर
शीख
रात्रीं माझा मुक्काम
उरवडलेली रेलवे.
मराठा
इमाम हंझाकडे
रूमेथाकडे
रिसाला
N
E
S
W
१९-७-20 ची लढाई
१ इंच = १ मैल.

ठिकाणीं डोळ्याला मूर्तिमंत दिसत होते. शिपायांजवळ असणाऱ्या सामानापैकीं पाणी केटली, लहानसें कुदळ फावडे, इत्यादि जिनसा अस्ताव्यस्त पडलेल्या दिसत होत्या. तसेंच कांहीं मेलेले शिपाईही बिचारे अक्षय्य झोंप घेत पडले होते. त्यांतील कांहीं ओळखतां येण्याजोग्या स्थितींतही नव्हते. कोल्ह्या कुत्र्यांनीं त्यांचीं शरीरें छिन्नभिन्न करून टाकलीं होतीं. तर कांहीं प्रेतें कुजून आसपास घाण सुटली होती. या ठिकाणीं पाहिलेले एक दृश्य मात्र माझ्या चांगलें लक्षांत राहिले आहे. बसायला आडोशाची व सोयीस्कर जागा पहात असतां मी एका दरडीसारख्या जागेकडे गेलों पण तेथे एका शिपायाचें प्रेत आढळलें. तो अर्धवट मातींत लपला गेला होता. त्याचे केस शाबूद असून तोंडवळाहि नीट दिसत होता. तो पोरगेलेसाच दिसला. शरीराच्या कित्येक भागांवर अजून जशाचें तसें कातडें होतें तर हाताच्या बोटाच्या हाडांचा नुसता सांपळा उघडा पडला होता !

## गंगेंत घोडे न्हाले

पांच सात मैल चालून गेल्यावर दुपारीं लढाईला तोंड फुटलें. शीख पलटण अगदीं आघाडीला फायरिंग लाइनमध्यें होती. आमच्या कॉलमच्या डाव्या हाताला पांच सहाशें यार्डावर युफ्रेटीस नदी होती. नंतर शीख पलटणीच्या डाव्या बाजूवर जेव्हां शत्रूचा मारा सुरू झाला तेव्हां नदीपासून शीखांच्या डाव्या बाजूच्या टोंकापर्यंतचा फ्रंट संभाळण्याचा आमच्या पलटणीला हुकूम झाला. व आम्ही कॉलमच्या पोटांतून बाहेर पडून नेमलेल्या ठिकाणीं गेलों. या वेळी दुपारचे तीन वाजले होते. पाठीवरच्या पिशवींत खायला घेतले होते ते केव्हांच संपून गेले होते.

आमच्याकडील तोफा धडाडत होत्या. उजव्या फ्लॅंकवर म्हणजे बाजूवर रिसाला काम करीतच होता. शीखांचा उजवा हात संभाळण्याकरतां मराठा पलटण तिकडे गेली. गोरी पलटण मागें होतीच. मशीन गन्स, लुईस गन्स वगैरेचा धूमधडाका चालू होता. प्रत्येक युनिटमध्यें एकएक ऑर्डर्ली ऑफिसर त्या वेळेपुरते नेमतात. ते ऑर्डर्ली ऑफिसर जनरलकडून निरोप घेऊन आपापल्या पलटणीकडे चौफेर घोडे दवडीत इकडून तिकडे जात येत होते. ब्रिगेडिअर जनरल व त्याचे स्टाफ ऑफिसर साधारण मध्यावर कोठें तरी बसतात.

मधून मधून निरनिराळ्या फ्रंटकडील परिस्थिति प्रत्यक्ष तिकडे जाऊन पाहून त्याप्रमाणें हुकूम सोडतात.

येथून एक मैल अंतरावर एका मोठ्या जुन्या कालव्याचा २०–२५ फूट उंचीचा बंधारा असून याच्या अलीकडे आणखी एक जरा ठेंगणा बंधारा होता. या दोन बांधांच्या मध्यें उभें राहून शत्रूनें धडाडीचा गोळीबार चालविला होता. असें ऐकलें कीं, मागच्या मोठ्या बंधाऱ्यामागें शत्रू आहे या कल्पनेवर आमच्या तोफांचा नेम सोडीत होते (व तो अचुक लागत होता असें नंतर प्रत्ययास आलें), पण त्यामुळें व्हावें तितके शत्रूचें नुकसान न होण्याचें कारण असें कीं शत्रू दोन्ही बंधाऱ्यामध्यें असल्या कारणानें आयताच वांचत होता !

मला वाटतें कांहीं लोक मुख्य कॉलममध्येंच ठेवून आमच्या दोन कंपन्या शीखांच्या डाव्या हाताच्या फ्रंटवर गेल्या व याच्या मागे चांगल्या अर्ध्या मैला-वर मी आपल्या पलटणीच्या हेड्क्वार्टरबरोबर होतों. एक खोलगट जागा पाहून तेथें आम्हीं जनावरें उभीं केलीं. सव्वातीनचा सुमार होता. यावेळीं आमच्या डाव्या हाताच्या बाजूनें नदीपलीकडून पहिली गोळी येऊन आमच्या जवळच जमीनीवर आदळली. आम्हीं पाहिलें तों नदीपलीकडे कित्येक घोंगडीवाले लोक वावरत होते. व आमच्या समोरील बंधाऱ्यामागून गोळीबार सुरूं आहेसें पाहून या बाजूच्या लोकांनींही, गोळ्या झाडण्यास हळहळू सुरुवात केली व पुढें इकडूनहि जोराच्या गोळ्या येऊं लागल्या. त्या वावरणाऱ्या लोकांत बायकाहि दिसत होत्या. अर्थात् या फ्रंटचाहि विशेष बचाव करणें प्राप्त होतें. कारण नदी-पर्यंतची जागा पाणी–पुरवठ्याच्या दृष्टीनें आमच्या पूर्ण आटोक्यांत ठेवणें अगत्याचें होतें.

## पहिली गोळी.

पहिली गोळी आलेली पाहिली तेव्हां मला फारच गम्मत वाटली व मीं एका उंचवट्यावर चढून आपली दुर्बिण रोंखली. कांहीं तरी अननुभूत, चमत्का-रिक व चित्तवेधक ती परिस्थिति होती, असें मला वाटलें. मग जेव्हां फार गोळ्या येऊं लागल्या–पुढून व डावीकडून–तेव्हां तेथून जनावरें काढून आम्हीं पाठीमागें लावून दिलीं. एका खोलगट, आडोशाच्या जुन्या कॅनॉलमध्यें मीं ड्रेसिंग स्टेशन उघडलें.

## अनपेक्षित भेट

इतक्यांत चार डोलीवाले कोणा जखमी मनुष्याला घेऊन परत जातांना दिसले. त्यांना ड्रेसिग स्टेशन माहित नसेल तर आपणच त्यांना इकडे घेऊन यावें म्हणून मी त्यांच्याकडे अर्धा फर्लोग गेलों, पण माझ्या ड्रेसिग स्टेशनच्या मार्गे कांहीं अंतरावर शीख पलटणीच्या डाक्टरचें ड्रेसिग स्टेशन होते तिकडें ते डोलीवाले जात होते. मीं पाहिलें तों ते डाक्टर माझ्या ओळखीचे निघाले.



डोली–बेअरर

पांच सात वर्षांनंतर ही आमची पहिलीच भेट गोळीबाराच्या तडाक्यांत एका कालव्याच्या खड्डयांत झाली ! शत्रूच्या माऱ्यांत उघड्यावर फिरल्याबद्दल त्यांनीं माझी कानउघाडणी केली ! नंतर एकमेकांना 'गुड् बाय' करून व 'गुड लक्' इच्छून, मी परत आपल्या ड्रेसिग स्टेशनमध्यें आलों.

## जखमी जनावरांची वाट

मनुष्यें व खेचरें सारखीं जखमी होऊं लागलीं. कांहीं घोडयांनाही गोळ्या लाग‌ल्या. 'घोडा डाक्टर' ब्रिगेडमध्यें होतेच. अगदीं निरुपयोगी होणाऱ्या जनावरांना गोळी घालून त्यांचे क्लेश ताबडतोब थांबविण्यांत येतात व इतर बरीं होण्यासारखीं जनावरें परत पाठविली जातात.

**क्रिकेटचा खेळ**

अगदीं फायरिंग लाइनमधून जखमी शिपाई युनिटच्या ड्रेसिंग स्टेशनपर्यंत युनिटचे डोलीवाले स्ट्रेचरवरून किंवा तसाच आणतात व सवडीप्रमाणें आणखीहि मागे घेऊन जातात व येथून फील्ड ॲम्ब्युलन्सचे डोलीवाले त्यांना अगदीं पिछाडीला ॲम्ब्युलन्स हॉस्पिटलपर्यंत नेऊन सोडतात. नंतर वेळेच्या व वाहनाच्या फुरसतीप्रमाणें त्यांची रवानगी एकाद्या पोस्ट हॉस्पिटलमध्यें होते. लवकर बरा होण्यासारखा नसला तर त्या जखमी अगर आजारी सैनिकाला आणखी मागें—आगगाडीनें, किंवा रेल्वे नसल्यास मोटरनें, किंवा वेळ पडल्यास खटाऱ्यांतून ॲडव्हान्स बेसपर्यंत नेऊन सोडतात. चालण्यासारखे असतात ते पायींही जातात. बगदाद हा आमचा ॲड्व्हान्स बेस होता. येथील हॉस्पिटलें भरलीं किंवा जखम किंवा रोग लवकर बरा होण्यासारखा नसल्यास त्याची थेट मुख्य बेसपर्यंत ( बस्रा ) रवानगी होई व मनुष्य निकामी अगर फारच दिवसांनीं बरा होणारा असल्यास त्यास हिंदुस्तानांत परत पाठवीत. जखम झाली असतां अगर आजारी पडल्यास दुःखांत सुख हेंच असतें ! जितकी जखम भयंकर स्वरूपाची तितकीच गोळीबाराच्या ठिकाणापासून अधिकाधिक लांब जाण्याची संधि मिळते. जखमेचें दुःख या सुखाशीं सारख्याच प्रमाणांत असतें. याहीपेक्षां तीव्रतर जखम असेल तर अगदीं थेट स्वर्गापर्यंत मनुष्य जातो ! एकादी सौम्य पण बरें होण्यास वेळ घेणारी जखम व्हावी असें कित्येकांच्या मनांत आल्यास नवल नाहीं ! कांहीं धूर्त लोक याकरतां अनेक युक्त्या योजतात ! कोणी बांधलेली पट्टी सोडून, सुटली म्हणून सांगतात, किंवा जखमेवर माती पेरतात; म्हणजे ती लवकर बरी होऊं नये ! गोळी लागणें हें क्रिकेटसारखे 'चान्स' वर आहे. फायरिंग लाईनमध्यें गोळी लागते. कँपांत घरबसल्या गोळी लागूं शकते पण क्रिकेटमध्यें ज्याप्रमाणें साधारण मान पहातात तसेंच एकाद्या पलटणीची कामगिरी ठोकळ मानानें जखमी लोकांच्या संख्येवरून अजमावतात. फ्रान्समध्यें अनेक वेळां गोळ्या व श्रॅपनेल लागलेले किती तरी लोक आहेत. माझा ऑर्डर्ली फ्रान्समध्यें दोनदां जखमी झाला होता. आमच्या कर्नलनें बोअर वॉरमध्यें तीन गोळ्या पचविल्या होत्या. कोणालाशा तेरादां जखमा झालेल्या आहेत ! जखमेचें कौतुक करतात, पण खरें पाहतां जखमी मनुष्य त्याच्याच खांद्याशीं खांदा भिडवून लढणाऱ्या माणसापेक्षां अधिक कामगिरी करतो असेंच

नाहीं ! आमच्यांत एक हूड तरुण ऑफिसर होता त्याला या बंडांत एकंदर तीनदां गोळ्या लागल्या. एकदां कूफानजीक नदींत एका लहानशा बेटावर एक पिकेट म्हणजे पहारा ठेवला होता, त्यावर ह्या स्वारीची नेमणूक झाली होती. नदीपलीकडे शत्रू मोर्चे देऊन बसला होता व वर डोके काढण्याची तेथें सोय नव्हती. हें पिकेट एका खड्डयांत होतें. जवळच असलेल्या खजुरीच्या झाडावरील आगष्टमधील ताजा खजूर पाहून त्याच्या तोंडाला पाणी सुटलें व म्हणून वर बांधावर स्वारी आली पण ताज्या खजुराऐवजीं शत्रूकडील 'शिसाचा एक तुकडा'च कांखेत मारून स्वारी खालीं आली !

**कांहीं गमतीदार विचार**

शेंकडा अगदींच थोड्या लोकांना जखमा झाल्या, व एकंदरीत पहातां भीति कमी असली, तरी सर्वत्र दैवावर म्हणजे चान्सवर असल्यामुळें त्या थोड्या लोकांपैकींच आपण एक झालों तर ? शंभरांत एकालाच गोळी लागणार असली तर कोणाही एका व्यक्तीला गोळी लागण्याचा 'चान्स' फक्त शंभरांत एकच आहे–म्हणजे अगदीं कसपटाप्रमाणें आहे पण यदा कदाचित् समजा त्याच एक हिस्शानें लागलीच गोळी मर्मस्थानीं, तर मात्र मरण्याची खात्री शंभर हिस्से असते ! आतां मर्मस्थानीं न लागतां जिवावरचें शेंपटावरच गेलें तर दुसरा एक मुद्दा आहे. संभवनीयता विचारांत घेतां हें उघड आहे कीं एकदां जखम झाली असली तर पुन्हा आपल्यालाच जखम होण्याचा संभव कमी. व उलट, जर दुर्दैवानें झालीच, तर हेंहि उघड आहे, कीं आधींची जखम क्षुल्लक असल्या-मुळेंच दुसरी जखम होण्यास आपण जिवंत राहिलों; आणि पहिली जखम लहानशी असेल तर आतां जबर जखम होण्याचाच संभव जास्त ! !

**कांहीं परिचित आवाज**

बंदुकीचा आवाज वेगवेगळा ऐकूं येई. तें बंदुकीच्या व गोळयांच्या तऱ्हेवर व ज्या प्रदेशांतून गोळी प्रवास करते–म्हणजे उघडें मैदान, झाडी, डोंगर वगैरे, त्यावर अवलंबून आहे. शत्रूच्या बंदुकीचा 'ठाक्–ठिक्' असा दुहेरी आवाज ऐकूं येई. 'टुप्' किंवा 'फट्' असा आमच्या बंदुकींतून आवाज निघे. प्रत्येक पलटणींत कांहीं लुईस गन्स् असतात. (स्क्रू सारखी) लोखंडी वाटोळ्या जिन्याप्रमाणें वळविलेली एक पत्र्याची चकती असते, त्याच्या सांपटींत परिघा-जवळ एकदमच साठ–एक गोळ्या भरून ठेवण्याची व्यवस्था असते. हें चक्र

बंदुकींतील गोळी मारण्याच्या तोंडाशीं आणून लावलेलें असतं. घोडा दाबला कीं हें चक्र फिरूं लागतें व एकएक गोळी त्यांतून आपोआप घसरून गोळीच्या भोकांत नेमकी जाऊन पडते व घोडा खेंचलेला असेपर्यंत तेथून पटापटा एका-मागून एक गोळ्या उडतात. पहिले चाक संपलें की झट्‌दिशीं तें काढून आगाऊ भरून ठेवलेले नवें चाक बसवितात. या बंदुकींतून गोळ्या इतक्या लवकर उडतात कीं अनभिज्ञ मनुष्याला जर घोडा ओढून नेमक्या दोनच गोळ्या उड-विण्यास सांगितलें तर हां हां म्हणतां ५–१० गोळ्या झाडून तो पार होईल! नवशिक्यानें फोटोला पाव सेकंड एक्स्पोजर देण्याइतकेंच हें अवघड आहे. या लुइस–गन्‌चा 'सट्–सट्–सट्–सट्' असा आवाज निघतो. लुईस–गन्‌च्या अभ्यासाचें देखील एक मोठें शास्त्र आहे. एक नाईक किंवा हवालदार व दोन पासून सहा शिपाई इतक्या तुकडीच्या ताब्यांत एक लुइस्–गन् असते. लुइस्-गन् व त्याचीं उपकरणीं खेंचरावरून नेतात. एक शिपाई खांद्यावर लुइस्–गन् नेऊं शकतो.

मशीनगन्स मात्र पलटणी-पलटणींत नसतात. त्याचा निराळाच सेक्शन, ब्रिगेडमध्यें असतो. एका लांब पट्ट्यावर गोळ्या अडकवून तो एका चाकाला गुंडाळून ठेवलेला असतो. त्याचें सुटें टोंक मशीन गन्‌च्या गोळीच्या भोंकाच्या तोंडावरून नेऊन दुसऱ्या चाकांत अडकवितात. हें दुसरें चाक फिरविलें कीं, 'स टा–टा–टा–टा–टा' असा गोळ्यांचा भडिमार होतो.

तोफेच्या आवाजाचें वर्णन इंग्रजींत 'भूप्' असें करतात व गोळ्यांचा स्फोट 'बँग' अशा शब्दानें दर्शवितात. आगगाडीचा आवाज जसा आपण म्हणूं तसा होऊं शकतो–म्हणजे त्याला कोणतीही चाल लावतां येते तसेंच तोफेच्या आवाजाचें आहे. अगदीं क्वचित् तोफेचा गोळा तोफेंतून सुटल्यानंतर निमिषमात्र दिसतो. बंदुकीचा बार ऐकूं येण्यापूर्वींच गोळी आपल्या-जवळून निघून गेलेली असते: पण तोफेचा गोळा सावकाश प्रवास करतो. किती लांबीवर गोळा पडला हें ओळखण्याची युक्ति अशी कीं, तोफ उडाल्या-पासून गोळा आपटून झालेल्या स्फोटाचा आवाज ऐकूं येईपर्यंत सेकंद मोजावे. (सोळा पाऊंडर) तोफेच्या गोळ्याची गति पांच सेकंदाला एक मैल इतकी साधारण असते. आम्ही कित्येकदां एकुणतीस–तीस अंक मोजले आहेत. म्हणजे सहा मैलांवर गोळा फुटला असला पाहिजे. गोळ्याचा स्फोट झाला म्हणजे

१०० यार्डोच्या त्रिजेंत धोका असतो. काळा धूर व धूळ यांचा लोट एकदम उडालेला दिसतो. गोळा किंवा गोळी आपल्या अंसाभोंवतीं गरगर फिरत जाते; नळकांडींतून सुटतांना स्क्रूसारख्या पेंचामुळें त्यांना अशी मुद्दामच गति देण्यांत येते, म्हणजे त्या तितक्या जोरानें व सरळ रेषेंत जातात. गोळा डोक्यावरून जात असतां ' गुंई–गुंई–गुंई ' असा आवाज होतो. तोफेच्या गोळयाचा स्फोट माझ्याजवळ कधींच न झाल्यामुळें तो झाल्यावर कसे वाटतें तें मला सांगतां येणार नाहीं ! बंदुकीची गोळी जवळ येऊन आदळली म्हणजे थोडीशी धूळ उडालेली दिसते व ' फट् ' असे वाजतें. प्रस्तुतच्या चकमकींत शेंकडों गोळया आजूबाजूनें जात होत्या. समोरून डाव्या हातानें व आतां उजव्या बाजूनेंही गोळयांचा सारखा वर्षाव होत होता. गोळी फार वरून गेली तर ' सुईंई ' असा आवाज होतो. ' पझ्–झ् ' किवा ' व्हिज़् ' ऐकूं आलें कीं गोळी ,अगदीं जवळून गेली असें समजावें. जवळांत जवळ माझ्यापासून तीन फूट अंतरावर गोळी पडली. अगदीं जवळ गोळी पडली म्हणजे क्षणशतांश दचकल्यासारखे होतें पण अनपेक्षितपणें कोणीं दार ठोठावले अगर मांजराने भांडें वाजविलें तरी मनुष्य दचकतो. गोळयांची संवय झाली म्हणजे या दार खडखडण्यापलीकडे जास्त कांहीं वाटेनासें होतें !

दुपारीं २॥–२॥। वाजल्यापासून जवळ जवळ अंधेर पडेपर्यंत ही लढाई चालू होती व रात्रभरही मधूनमधून ' शिशाचे तुकडे ' येतच होते.

### एक ' विस्मरणीय ' रात्र

त्या पहांटे आम्हीं अल्पशी न्याहारी करून निघालों होतों. पाठीवरील झोळींत थोडें खायला घेतलें होतें तें दुपारच्या आंतच संपलें होतें ! अर्थात् त्यानंतर आम्हांस कांहींच खावयास मिळाले नाहीं. कारण फराळाचीं खेंचरें मागें पाठविण्यांत आलीं होतीं. व जवळ असतीं तरी खाना तयार करण्यास फुरसत किंवा सुरक्षित जागा नव्हती. रात्रीं गोळीबार थंडावल्यावर मी आपल्या ड्रेसिंग स्टेशनमधून कर्नल वगैरे एका कोरड्या काल्व्यांत बसले होते तिकडे परत गेलों. माझ्याकरतां त्यांनीं डब्यांतील ' फ्रूट'च्या पाकांतील एक रसाळ फोड मुद्दाम ठेवली होती तीच खाऊन व पिऊन मी आपली तहान-भूक भागविली. कित्येकांनीं त्या दिवशीं फक्त शत्रूच्या गोळयाच खाल्लया. कर्नलचे सांगण्यावरून मीही जवळच त्याच कालव्यांत बसलों. ऑर्डर्ली बरोबर होताच.

त्या रात्रीं विलक्षण त्रास झाला. व ही रात्र कित्येक दिवस माझ्या आठवणीं-तून जाणार नाहीं. शत्रू एकच जातीचा नसतो. डांसांनीं आम्हांला त्राही भगवान् करून सोडले. ! खड्डयांत तर त्यांचा मनस्वी त्रास. पण खड्डयाबाहेर डोके काढणें—अधेमधें गोळ्या येत असल्याकारणानें सोईचें नव्हते ! अंगांत शॉर्ट व शर्टच असल्यामुळें पाय व हात बरेच उघडे रहात. हाताच्या बाह्या वर गुंडाळ-लेल्या होत्या. त्या खालीं सोडाव्या तर उकडे ! खालीं खडबडीत जमीन बोंचत होती. सबंध रात्र जवळजवळ जागूनच काढली !

रात्रीं दहाच्या सुमारास कोणी तरी खुरडत खुरडत आमच्या खड्डयाकडे आले. हा एक मराठा पलटणींतील पायांत जखमी झाल्यामुळें मागें राहिलेला शिपाई आपली पलटण शोधीत येत होता. तो म्हणाला : पलटण मागे निघाली पण पायांत गोळी लागल्यामुळें मला चालवेना व मी एका झुडपाआड लपून राहिलों. मग अंधेर पडल्यावर मी इकडे यावयास निघालों. त्याची जखम बांधून त्याला सकाळपर्यंत आमच्याजवळ ठेवला, व सकाळीं मागे हॉस्पिटलमध्यें लावून दिला.

' एन्ट्रेंचिंग टूल्स् ' म्हणजे खंदक खणण्याचीं हत्यारें प्रत्येक शिपायाजवळ असतात. यांत एक लहानसें फावडें व एक बारीक कुदळ असतें. मृत व जखमी शिपायांचीं अशीं किती तरी आयुधें इतस्ततः पडत. त्यांपैकीं एक जोडी मीं घेतली होती. एकाद्या जखमी सैनिकाला तात्पुरती सुरक्षित जागा तयार कर-ण्यास या आयुधांचा फार उपयोग झाला.

**' आट्यापाट्याचा खेळ मजेचा ' !**

बारा तास आमच्यावर गोळीबार होत होता त्याला पहांटेपासून खंड पडला व ती काळरात्र एकदाची उजाडली. प्रातःकालचे तेजस्वी सूर्य किरण जिकडे तिकडे पसरले व आमच्या प्रत्येकाच्या मनांत त्यांनीं नवा जोम आणला. पण ते किरण काय दाखवीत होते ? मेलेले शिपाई, खेचरें व घोडे ! इकडे तिकडे हिंडण्यांत मीं थोडासा वेळ घालविला. लढाईंतील किळसवाणे प्रकार व अत्या-चार पाहिले, व बराच वेळ पाहिल्यावर जीव आणि मरण हा मला एक पोर-खेळ वाटला ! लढाई हा आट्यापाट्याचा खेळ आहे. आट्यापाट्यांत आपला गडी ' मेला ' म्हणजे आपल्याला जसें वाटतें तितकेंच आट्यापाट्याचा हा खेळ पाहून त्या वेळीं वाटतें !

प्रेतांची योग्य वाट लावून व भुकेस पात्र असलेल्या पोटांची योग्य सोय करून आम्ही रुमेथाहून तीन मैल अलीकडे जाऊन थांबलों. एव्हांना रुमेथाचा वेढा उठला होता. गोरी पलटण मग पुढें काढण्यांत आली व तिनें रुमेथास जाऊन तेथे अडकलेल्या सैन्यास परत आणलें.

वाटेंत पुष्कळ ठिकाणीं (आम्हीं रेलवे लाईनच्या बाजूनेंच प्रवास करीत होतों) डबे, एंजिनें उलथून पडलेलीं दिसत होतीं. कित्येक जागची रेलवे लाईन शत्रूनें उखडून टाकली होती, पूल मोडले होते, व लाईन पुन्हां लवकर नीट करतां येऊं नये म्हणून रूळ लांब नेऊन टाकले होते, स्लीपर लांब नेऊन पुरून ठेवले होते. तारेचे खांब उपटून तारा तोडून टाकल्या होत्या.

**एक भयानक समजूत !**

विशेषतः फ्रान्समधून परत आलेल्या कांहीं लोकांची अशी समजूत दिसली कीं धामधुमीच्या, धास्तीच्या व गडबडीच्या वेळीं पुष्कळ प्रेतें पुरणें असल्यास त्यांच्याकरतां केलेल्या थडग्यांत म्हणजे खड्डयांत थोडीशी धुगधुगी असलेल्या मनुष्यालाहि एकाद वेळ पुरण्यांत येई !!! यामुळें त्यांना जाया होण्याची अधिकच भीति वाटे, किंवा जखमी होण्यापेक्षां किंबहुना मरण्यापेक्षां यानेंच तें अधिक भीत! पण कित्येकदां निःसंशय मेलेल्या माणसांना देखील योग्य तऱ्हेनें मूठमाती देणें अशक्य होतें तेथें जिवंत माणसांना कोण पुरणार !!

गोळीबार होत असतां मनःस्थिति कशी असते असें पुष्कळ लोक विचारतात. अत्यवस्थ स्थितींत असलेल्या रोग्याला विचार सुचत नाहींत, त्याची तंद्री भलतीकडेच लागलेली असते. आपलें दुखणें जिवावरचें आहे ह्याचें त्याला भान नसतें. तसेंच फायरिंग लाइनमधील मनुष्य आपली भयंकर परिस्थिति विसरतो. आपलें काम करण्यांत तो इतका गढून गेलेला असतो कीं विचार करण्यास त्याला अवकाशच नसतो. मात्र कसला तरी एक गंभीर स्वरूपाचा ताण त्याच्या मनावर असतो. (प्रत्यक्ष मरणाची भीति मात्र प्रामुख्येंकरून मुळींच नसते. असली तरी ती कामाच्या दडपणाखालीं दाबून राहिलेली असते.) एकाद्या सर्कशींत सिंहाच्या तोंडांत एकादी युवति गळा देते त्यावेळीं जसा आपल्या मनावर ताण असतो तसा. वास्तविक आपला कांहींच संबंध त्यांत नसतो. तद्वत लढाईतील एकंदर परिस्थितिच मनाला ताणणारी असते.

रुमेथाच्या अलीकडे तीन मैलांवर मुक्काम केला होता त्याच दिवशीं म्हणजे २० तारखेस संध्याकाळीं रुमेथामधील सोडवून आणलेल्या लोकांना बरोबर घेऊन आमची ब्रिगेड दिवाणियाकडे परतण्याकरतां निघाली. त्या दिवशीं विशेष कांहीं झालें नाहीं. दुसऱ्या दिवशीं आमचा मुक्काम पडला तें ठिकाण १९ तारखेची लढाई ज्या बंधाऱ्याजवळ झाली त्याच्या उत्तरेस म्हणजे दिवाणियाकडच्या बाजूस होतें. तिसरे दिवशीं २२ तारखेस तेथून आम्हीं फिरून कूच केलें. ऑगस्टची ही बावीस तारीख मी जन्मांत कधींही विसरणार नाहीं.

## ५ एक अवघड 'रिट्रीट'

शत्रूच्या तोंडाला तोंड देणें एक वेळ सोपें आहे पण शत्रूकडे पाठ करून जाण्यासारखी अवघड कामगिरी कोणची नाहीं! 'शिस्तीनें माघार' ज्याला घेतां घेईल तो चांगलाच सेनानायक समजला पाहिजे. कित्येक लोक या 'शिस्तीनें माघार घेण्याची' टवाळी करतात व केव्हां तें तसें असेलहि, पण त्या लोकांना या कामाच्या धाडसाची कल्पना नाहीं–ते न समजून उपहास करतात असें म्हणणें प्राप्त होतें. त्यांतून रानटी लोकांशीं गांठ पडली म्हणजे कठिणच प्रसंग.

आम्ही जात होतों तेथें रस्ता असा मुळींच नव्हता,–आमच्याच चालण्यानें व गाड्यांच्या चाकांनीं जो तयार होईल तेवढाच रस्ता. रेलवे लाईनला धरून धरून आम्ही मार्ग आक्रमीत होतों. आमची पलटण रिअर गार्ड होती. रिअर गार्डचें काम माघार घेतांना फार धोक्याचें, शिस्तीचें व जबाबदारीचें असतें. अशावेळीं ज्याला 'लाटासारखें परतणें' म्हणतात त्या पद्धतीनें कूच करतात. म्हणजे असें कीं सर्वच लोक पाठमोरे चालले तर कोणालाच मागचें दिसावयाचें नाहीं व शत्रूला आयतेंच फावेल; शिवाय शत्रूनें लगट केली तर त्याला एकदम तोंड देणें कठिण पडेल. म्हणून अगोदरपासून कोणी तरी शत्रूकडे तोंड करून उभें करून ठेवणें जरूर असतें. पलटण जरी सारखी माघारीं चालली असली तरी आळीपाळीनें सतत एकादी तुकडी शत्रूला तोंड देऊन उभी केलेली असते.

आम्ही कॅंप सोडून निघालों व लागलीच कांहीं वेळानें 'ठाक्–ठीक्' असा शब्द ऐकूं येऊं लागला! मी रिअर गार्डबरोबर होतों. मधुनच एखाद्याला गोळी लागूं लागली. क्रमानें गोळीबार वाढतच चालला व जास्तच लोक जखमी होऊं लागले. आमच्या मागील शिपाई रेलवे लाईनकडे जमतांना दिसूं लागले. आम्ही थांबलों, मागें वळलों, तोंच ते आम्हांला येऊन भिडले. त्यांची प्रवृत्ति कॉलमचा मध्य गांठण्याकडे दिसली. अर्थात् लोक जे आधीं पांगलेले होते ते 'गठ्ठा' झाले...एरवीं देखील शिपाई जवळून जवळून चालले तर कोणाला ना कोणाला गोळी लागण्याचा संभव वाढतो. अर्थात् पटापटा जखमा होऊं

लागल्या. कांहीं डोलीवालेही जाया झाले. शत्रूनें तर गोळीबाराचा धूमधडाका उडविला, व अगदींच लगट केली. आतां आमच्या मागे शंभर–एक यार्डावर कांहीं लोक आले ! एकदोन अरब तर पिस्तुलाच्या आटोक्यांत–५० पावलांपर्यंत सरसावले ! शिस्तीने काम केले तर त्याची बरोबरी करणें अवघड आहे. नाहींपेक्षां जो तो जीव बचावण्याच्या नैसर्गिक स्फूर्तीनें व भांबावून जाऊन स्वतःच्या जबाबदारीवर काम करतो पण त्याचा परिणाम मात्र त्या संघावर अत्यंत घातुक असा होतो. म्हणूनच पलटणीचें 'मॉरल' व शिस्त चोख पाहिजेत.

* * * *

आमच्या ब्रिगेडच्या कॉलमची लांबी दीड मैल असेल. पण पुढचे लोक एव्हांना बरेच पुढें निघून गेले होते–दिसेनासे झाले होते. आम्हीं मुख्य कॉलमपासून तुटल्यासारखेच होतों. उन्हाचा तीव्र मारा. पाण्याकरतां जीव कासावीस झालेला. पण या घटकेला तिकडे कोणाचें लक्ष नव्हतें.

दोन-तीन मैल परतल्यानंतर गोळीबार मंदावला. जखमी लोक आणीतच होतों. डोलीवाल्यांची कामगिरी दुप्पट धास्तीची आहे. कारण शत्रूला तें चांगलेंच लक्ष्य होतें. इतक्यांत शीख पलटणीचा वृद्ध कमांडिंग ऑफिसर आमच्यापाशीं आला. हा म्हातारा फार मनमिळाऊ व लायख मनुष्य होता. त्याला पाहूनच आम्हांला धीर आला व गाडें सुरळीत चालू झाले.

या रिट्रीटमध्यें आमचे ५० पासून ७५ लोक जखमी झाले असें आठवतें, त्यांत दोन ब्रिटिश ऑफिसरहि होते. यापैकीं आमच्या ॲड्जुटंटला कोंपरापाशीं गोळी लागली होती, व हाडहि दुखवलें होतें. पण त्याची जखम बांधीत असतां तो अगदीं शांतपणें उभाच राहिला. रोजच्या घरगुती व्यवहारांत होणारी नित्याची गोष्ट व्हावी तशीच हीही एक गोष्ट आहे अशी त्याची मनोवृत्ति दिसली. जसें कधीं कधीं नेकटाय् सरकायचाच व तो सरकत असतां जसा सहज सांवरायचा तितक्याच महत्त्वाची ही गोष्ट आहे अशी त्याची भावना होती. हॉस्पिटलमध्यें जायलाहि तो नाखुष होता !

याप्रमाणें २२ तारखेचा तो दिवस मावळला. कांहीं लोकांच्या आयुष्यांत हीच शेवटची तारीख ठरली !



आमच्या पलटणीचे हपीसर.

उभेः—कॅ. रिकेट्स; कॅ. हंट; कॅप्टन

खुर्चीवरः—कॅ. केरिज; ले. कर्नल कॅरो

बसलेलेः—कॅ. प्लेफेअर; कॅ. लिमये.

रवेडेगांवांतील सकाळ
A Bedoin Caravan

खजुरीचीं झाडें
The Date Palms

Variety of Scenery in Mesopot

वाळवंटांतील जहाजें
A Village Morning

मेसोपॉटमधील सूर्यास्त
A glorious Sunset

मेसोपॉटमधील विविध सीन-सीनरी !

तीन दिवस वाट चालून आम्हीं परत दिवाणियाला २५ तारखेला येऊन पोहोंचलों. हा बावीस मैलांचा प्रवास झाला. वाटेनें एकसारखें स्नाइपिंग होतच होतें.

दिवाणियाला पांच दिवस मुक्काम पडला.

**भवितव्यता बलीयसी !**

आमच्या कर्नलचें एक कुत्रे होतें. इंडिअन पलटणींत मॅस्कॉटची पद्धत विशेष नाहीं तरी ह्या कुत्र्याला गमतीनें मॅस्कॉट समजण्यांत येत होतें. मांजराशीं भांडण्यांत हें कुत्रें पटाईत होते. एकदां तंबूच्या दुहेरी छपरामध्यें एका मार्जाराचें व 'पीटर'चें जंगी युद्ध होऊन पीटरनें मार्जाराला मुक्ति दिली होती. पीटरचा आम्हांला एक मोठा फायदा होता. आसपास पीटर येतांना दिसला कीं मागोमाग कर्नल येणार म्हणून ओळखावें ! १९ तारखेच्या झटापटीनंतर पीटरला आमच्याबरोबर घेणें धोक्याचें होतें. कारण पीटरसाहेब फायरिंग लाइनमध्यें घुसावयाचे–किंबहुना रिकनॉइटरिंग् करण्याकरतां शत्रुपक्षाकडे धांव घ्यावयाचे ! शिवाय पीटरसाहेब ' गोरे ' असल्यामुळें त्यांच्यावर स्नाइपरची बंदुक रोंखली जाण्याचा फार संभव होता. म्हणून त्यांची रवानगी एका विश्वासु मनुष्याबरोबर पिछाडीला दिवाणियाच्या डेपकडे करण्यांत आली होती. इमाम हंझापासून पीटर आगगाडींतून दिवाणियापर्यंत सुखरूप गेला पण दिवाणियाच्या स्टेशनवर गाडी थांबेपर्यंत दम न निघाल्यामुळें त्यानें आगाऊच, खिडकींतून खालीं उडी टाकली. दुर्दैवानें तें बिचारें कुत्रें चाकाखालीं सांपडलें व त्याचा पाय मोडला. कांहीं दिवस हॉस्पिटलमध्यें राहूनहि तो बरा होण्याचें चिन्ह दिसेना तेव्हां शत्रूचें काम घोडा–डाक्टरनें केलें : पीटरला गोळी घालून त्याचे कष्ट कायमचे संपविण्यांत आले ! अशा रीतीनें त्या मुक्या प्राण्याचा अंत झालेला ऐकल्यावर सर्वांनाच वाईट वाटलें.

कोण्या वेळेला आणि कसा मृत्यु येईल याचा कांहीं नेम नाहीं. 'भवितव्यता बलीयसी '–हें आधुनिक भाषेत बोलावयाचें म्हणजे वरीलप्रमाणें म्हटलें पाहिजे. भवितव्यता किंवा दैव यांत आगाऊच ठरलेल्या गोष्टी होतात, पण त्यांची योग्य नोटीस आपल्याला आगाऊ मिळत नाहीं असा भाव आहे; व ' चान्स ' मध्यें अशी कल्पना आहे कीं जें होतें तें होतें ! दोहोंतही आपल्याला पुढें काय होणार तें आगाऊ कांहींच कळत नाहीं. पण दैवावर हवाला देणाऱ्या शिपा-

याची मनःस्थिति अधिक समाधानी असते. आणि ' चान्स ' वादी मनुष्याला सर्व भिस्त स्वतःच्या कर्तबगारीवर, हालचालीवर ठेवावी लागल्यामुळें कधीं तो विशेष हताश तर कधीं विशेष समाधानी होतो व एकंदरींत त्याच्या मनावर सतत अधिक ताण पडतो. तेव्हां फील्ड सर्व्हिसवर जाणारा मनुष्य ईश्वरवादी व दैववादी असल्यास एका दृष्टीने चांगले. आगबोटींत पाय ठेवण्यापूर्वी आपद्धर्म म्हणून जातीभेद मोडावा, उपयुक्त पण वेंचकच सामान व दैवावरील भाव बरोबर घ्यावा, मृत्युपत्र करावें, देव आहे असें ठरवावें व आगबोटींत चढण्यास फॉल इन् व्हावें म्हणजे ( जिवंत असेपर्यंतचें ) त्याचें आयुष्य सुखावह होईल!

रोगाच्या सांर्थीमध्यें वाटतें त्याप्रमाणें प्रत्येकाचें आंतील मन त्याला सांगत असतें कीं इतक्या लोकांत आपल्यालाच कसची गोळी लागते !

गोळीबार हा उपदेशाप्रमाणे आहे. शत्रू जर वाह्यात झाला तर त्याची समजूत करण्याकरतां त्याचा उपयोग करण्यांत येतो. उपदेशाप्रमाणे तो कडू लागतो व लोकांना तो नको असतो. हजार लोकांना उपदेशामृत पाजावें तेव्हां एकादा इसम वठणीवर येतो. हजारांतील एकादी गोळी लागते

शत्रूकडून नव्हे पण इतर अनपेक्षित रीतीनें मृत्यु कसा येतो पहा. इंफ्लुएंझांत किती तरी लोक मेले. आर्मिस्टिस होऊन मोझँबिकहून परत दारेसलामला जाण्याचा हुकूम आला त्या वेळीं त्या सांथीची लाट तेथे होती. पण तितक्यांत आमच्या पोस्ट हॉस्पिटलचा कमांडिग ऑफिसर त्या रोगाला बळी पडला ! दारेसलामच्या वाटेवर आमच्या आगबोटींतील सॅनिटरी ऑफिसरला फ्लू झाला व दारेसलामला पोहोंचल्यावर हास्पिटलमध्यें तो वारला. अरब बंड संपल्यानंतर हिंदुस्थानांत परत जाण्याकरतां आगबोटीवर जागा मिळण्याची आम्ही बसऱ्यास वाट पहात असतां आमच्या पलटणींतील एका शिपायाचा खून झाला. खुनाचें कारण कळले नाहीं. सकाळीं जेव्हां हजेरीला तो आला नाहीं तेव्हां तपास सुरू झाला व आमच्या कॅंपाजवळच खजुरीच्या झाडींत त्याचें प्रेत सांपडलें. त्याला पुष्कळ ठिकाणीं सुरीच्या जखमा झाल्या होत्या व तोंड ओळखूं येत नाहींसें झालें होते. तसेंच बगदादला असतांना पहाऱ्यावर असलेल्या एका शिपायानें दुसऱ्या शिपायास कांहीं कारणानें गोळी घालून ठार केलें. ऑपरेशनवर असतांना दोन-तीनदां चुकीनें आमच्या पलटणीच्या कंपनीवरच आमचे तोफेचे गोळे जाऊन पडले पण ते फुसके



२२-७-२०चा रिट्रीट
१ इंच = १०० यार्ड
पलटणीची प्रथमची ठेवण
N
E
W
S
गार्ड
फ्लँक
कूच करण्याची दिशा
याबाजूला
मुख्य कॉलम
१-२ मैल
शत्रूने
लगट केल्यानंतर
या ठिकाणी
शिपाई गवा झाले
पं
जा
बी
पायोनियर
बंडवाले
इमाम हंझाकडे ⟷ रूमेथाकडे.
गार्ड
फ्लँक
SKLP
D

निघाल्यामुळें कांहींच नुकसान झालें नाहीं. पण एकदां एका पलटणींतील ऑफिसर आमच्याकडच्या तोफेमुळेच कामीं आला, असें ऐकले ! रिट्रीट करीत असतां एकदां आमचा मुक्काम जरबुया गांवीं पडला. येथें आमच्या पिकेटला अर्ध्या मैलावर झाडींत कांहीं तरी करीत असलेला एक मनुष्य दिसला म्हणून पिकेटनें एक गोळी झाडली, त्याबरोबर ती व्यक्ति खाली पडली. मग कांहीं लोक तिकडे गेले व पहातात तों आमच्याच पलटणीपैकीं तो एक शिपाई निघाला ! शेतांतील ताजी भाजी आणण्याकरतां तो कॅंप सोडून गेला होता. नेमकी त्याच्या पोटांत गोळी गेली ! दुर्दैव बिचाऱ्याचें ! गोळी नेम धरून मारलेली होती व ती अचुक पोटांतच लागली. इतक्या अंतरावर बिनचूक नेम लागल्याबद्दल दुःख करण्याची ही पहिलीच खेप असेल ! तसेंच २२ तारखेच्या रिट्रीटमध्यें परत येतांना वाटेंत एक गोरा सोल्जर मरून पडलेला आम्हांला दिसला. त्याच्या डोक्याला गोळी लागून कवटी फुटली होती. असे समजलें कीं पाठीमागून जेव्हा ' बद्दू ' लोकांनीं म्हणजे अरबांनीं मारा सुरू केला तेव्हां गोरी पलटण कॉलमच्या पोटांत होती, त्यापैकीं कांहीं शिपायांनीं तेथूनच उलट गोळ्या झाडण्यास सुरुवात केली. व अशाच एका सोल्जरनें उलट गोळी झाडण्यास व त्याच्या शेजारच्याच दोस्त-सोल्जरने बंदुकीच्या समोर येण्यास एकच गांठ पडली ! टेम्परी आय्. एम्. एस्.मधील एक डॉक्टर होता तो बिचारा वायरलेसचा पोल अंगावर पडूनच गतप्राण झाला ! एका मुक्कामाला वायरलेसचे खांब उभे करीत होते व हा त्याच्या आसपास कांहीं करीत होता ! यावरून लढाईमध्यें किती तऱ्हेनें मृत्यु येऊं शकतो, हें सहज समजेल.

दिवाणियाला मुक्काम असतांना ' हिला ' व दिवाणिया यांमधील रेलवेलाईन उध्वस्त करण्याचा अरबांनीं सपाटा चालविला होता. ( दिवाणियाला पोहोंचल्याच्या पहिल्या कीं दुसऱ्या दिवशींच शेवटची ॲब्युलन्स आगगाडी येथून बगदादला सुखरूप पोहोंचली होती ) व ती नीट करण्याकरतां दिवाणियाहून आमच्या तुकड्या पांच दहा मैलांपर्यंत वरचेवर जात. अशा एका तुकडीबरोबर मी एकदां गेलों होतों. पांच मैल गेल्यावर तुकडी खालीं उतरली व मला मोटर ट्रॉलींतच बसवून ठेवण्यांत आलें.

आम्हीं मोटार लाडिसांतून गेलों होतों, त्यांत ४०-५० माणसें बसतील इतकी जागा होती. रेलवे लाईन शाबूत असेल नसेल म्हणून जरी आगगाडीं-

तून अशी तुकडी गेली तरी पुढें एक ट्रॉली असे. म्हणजे रूळ दुरुस्त केल्यावर ते नीट बसले आहेत कीं नाहींत याकरतां ट्रॉली चालवून पहात व मग आगगाडी नेत.

त्या सकाळीं छोटीशी एक चकमक झाली. ती मला पाहण्यास सांपडली नाहीं म्हणून वाईट वाटलें पण नाइलाज होता. ती तुकडी परत येण्याची वाट पाहणें हेंच काम प्रत्यक्ष चकमकींत भाग घेण्यापेक्षां अधिक अवघड होतें! कमी भीतीचें पण जास्त कठिण होतें! कारण त्यावेळीं विचार करण्यास अवसर मिळतो!

ब्रिगेडला एकाएकीं मागे फिरण्याचा हुकूम आला, असें समजलें.

## अचाट कामगिरी

यापुढील आमच्या जनरलची कामगिरी अत्यंत जबाबदारीची व प्रचंड स्वरूपाची होती. परिस्थिति अशी होती कीं हिलापासून दिवाणियापर्यंत ५५ मैल बहुतेक रेलवे लाईन शत्रूनें उध्वस्त केली होती. स्लीपर्स उपटून दूर खड्डयांत वगैरे लपवून ठेवले होते. तारा तोडल्या होत्या. तारेचे खांब बेपत्ता पळवले होते, किंवा जमीनीवर निजविले होते. म्हणजे मागून व पुढून आमची ब्रिगेड तोडण्यांत आली होती. वायरलेसखेरीज कोणताहि दळणवळणाचा मार्ग उरला नव्हता. दिवाणिया हें बरेंच मोठें गांव होतें. आगगाडीचें हें महत्त्वाचें स्टेशन असून सप्लाय व ऑर्डिनन्स म्हणजे अन्नसामुग्री, कपडेलत्ते, हत्यारें वगैरेंचा मोठा सांठा या ठिकाणीं होता. येथें सैन्य बरेंच जमलें होतें. शिवाय हजार दोन हजार मजूर होते. आणि दिवाणिया गांवांतील सरकारी नोकर मंडळी व आश्रयास आलेले निरनिराळे लोक. इतकी सामुग्री, इतकें मनुष्यबळ आणि इतके पाहुणे, अशा लटांबरानिशीं शत्रूच्या मुलखांतून वाट काढीत सुखरूपपणें हिला मुक्कामीं नेऊन पोहचविण्याचें काम जनरलवर येऊन पडलें होतें. अडचणी अनंत, तशीच सामुग्री आमच्याजवळ विपुल होती. पाऊणशें-एक नुसते आगगाडीचे डबेच—मालाचे व माणसांचे मिळून होते. बरोबर एंजिनिअर होते, रेलवे कामदार होते, तारा नीट करणारे होते, रेलवे लॅडिसें होतीं. शक्य तितकें सामान—सप्लायचें वगैरे— बरोबर घेण्याचें ठरलें. रेलवेच्या मालाच्या डब्यांत कांहीं डबे चारी बाजूनीं उघडेच होते, त्यांत खच्चून माल भरतां यावा म्हणून कडेला आडवे व उभे रूळ बांधून चौकटी केल्या व त्यांत भरगच्च उत्

येण्याइतके, सामान भरले. डब्याच्या पायऱ्यादेखील रिकाम्या सोडल्या नाहींत. कारण सामान इतके विपुल होते की सबंध गाडी सामानानेच भरली असती तर तिला अशा दोन खेपा पडल्या असत्या ! त्यामुळें जागा दिसेल तेथे सामान रचलें व कोंबलें होते.

तारीख ३१ जुलै रोजीं पहांटे आम्हीं कूच करण्याच्या तयारीला लागलों. तंबू देखील होते तसे उभेच टाकण्यांत आले,–आगगाडींत जागा नव्हती म्हणून म्हणा, किंवा आम्ही दिवाणिया सोडणार ही गुणगुण शत्रूला शेवटपर्यंत लागूं नये म्हणून कदाचित् असेल. आमच्या पलटणीनें पिछाडी–संरक्षणाचें काम घेतलें. पहांटे ५–५॥ ला कूच करण्याचा प्रोग्रॅम ठरला होता, तरी ॲड्व्हान्स गार्ड पुढें सरकून, ही अवाढव्य गाडी चालू करून ती पुढें गेल्यावर आमच्या पलटणीला चालायला लागण्यास ६–६॥ होऊन गेले. मध्यंतरीं आम्हीं उगाच मजा पहात उभे होतों. गाडी जरी ठांसून भरली होती, तरी मालाचा प्रचंड ढीग अजून तसाच खालीं पडला होता–त्याला आम्हांला मुकावे लागणार होतें ! त्यांत कित्येक साखरेची पोतींचीं पोतीं होतीं. शेंकडों पेटया डब्यांतील फळें व दूध होतें ! हजारों कपडे होते आणखी आम्हांला माहीत नाहींत अशा किती तरी जिन्नसा होत्या. हलक्या सिगारेटचीं पाकीटें, बिस्किटांचे पुडे व बिअरच्या बाटल्यांची भरलेलीं खोकींही तेथे पडली होतीं. हजारों रुपयांचा माल टाकून देणें आम्हांला प्राप्त होतें. पण आमचे शिपाई, ब्रिगेडिअर-जनरलइतके वेडे नव्हते ! हा माल शत्रूच्या स्वाधीन होऊं देण्याचें जनरलनें ठरविले होतें तरी ही अभद्र कल्पना आमच्या शिपायांना पसंत पडेना. या मालाच्या पेटयाशेजारींच आम्हीं उभे होतों. हळूंच एक गोरा सोल्जर पुढें झाला व बीअरचें एक खोके मोडले होतें त्यांतून डोकावणाऱ्या बीअरच्या भरलेल्या बाटलीनें त्याचें चित्त वेधलें. तो आणखी जवळ गेला. थोडावेळ थांबून तो त्या पेटीला जाऊन भिडला व त्या पेटीवर बसला. इतक्यांत त्याचा सांथीदार शीळ घालीत तेथें आला व ती बाटली हळूंच उपसून काढून तिच्याशीं खेळूं लागला. नंतर इकडे तिकडे पहात त्या दोघांनीं मिळून ती बाटली लांबविली ! त्यांचें पाहून भराभर गोरे कावळे जमले. प्रथम मांजर ज्याप्रमाणें उंदराला पकडून लांब आडोशाच्या जागीं जाऊन त्याचा चट्टामट्टा करतें तसें हे कावळे बाटल्या घेऊन पसार होत होते. पण पुढें ते धीट झाले, व तेथल्या तेथेंच बिअरचा समाचार घेऊं लागले.

त्याही पुढची मजल म्हणजे एकामागें एक बहुतेक खोकींचीं खोकीं उचलून त्यांनीं आगगाडीवर कशींबशीं चढविलीं ! या मोहीमेंत गोऱ्यांना यश आलेलें पाहून काळ्या लोकांनींही हलुहळूं कंबरा कसल्या व सिगारेटच्या डब्या व बिस्किटें यांनीं आपले खिसे भरून घेतले !

**जातांना मिळालेला खाऊ**

तोंच आगगाडीच्या डाव्या हाताकडे गोळ्या येऊं लागल्या. आमच्या तोफाहि उडूं लागल्या होत्या. पाऊण किंवा एक मैलावर एक खेडें होतें तेथील लोक उलटले होते. खेड्याला लागून एक लहानसें लांबट टेकाड होते, त्याच्या पायथ्याशीं, आजूबाजूला, उतरणीवर व मध्यावरच्या धारेवरहि अरब लोक बायकामुलांसह निःशंकपणें वावरतांना चक्क दिसत होते. त्या बेट्यांना आमच्या तोफांचीहि पर्वा दिसली नाहीं ! एकादा गोळा फुटला कीं ते भराभर पांगत. आमच्या पलटणीचे फ्लँक गार्ड म्हणजे बाजू संभाळणारे लोक होते ते निजून बंदुका झाडूं लागले, कारण ती जमीन सपाट असल्यामुळें तेथें आडोसा कसलाहि नव्हता. आगगाडीपासून शत्रूच्या बाजूला २०० यार्डावर हे लोक होते. त्यांत एक जखमी झाल्यामुळें त्या उघड्यावरूनहि तेथपर्यंत गेलों. शत्रूपासून तेथपर्यंतचें अंतर मोटेंसें आकर्षक नव्हतें ! मला वाटतें ७–८ लोक यावेळीं जखमी झाले. एका मनुष्याला अवघड जागीं एक गोळी लागली ती दोन्ही मांड्यांतून आरपार जाऊन, तिनें सहा ठिकाणीं भोके पाडलीं ! जखमी लोकांना आम्हीं आगगाडींत चढविलें. त्यांची व्यवस्था आगगाडींतच होती.

**आर्मर्ड कार**

एकदांचें तें आगगाडीचें धूड हाललें. व आमचा जीव थोडा खाली पडला. यानंतर थोडा वेळ गोळीबार वगैरे थांबला व आगगाडी पुढें निघून गेल्यावर आम्ही लाटांप्रमाणें कूच करूं लागलों. समाधानाची गोष्ट एक होती कीं आगगाडीच्या मागें एक आर्मर्ड कार ठेवली होती, यामुळें आम्हां रिअर्ड गार्डला बराच धीर वाटत होता. व पाठीमागचा एक मनुष्य जखमी झाला तेंव्हां त्याला त्याच मोटरमध्यें आसरा देण्यास सांपडलें. मला असें आठवतें कीं प्रथम ही आर्मर्डकार आगगाडीलाच मागें जोडली होती, पण पुढें ती तेथून तोडून बरीच मागें एका खास इंजनाला जोडून चालविली होती. तिचा आमच्या रिअर गार्डला सांगण्यासारखा पाठिंबा होता. ती कार देवदूताप्रमाणें आम्हांला

वाटली. रिअर गार्डकरितां शिपाई असणें आणि आर्मर्ड कार असणें यांत किती तरी भेद आहे. त्या आर्मर्ड कारवर एक मशीनगन्‌हि ठेवण्यांत आली होती असें मला आठवतें.

आमच्याजवळ दोन चार एंजिनें होतीं पण ती जगड्व्याळ गाडी ओढायला त्या सर्वांचें बळ लागत होतें. असा वाद निघाला कीं गोळी जर एंजिनच्या बॉइलरला अगर एकाद्या महत्त्वाच्या नाजुक भागाला लागली तर ? तर सगळाच ' गाडा ' खुंटायचा ? पण एंजिनसंबंधीं कोणालाच कांहीं माहिती नसल्यामुळें तो वाद तितकाच राहिला ! मात्र एंजिनला कांहीं ठिकाणीं गोळ्या लागल्या. दाराशीं मातीनें भरलेलीं पोतीं ड्रायव्हरच्या बचावाकरतां रचून ठेवलीं होतीं.

दिवाणिया सोडून आम्हीं चार सहाशें यार्ड गेलों असूं नसूं तोंच उजव्या हातानें नदीपलीकडून स्नाइपिंगला सुरुवात झाली. या ठिकाणीं नदी अगदीं जवळून—३०० पावलांच्या अंतरावरून—वहात होती. तिचे पात्र अगदीं अरुंद होतें. व त्याच्या पलीकडून बद्दू लोक गोळीबार करीत होते. सुदैवानें येथें नदीच्या दोन्ही कांठांनीं मोडक्या घरांच्या भिंती झाडें वगैरे आडोसे असल्या-मुळें विशेष कोणासच इजा झाली नाहीं. मी मागें वळून दुर्बिणींतून पाहिलें तों आम्हीं सोडलेल्या कँपांतील तंबूंत बद्दू लोक घुसतांना दिसले ! आम्ही जाण्याची वाट पहात ते टपूनच बसले होते !

या ठिकाणीं नदीकिनाऱ्याच्या भिंतीजवळ जाऊन, नदीपलीकडील शत्रूवर गोळी झाडणाऱ्या एका सेक्शनचा, कर्नलचा डोळा चुकवून मी फोटो घेतला. तितक्यांत त्यानें मला पाहिलें ! फोटोबरोबर मीही विनाकारण स्वतःला ' एक्स्पोज ' केल्यामुळें तो मला बोलला !

हा आमचा एकंदर कॉलम तीन मैल लांबीचा झाला होता. ब्रिगेडचें मुख्य ठाणें मध्यावरच्या एका डब्यांत होतें. एका डब्यांत आसऱ्याला आलेल्या लोकांपैकीं दोन ज्यू बाया होत्या व त्यांतील एक बाळंतपणाला अगदीं टेंकली होती ! आघाडीला ( मला वाटतें ) एक गुरखा पलटण होती. आमच्या पलटणीला—२२ तारखेच्या रिट्रीटमध्यें झालेल्या प्रकाराबद्दल शिक्षा म्हणूनच कीं काय रिअर गार्डचा जणों मक्ताच दिला होता ! वास्तविक हीं कामें पाळीपाळीनें वाटून देतात. पण आम्ही खरोखर या ब्रिगेडमधील पथक नव्हतों. आमच्या मूळ ब्रिगेडकडून आम्ही या ब्रिगेडला उसने दिले गेलों

होतों, म्हणून सवतीच्या मुलाप्रमाणें आम्हांला वागविण्यांत येतें, असें कर्नल म्हणे. गोरी पलटण आगगाडीच्या बाजूनें चालली होती. तेव्हां ऊन इतकें तीव्र असें कीं जी पलटण आगगाडीच्या बाजूने चालली असेल तिला आगगाडीच्या छायेंत होतां होईतों चालण्याचा हुकूम झाला होता ! ( आगगाडी हले तेव्हां मनुष्याच्या वेगाइतकीच जात होती ! ) प्रत्येकाजवळ आठ पाईंटची एक कॅन्व्हस्‌ची पिशवी पाण्याकरतां देण्यांत आली होती. पण सकाळीं ११ वाजण्याच्या आंतच वॉटर बॉटल मधील व या ८ पिंटच्या पिशवींतील पाणी सरून जाई ! आगगाडीला एक दोन पाण्याचे डबे जोडले होते. 'रिअर गार्ड ॲक्शन' करून आम्हीं रक्त आटवायचें व आगगाडीजवळ असलेल्या गोऱ्या लोकांनीं 'पाण्याच्या डब्यांतून' यथेच्छ पाणी प्यावयाचें, हें कर्नल्ला आवडलें नाहीं.

**पायघड्या !**

रेल्वे लाईन ठिकठिकाणीं तोडली असल्यामुळें एक अचाट काम करणें भाग होतें. मोडली असेल तेथें दुरुस्त करणें व मुळींच नसेल तेथें नवी लाईन घालणें, या गोष्टी जातां जातां करावयाच्या म्हणजे कसले जबर काम आहे याची कल्पनाच करावी. याकरतां कोण उपद्याप करावा लागला ! १०००-२००० बिगारी होते त्यांनीं व एंजिनिअर लोकांनीं पाठ थोपटण्यासारखी कामगिरी बजाविली ! त्यांनी काय केलें, कीं आगगाडीच्या मागील रूळ उपटून आणून पुढें जोडावयाचे. मग त्यावरून दोनचार ट्रॉलीज होत्या त्या चालवून मग आगगाडी ५००-४०० यार्ड-जितक्या लांबीची लाईन टाकली असेल तितकी काढून न्यावयाची. पुन्हा मागचे रूळ काढून पुढें घालावयाचे, असा क्रम चालू होता ! हा प्रयत्न राक्षसी स्वरूपाचा होता खास. स्लीपर्स वाहून नेतां नेतां बिचाऱ्या मजुरांची पेकाडें मोडून आली ! पण त्यांनीं मोठ्या सहनशीलपणें व मन लावून काम केले. अशा रीतीनें तें आगगाडीचें धूड हत्तीच्या पावलानें चाले ! पायघड्या घालण्यासारखेंच हें होतें ! त्यामुळें पहाटपासून सायंकाळपर्यंत रोज रखडावें, असें ८-९ दिवस केलें. इतक्या दिवसांत ५५ मैलांचा प्रवास म्हणजे रोजी सरासरी ६-७ मैल झाले. पण एका विशिष्ट दिवशीं पहांटे पांच साडेपांच वाजल्यापासून सायंकाळी ५-६ वाजेपर्यंत १२ तासांत सबंध प्रवास आमचा पुरे तीन मैल झाला ! सबंध दिवस उन्हांत तळपत राहणें म्हणजे विलक्षण त्रासाचें काम होतें ! धड नाहीं कसली छाया. या मजलींत तारेच्या

खांबांच्या सांवलीचा आश्रय घेण्याची क्लृप्ति सुचली. शत्रूनें आयत्याच तारा तोडल्या असल्यामुळें असा फायदा होत होता कीं ज्या तारा खाली लोंबत त्यावर, थोडा वेळ थांबावयाचें असल्यास मी आपले ब्लँकेट अडकवी व छाया बनवीत असे ! पण या उभ्या लोंबणाऱ्या ब्लँकेटाची सांवली भर दुपारीं, तारेच्या सावली-हून फारशी रुंद नसे !

या प्रवासांत साधारणतः आम्हीं पहांटे ४॥ लाच न्याहारी करीत असूं. पाठीवरील झोळींत वाटेंत तोंडांत टाकण्याकरतां कांहीं घेऊन निघावयाचें. त्यानंतर दुपारीं सवड सांपडेल त्याप्रमाणें ११ ते २ च्या दरम्यान केव्हां तरी जेवण तयार व्हावयाचें. तिसऱ्या प्रहरीं फक्त हवा व धूळ खाऊन रात्रीं मुक्कामाच्या ठिकाणीं पुन्हा पुख्खा झोडावयाचा. कित्येक शिपाई–विशेषतः फॉलोअर म्हणजे धोबी, पाणके वगैरे वॉटर बॉटल मधील पाणी संपलें म्हणजे वाटेंत जेथें पाणी लागेल तें आमचा डोळा चुकवून पीत असत. मग तें पाणी कालव्याचें असो, किंवा सखल जमीनींवर सांचलेलें घाणेरडें पाणी असो. चिखल खाण्यापासून कांहीं फायदा नाहीं हें माहीत असल्यामुळें अर्थात् हें डबक्यांतील पाणी फडक्यांतून गाळून पिण्यास ते विसरत नसत !

## चहाची अजब युक्ति !

जगांतील शोध किंवा युक्त्या पुष्कळदां आपोआपच सांपडतात. हिंदुस्थानाचा शोध करतां करतां अमेरिका चुकून सांपडली व पतंग खेळतां खेळतां वीज आपोआप हातांत आली. वाफेच्या एंजिनची व ग्रामोफोनची अशीच गोष्ट आहे. त्यांतच माझ्या चहाच्या युक्तीची भर घालणें रास्त होईल ! प्रथम मी थर्मास बाळगीत होतों, पण तो सध्यां डंपमध्यें अडकला होता. त्यामुळें तिसऱ्या प्रहरच्या चहाची फार गैरसोय होई. याकरतां मीं पुढील युक्ति योजिली होती: गोऱ्या सोल्जराजवळ दोन कपांचें एक एनॅमल्ड आयर्नचें कडी असलेलें भांडें असतें तसलें माझ्याजवळहि एक होतें. नेमका एक थ्री कॅसल सिगारेटचा डबा आंत मावेल इतकें तें मोठें होतें, त्यामुळें पाठीवरील पिशवींतील बरीच जागा वांचत असे. निघतांना त्याच डब्यांत एक साखरेची व एक चहाची पुडी मी ठेवीत असे. चहाची वेळ झाली कीं वॉटरबॉटलमधील पाणी सिगारेटच्या डब्यांत ओतावयाचें. आतां आधण आणण्याकरतां विस्तव पाहिजे. ती अडचणहि शत्रूंनीं दूर केली होती. रिअर गार्डला असा हुकूम होता कीं, चालतां चालतां वाटेंत जर कोठें धान्याची खळी, गवताच्या गंजी दिसल्या तर त्या जाळून

टाकावयाच्या. तेव्हां मध्येंच कोठें ५–१० मिनिटे थांबावें लागेल.असा रंग दिसल्यास मी झटकन् बाजूला जाऊन गवत पेटवून आधण ठेवीत असे.–बरें तितक्यांत चालण्याचा हुकूम झाला तर चटदिशीं आधण उचलावयाचे व झांकण घालून डब्यासह पिशवींतील भांड्यांत खुपसून ठेवावयाचें. पुढे वेळ सांपडला तर पुन्हां स्वतः गवत पेटवून किंवा आयत्याच पेटत असलेल्या आगींत आधण ठेवायचें. नंतर हातरुमालानें भांड्यांत गाळून चहा प्यावयाचा ! चहा थोडा धुरकटल्यामुळें त्याची गोडी कांहीं " निराळीच " होती ! पुढें लवकरच मला आढळून आले कीं ही पद्धति मोठीशी सोयीची किंवा सुखावह नाहीं. व आतां प्रत्यक्ष



चहाच्या आधणाची सोय !

सूर्यनारायण माझ्या मदतीस धांवून आला. माझ्या अवलोकनांत असें आलें कीं, वॉटर बॉटल सबंध न भरतां जर अर्धीच भरली व सकाळपासून तिसरा प्रहरपर्यंत उन्हाच्या बाजूकडे करून पाठीवर अडकविली तर त्यांतील पाणी चांगलेंच तापते–अगदीं चटका बसण्याजोगे. तेव्हां धान्याच्या खळीवर आधण आणण्याची मधली पायरी गाळून मला बोलतां बोलतां व चालतां चालतां पाठीवरच्या पाठीवर चहा करतां येऊं लागला ! शिवाय हा धुरकटलेला नसल्यामुळे ' स्पेशल टी 'च होई ! ' कपानें पिण्याइतका ' तो कढत असे.

एकदां ब्रिगेड हलली म्हणजे किती मैल कूच केलें हा मुद्दा कष्टाच्या दृष्टीनें गौण आहे. निघतांना आणि दुसऱ्या मुक्कामावर पोहोंचल्यानंतर जो इतर खटाटोप पडतो तोच मुख्य होऊन बसतो. केलेले खंदक बुजवून टाका, तंबू मिटवा, खेंचरें लादा, गाड्या भरा, एक ना दोन. पुन्हा पुढच्या मुक्कामाला तंबू उभारायचे, गाड्या उतरावयाच्या, पाण्याचा बंदोबस्त करावयाचा, मोर्चे खोदावयाचे. ( रिट्रीटच्या वेळीं कॅंप सोडतांना खणलेले मोर्चे बुजवले नाहींत तर आपण निघून गेल्यावर शत्रूला आयतेच खंदक मिळतात ! ) वाटेंत वेळोवेळीं पडलेलीं काडतुसें, वगैरे आम्हांला पुष्कळ सांपडत व आम्हीं तीं हे खंदक बुजवतेवेळीं त्यांत-पुरीत असूं.

## अद्भुत फोटोग्राफी !

प्रत्यक्ष फायरिंग मधील कांहीं स्नॅपशॉट्स मी घेतले. दुर्दैवानें यांतील बहुतेक सर्व बिघडले. कारण कित्येकदां माझ्या पाठीवरील ओझें हलके करण्याकरतां कॅमेरा घोड्यावरच्या जिनाला मी बांधीत असे. पण तो हादरून व आपटून त्याला एक मोठा पोंचा आला व कॅमेरा ' गळूं ' लागला. उष्णतेनें तापल्या-मुळें फिल्मसुद्धि खराब व्हाव्यात. या सर्व अडचणींना माझें फोटो काढण्याचें कौशल्यहि मदत करीत होतें ! ' प्रत्यक्ष फायरिंगमधील ' या शब्दावरून कित्ये-कांची अशी कल्पना व अपेक्षा असेल कीं या फोटोंत पुढीलप्रमाणें देखावे असतील: एक शीख व अरब यांचें द्वंद्व ! किंवा एकाद्या बद्दूच्या पोटांत गुरख्यानें आपली कुकरी अर्धवट खुपसली आहे असा स्नॅपशॉट्र ! पण असा एकहि भयानक देखावा माझ्याजवळ नाहीं, याबद्दल मी दिलगिर आहे !

## जरबुया गांवांत प्रवेश

मजल दर मजल करीत हिलाहून ८-१० मैलांवरील जरबुया नांवाच्या गांवा-जवळ आम्हीं आलों. या ठिकाणीं कोठून तरी अगदीं जवळून स्नाइपिंग होत होतें पण जवळपास तर कोणीं दिसत नव्हतें. अखेर खजुरीच्या झाडावर लपून बसून ऐटींत गोळ्या सोडीत असलेला एक अरब सांपडला !

आमच्या पलटणीकडे संरक्षणाकरितां व कॅंप करण्याकरतां जी जागा नेमून दिली होती त्या हद्दींत एका तटासारख्या भिंतीच्या आंत कांहीं घरें होतीं. अर्थात् ही जागा आधीं तपासून पाहणें अवश्य होतें. म्हणून कर्नलनें एक सेक्शन आंत पाठविण्यास सांगितलें. जवळच एक बंद दार होतें पण एकदम

दार उघडून आंत घुसणें धोक्याचें असतें. आंत कोणी दबा धरून बसलेलें असलें तर ? म्हणून भितीवरून डोकावून, आंत उतरून कोणींतरी दार उघडावयाचें व मग बाकीच्यांनीं आंत शिरावयाचें. माझ्या अगदीं मनांत आलें होतें कीं आपणच वर चढावे, पण कर्नल शेजारींच उभा असल्यामुळें मीं मूग गिळले ! त्या तटाच्या आंत एका वृद्ध फकीराखेरीज कोणीच सांपडले नाहीं. त्या फकीराला पुढें कैद करण्यांत आले. मी व आणखी एक शिपाई असे आंत हिडतां हिडतां एका मशीदीजवळ आलों व हा फकीर एकदम आमच्या नजरेस पडला ! तटाच्या आंतील खेडेगांव अगदीं शुष्क व निर्जन झालें होतें व त्यांत वावरण्यास भीति वाटत होती, त्यांतून एकदम् हा जिवंत मनुष्य दिसल्यामुळें आम्हीं चपापलोंच होतों. येथील सर्व लोक बायकामुलांसह आम्हीं येण्याची वार्ता लागताच पळून गेले होते. सगळी घरें ओसाड पडली होतीं. मोठा हिय्या करून पण मनांत भीतभीतच आम्हीं मोठ्या खबरदारीनें एकेक घरांत शिरून पहात होतों. आठवण म्हणून घेण्यासारख्या किती तरी वस्तु तेथें होत्या. पण त्याचें ओझें संभाळून न्यायचे कसें व कोणीं ? कारण आवश्यक सामानच लोकांना जड झाले होते. 'लुटालुट' करण्याविरुद्ध सक्त ताकीद असे. सुऱ्या, बंदुका, वगैरे अनेक हत्यारें, गालिचे, गुडगुडीचीं पितळेचीं नक्षीचीं भांडी, शामदानाचे नक्षीदार घोडे इ० इ०, पुष्कळ वस्तु दिसत.

शेवटीं ८ ऑगस्टला आमचें ल्टांबर हिला गांवांत येऊन पोहोंचलें ! ३५ मैल ॲडव्हान्स् व ९० मैल रिट्रीट मिळून १२५ मैलांच्या पायीं प्रवासाला आम्हीं २७ दिवस घेतले, त्यांतून दिवाणियास सहा दिवस व इतर ठिकाणीं अधेंमधें तीन दिवस मिळून नऊ दिवस वजा केले पाहिजेत.

# ६ मुसाईबवर चाल

हिल्यास आम्हीं आमच्या पक्क्या ब्रिगेडमध्यें सामील झालों.

लगेच दुसरे दिवशी दुपारीं या नव्या कॉलमबरोबर आम्हीं कूच केलें. या वेळीं मला १०३ पर्यंत ताप भरला होता पण हॉस्पिटलमध्यें पाठवितील या भीतीनें मीं कांहींच बोललों नाहीं. एका दृष्टीनें हॉस्पिटलमध्यें 'सासुरवास' फार व आपले सामान गहाळ होण्याची भीती. शिवाय हॉस्पिटलमध्यें गेले तर कदाचित् लढाई 'बुडावयाची!' सकाळीं ताप निघे व संध्याकाळीं १००-१०२ होई असें दोन चार दिवस झाले. हॉस्पिटलच्या भीतीच्या असुडामुळें व जिज्ञासेच्या आकर्षणामुळें मी तसाच कमाबसा चालत असे. (स्नाइपिंगमुळें फारसें घोड्यावर बसणें इष्ट नव्हतें.) तिसऱ्या दिवशीं दुपारीं वाटेत एका कालव्याशेजारीं फराळाकरतां मुक्काम केला होता. त्या दिवशीं माझा नाइलाज झाला. कारण १०४॥ डिग्री ताप भरल्यामुळें मला मग उठवेनाच. मला 'हॉस्पिटल'-मध्यें नेण्यांत आलें. हे हॉस्पिटल म्हणजे आमच्याच ब्रिगेडबरोबर हलणारें फील्ड् ॲम्ब्युलन्स्. मग चैनींत मी एका मोटार ॲम्ब्युलन्समध्यें निजून प्रवास केला! पण दुसरे दिवशीं सकाळच्या लढाईला मी अंतरलों! या दिवशीं आम्ही मुसाईब नांवाच्या युफ्रेटीस नदीच्या कांठीं असलेल्या गांवीं पोहोंचलों. गांव नदीच्या दोन्ही किनाऱ्यावर असून मध्यें चांगल्या ३०० यार्ड लांबीच्या पुलानें जोडलें आहे. पलीकडच्या किनाऱ्यावर बायका-मुलांसह अरब लोक उभे असून गोळीबार करीत होते. पूल हस्तगत करून पलीकडे पिकेट बसविल्याशिवाय आम्हांला गत्यंतर नव्हतें. याच पुलाच्या तोंडाशीं चकमक उडाली, असें कर्नलनें सांगितलें.

हिलाहून मुसाईब उत्तरेस २५–२६ मैलांवर आहे. पहिल्या संध्याकाळीं दोन मैल व पुढें तीन दिवस ८–८ मैल असे वाटेंत मुक्काम पडले. वाटेनें स्नाइपिंग चाललेंच होतें पण अगदीं बेताचें. हिल्याच्या उत्तरेस चार मैलांवर पुराणप्रसिद्ध बॅबिलॉन गांव आहे; तें टेंकडावर असून त्यावर पुष्कळ मोडक्या भिंती, पडकीं घरें वगैरे माऱ्याच्या जागा होत्या, तेथून शत्रूंनीं स्नाइपिंग केलें.

हॉस्पिटलमधील पाहुणचार दोनच दिवस घेऊन मी पलटणीला येऊन मिळालों.

## पटाईत चोर

बेमालूम चोरी करण्यांत कांहीं बद्दू पटाईत आहेत यांत शंका नाहीं. आमची ब्रिगेड म्हणजे लहानसहान गोष्ट नव्हती. हॉस्पिटल साधारणतः कॅंपच्या मध्यावर असावयाचें. शिवाय कॅंपापासून दूर अंतरावर पिकेटसुद्धि असावयाचीं. व खुद्द प्रत्येक युनिटमध्यें आपापले गार्ड असतच. इतक्या अडचणींतून मार्ग काढून नकळत जिन्नसा लांबविणें म्हणजे कमी धाडसाचें किंवा अक्कलेचें काम नाहीं. याच्याच आदल्या दिवशीं 'खान महाविल'ला तर सगळे पहारे फोडून आमच्या कॅंपांत शिरून एका ब्रिटिश ऑफिसरच्या ऑर्डर्लीची बंदुकच त्यांनीं पळविली! तसेंच पूर्वीं डॉरा कॅंपांत असतां रात्रीं पहारेकऱ्यांच्या डोळयांत धूळ टाकून देखतां देखतां त्यांनीं माझी घोडी व तिचे तट्टू पळविले! नंतर पहारेकऱ्यांनीं पुष्कळ गोळया झाडल्या पण त्या फक्त अंधेरालाच लागल्या! आणखी एकदां अशीच शिताफी त्यांनीं केली. ऑफिसरांचे सात आठ तंबू पलटणीच्या तंबू-पासून थोड्याशा अंतरावर होते व त्याकरतां एक निराळा गार्ड रात्रभर असे. पहाऱ्यावरील शिपाई तंबूच्या रांगेभोंवती प्रदक्षिणा घालीत हिंडे. पण याही बंदोबस्तांतून कांहीं अरब चोरांनीं वाट काढली. एका तंबूत एक ऑफिसर निजला होता तो कांहीं आवाज ऐकून जागा झाला. पण तेवढ्यांत चोर फरारी झाले. 'मागून' पुष्कळ गोळया झाडल्या पण याही खेपेला हवेला भोंके पाडण्यापेक्षां त्यांच्या हातून जास्त कामगिरी झाली नाहीं. ते दिवस उकाड्याचे असल्यामुळें तंबूबाहेर कॉट टाकून मी निजत असे. गडबड व गोळीबार ऐकून मी जागा झालों होतों. सामानाबरोबर जीवहि नेत नसत हे चोरांचे उप-कारच होते!

## हिंडियाचें धरण

मुसाईब गांव बरेंच मोठें असून जिल्ह्याच्या ठिकाणासारखें आहे. बाजार पेठ चांगली दिसली. गांवाबाहेर खजुरीच्या दाट झाडींत आमचा कॅंप बसला होता. एक आठवडा येथें काढला. किरकोळ हालचालीशिवाय विशेष कांहीं घडलें नाहीं. नंतर येथून दक्षिणेस ५-४ मैलांवर हिंडिया बॅराजला १९-८ ला गेलों. हें ठिकाण आदले दिवशीं सैन्य पाठवून थोड्याशा गोळीबारानंतर कबजांत घेण्यांत आलें होतें.

येथें बांध घालून युफ्रेटीस नदी अडवून धरली आहे. बांधावर पूल असून खालीं उघडत्या-झांकत्या कमानी ठेवल्या आहेत. पाटबंधाऱ्याच्या दृष्टीनें हे स्थळ महत्त्वाचे आहे. किंबहुना येथें जर युफ्रेटिस नदी पूर्णपणें अडवून भलत्या बाजूंनीं वाहूं दिली तर या नदीवर वसलेल्या दक्षिणेकडील सर्व मुलखाचें पाणी थोडथोडके तोडतां येण्यासारखे आहे. या बंधाऱ्याची कल्पना परकीय असली तरी धरणाचें काम इंग्रज एंजिनिअरच्या देखरेखीखाली झालें असें ऐकिलें. यापूर्वी एक धरण बांधण्यांत आलें होते पण ते फुटलें म्हणे. तुर्कांनीं हें धरण मागें कार्बीज केलें तेव्हांचा जयस्तंभ त्यावेळीं तेथे उभा होता! मुसाईब, हिंडिआ व हिला ही तिन्ही गांवें एकाखाली एक अशी युफ्रेटीस नदीच्या कांठींच आहेत. पण मुसाईबला जातांना आम्हीं आडवाटेनें गेलों होतों. हिलाहून हिंडिआ १९-२१ मैल आहे.

## आसपासच्या खेड्यांतून शत्रूची हकालपट्टी

त्याच दिवशीं संध्याकाळीं नदीपलीकडे (पश्चिमेस) तीन एक मैलपर्यंत आम्ही आसपासचीं खेडीं मोकळी करण्याकरतां जाऊन आलों. अशा वेळीं रिसाल्याचा अत्यंत उपयोग होतो. कारण त्यांना खूप पुढेपर्यंत जाऊन अगोदर टेहेळणी करतां येते व संकट असल्यास चारी पायांवर दौडत परत माघारी फिरणें अवघड नसतें. यावेळीं एकहि शत्रू दिसला नाहीं व एकहि गोळी उपयोगांत आणावी लागली नाहीं. तिकडे जातांना पुलावर एकाएकीं माझा घोडा बिचकला. पुलावर एक गोरें प्रेत उघडेंवाघडे पडले होतें व मनस्वी दुर्गंधि येत होती! नदींतून वहात आलेले हे प्रेत कोणी वर काढून ठेवलेले दिसलें.

## एक अनपेक्षित प्रसंग !

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आम्हांला असेच आणखी एका ठिकाणीं जावयाचें होतें. काल संध्याकाळसारखेंच हें 'वनभोजन' असेल या कल्पनेनें आम्ही आनंदांत निघालों पण त्या दिवशीं दुपारच्या जेवणाला सर्वांनाच परत येतां आलें नाहीं! ती सकाळ कित्येकांच्या आयुष्याची संध्याकाळ होती. त्या सकाळानंतर सूर्याचे किरण त्यांच्या जिवंत शरीरावर पुन्हा केव्हांहि पडले नाहींत. दीड-दोन वर्षांपूर्वी त्यांनीं हिंदुस्तान सोडले, तेच त्यांचें व मायभूमीचें, आयाबहिणींचें शेवटचें दर्शन होणार होतें. पण ही गोष्ट त्यांना निघतांना माहीत नव्हती. त्यांना स्वप्नहि पडलें असेल व जागें झाल्यानंतर तें स्वप्नच होतें म्हणून ते आनं-

दले असतील. मरण ही शरीर-प्रकृति आहे हें त्यांपैकीं सर्वांना माहीत होतें पण तो दिवस आज उगवणार अशी त्यांची अटकळ नव्हती. कालच्या प्रमाणेंच आजहि सुखशय्येवर निजण्याचा त्यांचा बेत होता, पण तो फसला. कदाचित् काल निजलेल्या कांहीं लोकांचीं शरीरेंच मात्र कॅंपांत पडली असून आत्मे हिंदुस्तानांत आपल्या तहशीलांत गेले असतील. आज रात्रींहि त्यांचीं शरीरें समरभूमीवर पडली व त्यांचे आत्मे आपल्या आईबापांभोंवतीं घोटाळूं लागले, पण मग ते तेथेंच रमले. हिंडिआ बराजला परत आले नाहींत. लिहितां लिहितां तो प्रसंग आठवला म्हणजे एकीकडून अंगावर शहारे येतात तर एकीकडून जीव आणि मरण यांचीं दिक्कत वाटेनाशी होते.

आमच्या पलटणीच्या दोन कंपन्या, थोडा रसाला, फील्ड ॲब्युलंसची एक तुकडी वगैरे साहित्य घेऊन जनरलच्या नेतृत्वाखालीं आम्हीं निघालों. फील्ड ॲब्युलंसचा कर्नलहि हौशी व ' खेळाडु ' असल्यामुळें व आमच्याबरोबर स्वतः जनरल आल्यामुळें, या सैन्याबरोबर आला होता. पूल ओलांडून आम्ही नैऋत्य दिशेला २–३ मैलांपर्यंत गेलों. या वेळीं परिस्थिति अशी होती : आमच्या डाव्या हाताला दीडदोन मैलांवर उत्तरदक्षिण नदी. व डाव्याच हाताकडे लागून एक उत्तरदक्षिण कोरड्या कालव्याचा २–३ शे यार्ड लांबीचा बांध. बाकी आजूबाजूला उघडें मैदान. आमच्या समोर अर्ध्या एक मैलावर एक लांबट उंचवटा व त्याच्यापुढें थोडीशीं कमरेइतकीं किंवा गळ्याइतकीं उंच झाडें.

रिसाला आमच्यापुढें मैलावर टेहेळणीकरितां गेला. त्याबरोबर जनरल व हॉस्पिटलचा कर्नलहि गेले होते.

बरोबर बारा वाजतां धडाक्याचा गोळीबार एकदम ऐकूं आला व लवकरच हॉस्पिटलचे कर्नलसाहेब चौफेर घोडा फेंकीत माझ्या जवळून मागे निघून गेले. रिसालाही दौडत माघारी फिरला. शत्रू एकदम उद्भवला व आम्हांला अनपेक्षितपणें त्यानें गांठलें. लगेच आम्ही मोर्चे धरून लढूं लागलों.

रिसाल्यांतील स्वाराला घोड्याचें अक्षरशः ' पाठबळ ' असल्यामुळें जरी एक प्रकारें आधार असतो तरी तो मुख्य सैन्यापासून एकटाच लांबपर्यंत जात असल्यामुळें यदाकदाचित् तो अगर त्याचा घोडा जखमी झाला तर पायदळ–शिपायाच्या मानानें त्याची हताश स्थिति होते. कारण पायदळ शिपाई आपले लोक सोडून केव्हांही दूर जात नाहीं. व तो जखमी वगैरे झाला तरी आपल्या

लोकांतच असतो. किंबहुना मरण आले तरी आपल्याच लोकांत असतांना आल्यामुळें तितका धीर वाटतो. रिसाल्यांतील घोडा जखमी झाल्यास स्वार शक्य असल्यास दुसऱ्या स्वाराच्या पाठीशीं बसून परत येतो.

आम्ही मोर्चे धरून गोळीबाराला उलट उत्तर देऊं लागलों, पण त्या ठिकाणीं आडोसा मुळींच नसल्यामुळें आम्ही फारच ' एक्स्पोज ' होत होतों.




अर्थात् आमच्याकडे जखमा फार होऊं लागल्या. म्हणून हळहळूं सरकत डाव्या हाताला जो उभंट बांध होता त्याच्या पलीकडे आम्हीं मोर्चा पकडला. पण तितक्यांत समोरून पण डाव्या हाताच्या बाजूनेंच एकाएकीं गोळ्या येऊं लागल्यामुळें आगींतून फुपाट्यांत पडल्यासारखे आम्हांस झालें ! आतां एक कंपनी पुढें काढण्यांत आली व शत्रूशीं समांतर असलेल्या एका कालव्यांतून तिनें मारा सुरू केला. इकडे, आम्ही अगदीं असहाय झालों होतों. कारण त्या बांधाच्या दोन्ही पाखांवर थडाथड गोळ्या येऊन आपटूं लागल्या. ( शत्रूची ओळ व हा बांध काटकोनांत होते. ) माझ्यापासून १०–१५ फुटाच्या आंत किती तरी गोळ्या पडल्या. गोळ्यांचा इतका वर्षाव यापूर्वी मीं पाहिला नव्हता ! १२॥ ते १ च्या दरम्यान तर निवळ सडा पडत होता. हा बांध पूर्वीच्या एका कालव्याचा होता पण तो कालवा आतां जवळ जवळ मातीनें भरून गेल्यामुळें त्याचा ओहोळ आश्रय घेण्याइतका खोल नव्हता. किंबहुना तेथें एकंदर उंचवट्यावरच जाऊन

बसल्यासारखें होई ! त्यांतल्या त्यांत एक सोईस्कर जागा पाहून, मी आपले ड्रेसिंगचें ' दुकान ' उघडलें. एका हवालदाराच्या गळ्यांतच गोळी लागली होती व त्याला पट्टी बांधतां बांधतांच तो मेला ! याच वेळीं मी प्रथम प्रत्यक्ष गोळी लागतांना एक इसम पाहिला. हा गोरा सोल्जर माझ्या पुढेंच ८--१० हाताच्या अंतरावर मशीन गन् चालविण्यास मदत करीत होता. पट्टा किंवा दुसरें कांहीं तरी आणण्यासाठीं तो माघारा जात असतां माझ्यापासून ६ पावलांच्या अंतरावर आल्यावर त्यानें कसेंसेंच केलें. त्याच्या गळ्याला गोळी लागली असें मला दिसलें. धाडकन उभाचा उभाच तो खालीं पडला ! मी मदतीला धांवलों पण त्याच्या प्राणांना गांठणें मला शक्य नव्हतें.

याच प्रसंगीं एका शिपायाच्या गुडघ्यावर बोथट गोळी लागून मांडीचें हाड पार मोडलें, त्याला बंदुकीचा स्प्लिंट लावून परत पाठविलें. त्या लुल्या पायाला हात लावणें, त्या असहाय्य तंगडीला एकाद्या तान्ह्या मुलाच्या मानेप्रमाणें सावरून धरतांना, कसेंसेंच वाटत होतें ! ऑपरेशनमध्यें रक्तस्राव होतो, पण जखम स्वच्छ असते व पहाणाराच्या जिवाला तशी कांहीं भीति नसते पण अशा गोळीची जखम हिडिस दिसते. व भोवतालची परिस्थितिहि भीतिप्रद असल्यामुळें आपल्या मनाची विलक्षण स्थिति होते.---अशीच जखम पुढील घटकेस आपल्याला होणें असंभवनीय नाहीं---हाच तो विचार---पण तो विचार ' सब् कॉन्शस् ' स्थितींत असतो.

लढाई होईल अशी अटकळ नसल्यामुळें व आम्हांस होतां होईल तितकें सुटक निघावयाचें असल्यामुळें आम्हीं बरोबर तोफा आणल्या नव्हत्या. हेलिओग्राफनें हिंडिआंतील कँपांत तिकडूनच परस्पर शत्रूवर तोफा झाडण्याचा निरोप पाठविण्याचा आम्हीं पुष्कळ प्रयत्न केला, पण सूर्यनारायण ढगाच्या आड लपल्यामुळें कवडसा बरोबर पडेना व तोफा अजून सुटेनात. अखेर तिकडून तोफांचा आवाज ऐकूं येऊं लागल्यावर आमच्या जिवांत जीव आला.

बंडवाले लोक लपण्याचा मुळींच प्रयत्न करीत नव्हते. मधूनमधून मुद्दाम एकाद्या उंचवट्यावर येऊन आपलीं रंगीबेरंगी निशाणें रोंवीत, किंवा तेथें उभे राहून, तीं हातांनीं वरखाली नाचवीत. त्यावर चंद्रकोर वगैरे नक्षी असे. निरनिराळ्या शेखांचीं निरनिराळ्या रंगाचीं निशाणें असावीं.

१॥ वाजण्याच्या सुमारास गोळीबार जवळजवळ थांबला. आम्हीं परतीराकील तोफांच्या रक्षणाखालीं लाटांप्रमाणें परत येऊं लागलों.

या खेपेस अर्ध्या-पाऊण तासांत आमच्या पलटणीचेच ८-१० लोक कामास आले व २५-२६ जखमी झाले असें आठवतें! यांत एक इंडियन ऑफिसरहि जखमी झाला. एका लढवय्या ब्रिटिश ऑफिसरनें सांगितलें कीं त्याच्या कंपनीने ॲड्व्हान्समध्यें वाटेंत पडलेल्या २–३ अरबांची व बेयॉनेटच्या टोकांचीं–खोल–न बुजण्याइतकी ओळख करून दिली!

## ॲंब्युलंसची कामगिरी

फील्ड ॲंब्युलंसच्या कर्नलच्या अक्कलेची व कर्तबगारीची या प्रसंगीं चांगलीच परीक्षा झाली. कारण ऑफिसरांच्या घोड्याखेरीज व मला वाटतें फर्स्ट लाइन ॲम्युनिशन खेंचराखेरीज कोणतेंच जनावर किंवा वाहन या स्वारीवर आणण्यांत आलें नव्हते. म्हणजे खटारा नव्हता, मोटर ॲब्युलन्स नव्हती, वगैरे. आतां हे सगळे कामीं आलेले व जखमी लोक परत तीन मैल न्यावयाचे कसे ?, कॅंपांतून येथपावेतों गाड्या मागविणें इष्ट नव्हतें. डोलीवालेही बेताचेच आणले होते. तेव्हां पलटणीचे डोलीवाले व आणखी कांहीं शिपाई उसने घेऊन टप्याटप्यानें सर्व जखमी वगैरेंना कॅंपाकडे वाहून नेण्यांत आलें. शेवटीं कॅंपांतून कांहीं गाड्या बोलावून शेवटचा मैल त्यांना गाडींतून पोहोंचविण्यांत आलें.

लाटाप्रमाणें परतत असतांनाचा एक प्रसंग मला विशेषेंकरून आठवतो. मधें मधें एकादा इसम जखमी होई. शेवटीं एक वेळ अशी आली कीं सगळयांत मागची रांगहि आम्हांला मागें टाकून पुढे ( म्हणजे परत ) निघून जाण्याच्या बेतांत आली. कोण कोणाकरतां थांबणार ? सगळे हुकुमाचे बंदे. पण अद्याप दोन इसमांना उचलावयाचे राहिले होते. म्हणून मी तिकडे गेलों. कारण उचलायला पुरेसे लोक नव्हते! हे इसम माझ्या पलटणीपैकीं नव्हते. एक मृत गोरा सोल्जर होता व एक जखमी हिंदी शिपाई होता. ती सर्वांत मागची रांग निघून गेली म्हणजे आमचे रक्षण करण्यास उसन्या ऐटीखेरीज कांहीं नव्हतें! शेवटीं एका स्ट्रेचरला मीं हात दिला. थोड्याच वेळांत कोठून तरी एक पंजाबी ड्रेसर किंवा सब-असिस्टंट सर्जन उद्भवला व त्यानें माझा भार कमी केला.

## जनरलमधील वैगुण्य!

परतीच्या अर्ध्या वाटेंत आल्यावर आमच्या जनरलनें कर्नलला विचारलें, " आपणच लढाई जिंकली असें नाहीं तुम्हांला वाटत ? " कॅंपांत किंवा समरांगणांत हा धाडसी जनरल सगळीकडे हिंडे, व आमच्यांत मिसळून वागे. त्यामुळें

तो सर्वांनाच प्रिय झाला होता. शिपायांची बरदास्त ठीक आहे कीं नाहीं इकडे ज्याचें लक्ष असतें तो ऑफिसर लोकप्रिय होतो. पूर्वी दक्षिण कुर्दीस्तानच्या स्वारीवर जातांना मी एका मराठा पलटणींत होतों. एकदां कांहीं लोकांना ताबडतोब एका कामगिरीवर पाठविण्याचा हुकूम आला. ॲड्जुटंटनें कांहीं असामी तयार केले. ते पहातांच कर्नलनें विचारलें, ' त्यांची न्याहारी झाली आहे काय ? ' येथें बसून कदाचित् या प्रश्नाचें आपल्याला कांहींच वाटणार नाहीं. पण त्या वेळी मला त्याचें फार कौतुक वाटले व अंतःकरण भडभडून आलें ! हा कर्नल पलटणीला मुलासारखें वागवी. तसाच आमचा जनरल मायाळु होता. दिसायला उंच, हडकुळा, घारे डोळे, लांब नाक व अगदीं सहजगत्या, अलगद अशी चालण्याची ढब. ऐट अशी नाहींच. पण त्यांत एक वैगुण्य होतें. मोठेंच वैगुण्य होतें. हातभर लांब वैगुण्य होते. त्याचा कारभार ' एका हातीं ' होता. त्याला डाव्या खांद्यापासून खालचा हातच नव्हता ! तो फ्रान्समध्यें जर्मन तोफेच्या गोळयामुळें तुटला होता. एका हातानेंच तो घोड्यावर बसे. व सलाम परत करतांना लगाम खुशाल घोड्याच्या मानेवर ठेऊन टोपीला हात लावी. पुढें एकदां ' अबू सुखेरला ' आमच्या कॅपांत तो जेवायला आला होता. त्याचें अन्न बारीक तुकडे करून ठेवावें लागे. कारण त्याला सुरीकांट्यांनीं तोडणें शक्य नसे. बोलतां बोलतां त्यानें आपल्या हाताची कहाणी सांगितली ती अशीः—" ती माझी शेवटची स्वारी होती. आम्हीं घोड्यावरून परत चाललों होतों. इतक्यांत कांहीं तरी अपूर्व झाले ! मी मागे वळून पाहतों तों माझा डावा हात गिरक्या घेत कोलमंडत खाली पडतांना क्षणार्धच मला दिसला ! पुढचें मला आठवत नाहीं. शुद्धीवर येऊन पाहिले तव्हां मी हॉस्पिटलमध्यें होतों. माझ्या तुटलेल्या डाव्या मनगटावरील घड्याळ व बोटांतील अंगठी माझ्या उजव्या हातावर दिसलीं !—हा उद्योग माझ्या ऑर्डर्लीचा होता ! " त्याची बोलण्याची पद्धत अशी बेफिकीर दिसली कीं त्याला हात तुटल्याचें कांहींच वाटत नाहीं ! तो खरा मर्द-गडी होता. लढाईतसुद्धां तो पुढें पुढें फार जाई व उंचवट्यावर चढे. एकदां कर्नलनें याबद्दल त्याला धोक्याची सूचनाहि दिली. कारण जनरलबरोबर इतरांनाहि असें उघड्यावर उभें रहावें लागे !

दुसरे दिवशी २१–८–ला हिडिआ बराज सोडला व दोन मुक्कामानंतर २३ तारखेस खान महवीलवरून ' हिला ' गांवीं येऊन पोहोंचलों. येणेप्रमाणें १५ दिवसांत ६८ मैल घडले.

---

# ७ हिला मुक्कामीं

## पिकेट व स्नाइपिंग

कित्येक दिवस हिला गांव सगळीकडून तोडलें गेलें होतें. नंतर उत्तरेकडील रेलवे लाईन, तार वगैरे दुरुस्त करून हजार हजार यार्डाच्या अंतरावर पिकेट्स उभारली होतीं. पण ही बाजू सोडून बाकी तीन बाजूकडे अजून शत्रूच वावरत होता. सबंध हिला गांवाभोंवतीं कांटेरी तारांचें कुंपण घालून अंतराअंतरांवर पिकेट्स ठेवली होतीं. शहराच्या अर्ध्या प्रदक्षिणेपर्यंत ( नदीच्या एका बाजूला ) आमच्या पलटणीची पिकेट्स होती. त्यांत निम्मी नदीच्या पूर्वेस व निम्मी पश्चिमेस. ' हिला ' गांवाच्यामधून नदी वहाते व तीवर एक पूल आहे. मोठ्या गांवांपैकीं हें एक असून तेथें लोकवस्ती सुमारें १८००० असावी असा माझा तर्क आहे. गांवांत व गांवाबाहेर खजुरीचीं झाडें अनंत आहेत. नदीकिनाऱ्यावर तर दाट झाडी दिसे. या झाडीमुळें कित्येक ठिकाणीं तारांच्या कुंपणापलीकडे २००-३०० यार्डापर्यंतचें दिसत नसे. काहीं ठिकाणीं तर इतकी खेटून झाडी होती कीं तारेपासूनची १००–१५० यार्डापर्यंतची झाडी तोडून काढून जागा खुली करावी लागली. हेंही मोठें अचाटच काम होय. या झाडींत अर्थात् पुष्कळ धडकीं व मोडकीं घरें होतीं. व अशा बहुविध व सुरक्षित मोर्चामधून गांवांत स्नाइपिंग करायला शत्रूला चांगलेच फावे. आमचा कॅंप गांवच्या कडेला तारेपासून ५००–६०० यार्डाच्या आंत होता. कॅंपांत नेहमीं गोळ्या येत. विशेषत. कांहीं दिवस रात्रीं ९ च्या सुमारास एका ठराविक वेळेस नदीच्या उत्तरेकडून व गांवाच्या दक्षिणेच्या बाजूनें गोळीबार येत असे. नंतर त्यालाच पडसाद नदीच्या पैलतीरावरून होई. मग बद्दूपैकीं कोणी बेणबाजा वाजवीत. व तालसुरावर गात व नाचत. चांदण्याच्या वेळीं हा नाच कित्येक शिपायांनीं पिकेट ड्युटीवर असतांना प्रत्यक्ष पाहिला. पुढें कांहीं मुक्कामीं आम्हांलाही ते तालसूर लांबून ऐकूं येत. झांजा वाजल्यासारखाहि आवाज येई. विशेषतः कूफाला असतांना या नाचरंगास फारच ऊत आला होता.

पश्चिमार्धावरील पिकेट्सच किंवा मोर्चे आमच्या पलटणीचे असल्याकारणानें मला तेथें कामानिमित्त रोज जावें लागे. एका पिकेटपासून दुसऱ्या केट-

पर्यंत अर्थात् उघड्यावरूनच जावें लागे. पिकेटमध्यें एक सेक्शन असे. दिवसा पिकेटच्या बाहेर व्यवहार करण्यास किंवा हिंडण्याफिरण्यास हरकत नसे. पण स्नाइपिंग झालें तर मात्र सर्वांनीं आंत पळावयाचें. रात्रीं अर्थात् पिकेटच्या बाहेर येण्याची–कोणत्याहि कामाकरतां–मनाई होती. पिकेटमध्यें असतांनासुद्धां अगदीं क्वचित् जखम होत असे. हिलाहून दक्षिणेस जरबुयाकडे जाणाऱ्या रस्त्याच्या नाक्यावर एक पिकेट होतें. हें अर्थात् महत्त्वाचें पिकेट असल्यामुळें यांत एक गोरा मशिन गन् सेक्शनहि ठेवण्यांत आला होता. त्यापैकीं एकाच्या मनगटाला कीं बोटाला पिकेटच्या आंत असतां एका रात्रीं गोळी लागली. स्वारीवरील कँपाच्या बाहेरील काय किंवा कोणत्याहि पिकेटला असा हुकूम आहे कीं काय वाटेल तें झालें तरी त्यांनीं आपला मोर्चा सोडावयाचा नाहीं. मग एकजात सर्व मेले तरी हरकत नाहीं! कारण पिकेट्स जोंवर आहेत तोंवर कँपांत सुरक्षितता. रात्रींच्या वेळीं शत्रू पिकेट्स्च्या अगदीं जवळपर्यंत येऊन गोळ्या झाडीत असे. पिकेट्स उंच व त्यांतील गोळ्या मारण्याची व टेहळणी करण्याचीं भोंकें उंचावर असत. व पहारेकरी तर पिकेटच्या छपरावर डोकें काढून पहारा करीत असे. त्यामुळें शत्रूला आपल्या गोळ्याहि उंच माराव्या लागत. त्या पिकेट्स्च्या भितींवर आदळत. कांहीं पिकेट्सच्या भितींना अशीं किती तरी भोंके गोळ्यामुळें पडलेलीं दिसत. ज्या गोळ्या पिकेटला लागत नसत त्या अर्थात् कँपांत येऊन पडत. दिवसाढवळ्या किंवा रात्रीं अपरात्रीं या गोळ्यांची आम्हांला इतकी संवय झाली होती कीं त्या गोळ्या आल्या नाहींत तर आम्हांला चुकल्या चुकल्या सारखे वाटे. आमच्या नित्याच्या व्यवहारांत किंवा कार्यक्रमांत त्यामुळें मुळींच व्यत्यय येत नसे. विशेषतः रात्रीं आमच्या जेवण्याच्या वेळेला अगदीं ठरविल्यासारख्या गोळ्या येत व आमच्या डोक्यावरील झाडींतून आवाज करीत निघून जात, किंवा झाडाला लागून खालीं पडत. ह्या गोळ्या म्हणजे आमचे तोंडीलावणेंच झाले होतें! पाचोळ्यावरून चाललें असतां जसा आवाज होतो तसा आवाज गोळ्या खजुरीच्या फांद्यामधून गेल्या म्हणजे होई. आम्हीं तंबूंत राहून उघड्यावर जेवीत असूं. वरून गोळ्या जाताहेत व खाली आमचे पत्ते चालले आहेत! इतकी बेफिकीरी आली होती. या गोळ्यामुळें आमच्याकडील लोकांची विशेष हानि मुळींच झाली नाहीं. एकदां एका बंगाली आय्. एम्. एस्. ऑफिसरच्या तळहातांतून–तो निजला असतां–गोळी गेली.

बाकी क्वचित् एकाद्या खटारा हांकणाऱ्याला तर कधीं खेंचराच्या पायाला, येवढेंच नुकसान त्यांनीं केलें.

**बादशाही थडगें !**

एके दिवशीं रात्रीं मी तंबूच्या बाहेर निजलों असतां एकदम जागा झालों. 'सट्' असा आवाज माझ्या पोटावरून गेला. मला वाटलें फार तर सहा इंचांची माया टाकून माझ्या पोटावरून गोळी गेली असावी. दुसरे दिवशीं पहांटे उठून मी आपली मच्छरदाणी नीट निरखून पाहिली पण त्यांत कोठें गोळीचीं भोकें दिसलीं नाहींत ! रात्रींच्या शांततेमुळें गोळी गेली त्याहून जवळून गेल्यासारखा आवाज झाला असावा. हें ६ इंचांचें अंतर दुसरे दिवशीं रात्रीं भरून निघूं नये म्हणून मी एक खड्डा खणून त्यांत निजण्याचें ठरविलें. त्या दिवशीं रात्रीं खड्डयांत निजतांना मला १९ जुलैच्या काळरात्रीची आठवण झाली. खड्डयांत ओल असे, दमट घाण येई व किडेही फार. पण एकंदर दृष्टींनीं विचार करतां—दगडापेक्षां वीट मऊ—उघड्यावर निजण्यापेक्षां खड्डा सुरक्षित होता. अर्थात् खड्डयानें कोणत्याहि तऱ्हेची हमी घेतली नव्हती. यावेळीं मी एकाद्या मोंगल बादशहासारखा ऐटींत निजलों. मोंगल बादशहा ऐषआरामांत असला तरी त्याच्या जीवाला सदा धास्ती असावयाचीच. या दृष्टीनें मी मोंगल बादशहासारखा होतों. शिवाय मोंगल बादशहांचा परिपाठ असा होता कीं मरणोत्तर पुरण्याकरितां ते आपलें थडगें आपणच बांधून ठेवीत असत. तेव्हां मला अशी शंका आली कीं मी तर त्यांचा याही बाबतींत न जाणून कित्ता गिरविला नसेल ना ?

जरबुईयाच्या नाक्यावरील पिकेटकडे मी एके दिवशीं सकाळींच गेलों होतों. आदले रात्रीं बराच गोळीबार ऐकूं आला होता. त्या पिकेटपासून तारेच्या बाहेर ५० पाऊलांच्या अंतरावर एक अरब मरून पडलेला दिसला. रात्रीं त्याला गोळी लागली होती. त्याचा सांथीदार पहांटेच त्याचें प्रेत नेण्याकरतां येत होता पण पिकेटमधील लोक सावधान असल्यामुळें त्याचा बेत फसला व दिवसभर तें प्रेत तसेंच पडून राहिलें होतें. नंतर मला वाटतें दुसरे दिवशीं रात्रीं अंधारांत त्या सांथीदारानें तें प्रेत तेथून नाहींसें केलें.

एकदां मी एका नदीपलीकडच्या पिकेटवर तपासणीला गेलों होतों. लांब अंतरावर—एक-दोन मैलांवर पुष्कळ अरब लोक मेंढ्या चारतांना, शेतावर काम करतांना वगैरे दिसत होते. समोर मैलावर एक तिरपें टेंकाड होतें. त्याच्या अलीकडून एक घोंगडीवाला येतांना दिसला. तारेपलीकडील सर्व लोकांना शत्रू

समजण्यांत येत होतें. त्या अरबावर पिकेटमधील साहेबानें गोळया घालण्याचा यत्न केला. पहिली गोळी बरीच लांब पडली. ती पाहून तो अरब हातवारे करूं लागला. मी दोस्त आहें मला मारूं नका, असे सांगण्याचा त्याचा मतलब दिसला. आणखी दोनचार गोळया गेल्या पण तो आपला भराभर आमच्या दिशेनें येऊंच लागला. त्या गोळयांची त्याला मुळींच फिकीर दिसली नाही. नाहीतर त्या टेकाडाआड त्याला सहज पळतां आले असते. तो बराच जवळ आला. त्याचे हातवारे सारखे चाललेच होत. व झपाझप पावले उचलण्याचा त्याचा क्रम अव्याहत होता. अखेर तो तारेच्या कुंपणाच्या दाराशी आला. मग त्याला कैद करण्यांत आले. आपण कोणत्या प्राणसंकटांतून वांचलों, याचा त्याला मुळींच आनंद झालेला दिसला नाही !

## माझ्या टोपीचा बेइमानीपणा !

खुद्द माझ्यावर नेम धरून शत्रूनी गोळया झाडण्याचा एकच प्रसंग असावा. नदीच्या तीरावर दक्षिणेच्या टोंकाला एक पिकेट होते. तिकडे जायची वाट म्हणजे आधीं पूल ओलांडून पलीकडे गांवांत जावयाचे व गांवांतून खालीं जात मोडक्या व पडीक घरांच्या अधूनमधून नदीकिनाऱ्यावर पिकेटपाशी उगवायचे. मी जेव्हां या नदीकिनाऱ्यावर उगवलों तेव्हां कांहीं लोक नदींत संथपणें अंघोळ करीत होते. या पिकेटच्यामागे लागूनच एक पडके घर होतें. व पिकेटवर चढण्यास नदीच्या बाजूला या घराला लागून उघड्यावर एक शिडी ठेवली होती. मी किनाऱ्यावरून चालूं लागलों इतक्यांत एकदम ५–७ गोळया माझ्याजवळ १० फुटाच्या आंतबाहेर येऊन थडकल्या: कांहीं फट्दिशी किनाऱ्यावर आदळून धूळ उडाली व कांहीं पाण्यांत ' सुळ ' करीत बुडाल्या ! मी दचकून पाहिलें. मनांत



माझ्या टोपीचा बेइमानीपणा !

भीत पण बाहेरून कांहींच झाले नाहीं असें दर्शवीत मी आणखी ऐटीनें मार्ग आक्रमणें चालू ठेविले. साहेबी टोपीचें व शत्रूचें त्यांतल्या त्यांत वांकडे असे! (इकडील वायव्य सरहद्दीवर असेच संबंध असल्यामुळें कित्येकदां गोरे ऑफिसर फेंटे बांधतात असें ऐकिले.) सर्वसाधारण गोळीबारांत आपण सांपडणें व आपल्यावरच शत्रूनें नेम धरणे यांत मनाच्या दृष्टीने अत्यंत फरक आहे. त्या गोळया आल्याबरोबर स्नानविधि करणाऱ्या लोकांत जी खळबळ उडाली ती विचारूं नका! होतें तसेच ते लोक पाण्याच्या बाहेर उसळले व किनाऱ्यावरील हातीं लागेल तें वस्त्र गुंडाळून त्या मोडक्या घरांत पळाले. याच पडक्या घराचा आश्रय घेण्याची प्रथम मला स्फूर्ति झाली पण गोळीबार आणखी चालू राहिल्यास मी उगाच तेथें अडकून पडेन या भीतीनें मी तसाच थेट शिडीवरून



माझ्या टोपीवर गोळीबार कोठून झाला

पिकेटमध्यें शिरलों. व ही भीति खरी ठरली. त्या शिडीवरून जरी मी ऐटीनें शीळ घालीत चढत असलों तरी त्या वेळची माझ्या काळजाची धडधड माझ्या मनाला माहीत! कारण उंचीवर माझी टोपी चांगलेंच लक्ष्य होत होती. पिकेटच्या घरट्यांत शिरल्यावर मला शाश्वति आली व पिकेटच्या फटींतून मशीन-

गन् चालवीत होते ती व फटींतून दिसणारी शत्रूची गम्मत पहात मी बसलों. एक घोंगड्या बुवा हातांत भांडें घेऊन किनाऱ्यावरील झुडुपांतून पाण्यावर चालला होता. त्याच्यापुढेंच मशीनगन्च्या गोळ्या पडल्या. तो एकदम खालीं बसला व दिसेनासा झाला. तो उठण्याची आम्हीं वाट पहात होतों ! कांहीं वेळानें तो पुन्हा उठला व पाण्याकडे जाऊं लागला. असा लपंडाव बराच वेळ चालला. अखेर तो बसून दृष्टिआड झाला तो पुन्हा दिसला नाहीं ! तितक्यांत आणखी एक अरब आला पण तो लवकरच माघारा फिरला. हें सर्व अर्ध्या मैलाच्या आंत ६००–७०० यार्डांवर चाललें होतें.

**पंजाबी सिंह !**

आमच्या पलटणींत मुसलमान, जाट आणि शीख अशा जातींची खिचडी होती. ( यास 'हेल्दी मिक्श्चर' असें म्हणतात. ) हिला गांवाभोंवतींच्या पिकेट्समध्यें सर्व जातीचे सेक्शन्स अर्थात् होते. एके दिवशीं मीं एका मुसलमान सेक्शनला गमतीनें म्हटलें, ह्या पिकेटच्या समोर तारेपलीकडे शंभर यार्ड जाऊन परत यायला काय घ्याल ? कानावर हात ठेवून त्यांनीं उत्तर केलें, नकोरे बाबा तुमचें तें बक्षीस ! लाख रुपये देऊं केले तरी नाहीं जाणार ! नंतर एका जाट जातीच्या पिकेटला मीं तोच प्रश्न केला. ते म्हणाले, सोबतीला आणखी एक 'रायफल्' दिली, तर पाहूं. शेवटीं शीख पिकेटकडे गेलों. शीख लोक म्हणजे पंजाबी सिंहच ते ! त्यांनीं म्हटलें, वाः ! त्याला कशाला बक्षीस अन् लाख रुपये ! नुसता हुकूम करा कीं निघालों ! सोबत नको नि कांहीं नको. नुसती परवानगी द्या. आम्ही तर परवानगीचीच वाट पहात आहों !



# ८ कूफावर मोहीम

हिल्यास आम्हीं एक महिना व १९ दिवस राहिलों. ११ आक्टोबरला आमची ब्रिगेड पुन्हा ऑपरेशन्सवर दक्षिणेकडे निघाली.

एक गोरी पलटण नुकतीच दक्षिणेकडे 'डेमॉन्स्ट्रेशन' करतां पाठविण्यांत आली होती. ही पलटण हिला सोडून ५-७ मैलांवर गेली व तेथे तिनें रात्रीकरतां मुक्काम केला. कोणी म्हणाले, ती जागा रात्रीस तळ देण्यासारखी नव्हती! कोणी म्हणाले कीं, पोलिटिकल ऑफिसरनें पाणी कोठे मिळेल याबद्दल दिलेली माहिती चुकीची ठरली, म्हणून दुसरीकडे कँप करावा लागला! आमच्या कर्नलचे म्हणणें पडलें कीं, पलटणीने नीट खंदक खणून ठेवावयास पाहिजे होते, व कँप केला तो आटोपशीर केला नाहीं! कसेंहि असो. संध्यासमयीं एकाएकीं शत्रूनीं या कँपावर हल्ला चढविला व मँचेस्टर पलटणीची धूळधाण उडविली! कित्येक लोक मरेपर्यंत लढले. एका गोऱ्या गोलंदाजाला या चकमकींत 'व्ही.सी.' मिळाला असें आठवतें. शत्रूच्या मध्यावर असतां देखील, गोळी लागून प्राण जाईपर्यंत तो आपलें काम करीत होता.

## परित्यक्त ग्राम

प्रथम हिलाच्या पश्चिमेकडे ३ मैल आम्ही तमाझिया खेड्यावर चाल करून गेलों. आमच्या आगमनाची वार्ता शत्रूला केव्हां आणि कशी लागे कोण जाणे! वाटेनें आघाडीला व बाजूवर टेहळणीकरतां रिसाला ठेवला होता. शत्रूनें उगाच थोडासा गोळीबार केला. आमच्या तोफा लांबवरील शत्रूवर गोळे फेंकीत होत्या. आम्ही गांवांत प्रवेश केला तेव्हां सगळीकडे शुकशुकाट होता! बायका पोरें व महत्त्वाचें सर्व सामान घेऊन अरब लोकांनीं गांव सोडून दिलें होतें! भांडींकुंडीं, मातीचे खुजेसुद्धां ते मागें ठेवीत नसत! चांगल्या सतरंज्या, गालिचे, पार सगळे घेऊन जात! त्यांचें वाहन म्हणजे गाढव. रस्त्यावर जातां जातां सांडलेलें धान्य दिसत होतें; फडकीं, चिंध्या, फाटक्या उशा पडल्या होत्या. एका मोठ्या वाड्या-सारख्या घराच्या मागल्या आवारांत आमच्याच लोकांचे चोरलेले कांहीं युनि-फॉर्म होते. ज्या मूल्यवान पण न पळवितां येण्यासारख्या वस्तु असत त्या ते

पुरून ठेवीत. कित्येक थाटलेली दुकानें मात्र अद्याप तशीच उघडीं होतीं: धान्याची, स्टेशनरीची, वगैरे. त्या दुकानांत रांगेने मांडून ठेवलेल्या–सिगॅरेट, खजूर, काजू वगैरे जिनसांचा मोह अनावर होता! कोंबडया सुद्धां मागें राहिल्या नव्हत्या! किंवा जखमी मनुष्यही उरला नाही.

या खेड्याच्या तोंडाशींच झाडाखाली एक अरब मरून पडलेला दिसला. पुढें एक मोठा कोरडा नाला होता. त्यांत अगदीं शेजारींशेजारीं दोन पोक्तशा बायकांचीं प्रेतं पडली होतीं. तीं बहुतक कोणीतरी जमीनीवरून ओढीत त्या खड्डयांत टाकली असावीं. तेथून जवळच एका झाडींत आणखी एक वृद्ध स्त्री मेलेली दिसली.

या खेड्यापासून पुढें दोन मैलांवर आणखी कांही खेड्यांतून शत्रूला हुलकावण्याकरतां व त्याची सामुग्री जाळण्याकरतां आम्हीं गेलों. येथें एका घरांत दुपारीं फराळ केला. या ठिकाणी संशय आल्यावरून आम्हीं एकदोन ठिकाणी जमीन खोदून पाहिली तों एकाखाली एक ब्लॅकेटांच्या घड्याच्या घड्या लागल्या. ५ फूट खोलपर्यंत सतरंज्या, गाद्या वगैरेंचे थरावर थर होते ते सर्व काढून निघण्यापूर्वी आम्ही त्याला आग लावून दिली. तसेच धान्याच्या गोणी होत्या त्याही उसकून अग्निसात् केल्या. या खेड्याला चिकटून एक लहानशी वाडी होती. ती तपासण्याचे काम मराठा पलटणीतील एका मद्रासी ब्रिटिश ऑफिसरकडे होतें. (ज्या कांही थोड्या हिंदी लोकांना सैन्यांत लढवय्या ब्रिटिश ऑफिसरच्या जागा देण्यांत आल्या होत्या, त्यापैकींच हा एक होता.) मद्रासी ऑफिसर, एक मराठा शिपाई व मी असे तिघे त्या वाडींत शिरलों. मी फार सावधगिरीनें इकडे तिकडे वळून पहात चाललों होतों. विशेषतः एकाद्या घरांत मी अतिशयच खबरदारीनें शिरत असे. न जाणों एकादा काळा धोंगडीवाला दबा धरून बसला असला तर! अशाच एका खोलींत मीं डोकावलें. त्या खोलीत काळाकुट्ट अंधार होता. व मीही उन्हांतून आलेलों. थोडा वेळ त्या अंधारांत निरखून पाहिलें. हळुहळूं एका मनुष्याची निजलेली काळी आकृती मला दिसल्याबरोबर मी चपापलों, व त्या मराठा शिपायाला हांक मारली. त्यानें बंदुकीवर संगीन चढवली व तो आंत शिरला. प्रथम त्यानें तें संगीनीचे टोंक त्या मनुष्याच्या तोंडावर रोखलें. तो मनुष्य मेलेला होता! अर्थात् संगीन बोथट कर-

ण्याची जरुरी नव्हती. हें वनभोजन आटोपल्यावर आम्ही परतलों व परत तमाझियाला येऊन कॅंप केला.

## कूफावर मोहीम. पहिली सलामी-हुमाइसानिया.

१२ आक्टोबरच्या सकाळीं तमासिया सोडून दक्षिणेकडे-जिकडे गोऱ्या पलटणीवर हल्ला झाला होता म्हणून सांगितले तिकडे निघालों. कूफा नांवाचें एक महंमदी लोकांचे पवित्र धर्मस्थान आहे. हिल्याहून तेथपर्यंत ३५ मैल एक लहानशी आगगाडी नेली आहे. यावेळीं अर्थात् रेलवे लाईन उखडलेली असून गाडया बंद होत्या. या रेलवे लाईनच्या बाजूनें गाडीरस्ता आहे. त्यावरून आम्ही जात होतों. आम्हीं ३-४ मैल आलों असूं. पुढें हुमाइसनिया नांवाचा कालव्याचा बंधारा होता. त्या मागें शत्रू असल्यामुळे आमच्या तोफा आधीपासून डागीत होतें. ॲड्व्हान्स गार्डचें काम आमच्या पलटणीकडे होतें. अर्थात् पाठीमागच्या बाजूनें तोफेचे गोळे सुटत होते व आमच्या डोक्यावरून 'गुइं-गुइं' करीत जात होते. मी यावेळीं घोडयावरून चाललों होतों व ऑर्डर्ली जवळूनच येत होता. इतक्यांत कांहीं तरी ' फट् ' असा मोठा स्फोट झाल्यासारखा आवाज डोक्यावर झाला. मला वाटलें आमच्या विमानांतून कोणीतरी बॉंब टाकला असावा. पण विमान वरून चालल्याचा ' भिग-भिग-भिग ' असा आवाज ऐकूं आला नव्हता. वर इकडे तिकडे पाहिलें पण विमान दिसेना. इतक्यांत उजव्या हाताकडे समोर २००-३०० यार्डावर एकदम खूप धूळ उडालेली दिसली. मी ऑर्डर्लीला म्हटलें, " हें काय ? " तो म्हणाला, " साब वो अपनाहि तोफका खराब गोला बिचमे फूट गया ! " जुने गोळे असेच एकाद वेळ मध्येंच स्फोट पावतात. स्फोटापाशी जाऊन पहातां कांहीं गोळया दिसल्या. पुढें गेल्यावर शत्रूकडून माझ्या बाजूनें पहिलीच गोळी गेली. लगोलग ४-६ गोळया आल्यावर घोड्यावरून उतरून पायीं चालावयाचें असा एक नियम मी मनाशीच केला होता. त्याला अनुसरून लवकरच मला घोडा ऑर्डर्लीच्या हवालीं करण्याची पाळी आली.

## लढाईचा प्रसाद !

छोटीशी चकमक थोड्याच वेळांत सुरूं झाली. भर बाराचा सुमार होता. निरनिराळे मोर्चे पकडून रिसाला, मशीन गन्स्, लुईस गन्स्, वगैरे आपलीं नाशाचें काम करूं लागलीं. मी पलटणीच्या हेड्-क्वार्टरबरोबर होतों. सभोंवारची परि-

स्थिति आकलन करून ड्रेसिंग स्टेशन कोठें करावें हें मी पहात होतों. फायरिंग लाइनपासून या वेळीं मी ३००–४०० यार्ड मागें असेन. किंवा २०० यार्डच असेन. या वेळीं भर १२ चा सुमार होता. गोळ्या नेहमींच्या क्रमाप्रमाणें बहुतेक सर्वांना चुकवीत मागें निघून जात होत्या. इतक्यांत 'प्–सट्' असें कांहीं तरी वाजलें. मला वाटलें अगदीं जवळ कोठें तरी गोळी पडली असावी, किंबहुना शेजारच्या माणसालाच लागली असावी. कांहीं तरी अपूर्व झालें एवढें वाटून मी जरा वर पाहिलें. समोरच १०–२० हातांवर कर्नल उभा होता. तो कांहींसें म्हणत माझ्याकडे आला. तोंच कांही तरी वाटून मी खालीं वांकून पाहिलें. डाव्या तंगडीवर गुडघ्याच्या खालींच मला पटीज् ओल्या होऊन त्यांतून रक्त वाहतांना दिसलें. व डाव्या हातानें मीं तो भाग दाबून धरला. हें सर्व निमिषार्धात झालें. कर्नल जवळ येऊन म्हणाला, "डॉक्, तुला गोळी लागली ! हाडबीड नाहींना दुखावलें ? जा–जा मागें हॉस्पिटलांत जा !"...

इतक्यांत पाठीमागें जवळच ड्रेसर होता तो आला व इतरहि कांहीं लोक जमा झाले. जखम विशेष नसल्यामुळें मदतीची फारशी जरूर नव्हती. जवळच एक खड्डयासारखें होतें तेथें मी पट्टी बांधण्याकरतां गेलों. माझा पाय त्यावेळीं जरी तसा दुखत नव्हता तरी दुखेल या भीतीनें मी तो अलगद धरला होता व लंगडण्याची तशी जरूर नव्हती तरी दुखेल किंवा जास्त होईल या मनाच्याच भीतीनें मी लंगडत गेलों ! जखम भारी नसली तरी त्या वेळीं तिचें स्वरूप लक्षांत येत नव्हतें. कारण वर 'पटीज्' गुंडाळलेल्या होत्या. शिवाय कित्येकदां एकदम तीव्र वेगानें गोळी लागली तर जखम भयंकर असूनही त्यावेळीं–त्या क्षणीं तसें दुखत नाहीं. गोळी मांसांतून तंगडीच्या हाडाला चाटून गेली होती. जर का दोन दोऱ्यांचा फरक पडला असता तर तंगडीचें हाड फुटूनच निघालें असतें ! किंवा जर इतर कांहीं लोकांप्रमाणें मी त्यावेळीं बसलेला असतों तर नेमकी काळजांतच गोळी शिरती आणि ह्या आठवणी लिहिण्यास मी उरलों नसतों ! कांहीं वेळां हाड किंवा सांधा बचावल्यासारखे बाहेरून वाटतात पण ते त्यांत सामील झालेले असतात. म्हणून मनांतच तशी थोडी भीति वाटत होती. पण शेवटीं तसें कांहीं झालें नाहीं. गोळी आंतच–मांसांतच किंवा हाडांत वगैरे रुतून बसली तर जखम कठिण होते. पण मी आपल्या तंगडींतून त्या शिसाच्या तुकड्याला २ इंच लांबीची आरपार वाट करून दिली होती, व

त्या शक्यतेला मी थाराच दिला नव्हता ! २२ ऑगष्टला एका ऑफीसरला कोपराशेजारीं गोळी लागली होती, ती जखम दिसण्यांत साधीच दिसत होती. त्यांत कोपराचा सांधा गुंतला गेला नसावा असें त्या वेळीं वाटलें पण पुढें तें खोटें ठरले. सध्यां त्या ऑफीसरचा हात कोपरापाशीं काटकोन होऊन तसाच कायमचा ताठला गेला आहे असें मला नुकतेंच समजलें !

जखमी येण्यास सुरुवात झाली होती व ज्या खड्डयांत मी गेलों होतों ती जागा ड्रेसिंग स्टेशन करण्यास मध्यावर सुरक्षित असल्यामुळें सोयीची होती. माझ्या ड्रेसरच्या ऑर्डर्लीच्या पायाला पण गोळी लागून तो तेथें आला. एकाच्या पोटांत गोळी घुसली होती. आगस्टमध्यें माझ्या ऑर्डलीला गोळी लागून तो कामीं आला होता ! कांही वेळानें जखमी येण्याचे थांबले. गोळी-बारही बंदच झाला. ॲड्व्हान्स्ड् गार्डचे लोक पुढें दिसेनासे झाले होते व मागचे लोक मागेंच थांबले होते. मी इकडे तिकडे पाहिलें पण सभोंवार कोणींच दिसत नव्हतें. ( केव्हांही कूच करीत असतां शत्रूनें प्रतिकार केला तर आघाडीचे लोक पुढें लढावयास जातात व पाठीमागची ब्रिगेड एकाद दुसरा मैल मागच्या मागेंच उभी राहते. जरूर पडल्यास आणखी सैन्य वगैरे लागेल त्याप्रमाणे पुढें पाठवितात. ) तीन जखमी शिपाई, माझे दोन ऑर्डर्ली व मी असे सहा जणच तेथे ' एकटे ' होतों ! मँचेस्टर पलटणीची कत्तल उडाली होती तें हेंच ठिकाण ! ४०० पैकीं फारच थोडे लोक त्या भयंकर हल्ल्याची हकीकत सांगण्यास उरले होते. शत्रूनें मध्येंच आमच्यावर तुटून पडणें असंभव-नीय नव्हतें. मागचे लोक आम्हांला केव्हां येऊन मिळणार हें कांहींच समजेना. निदान जखमी लोकांना मागे घेऊन जाण्याकरतां फील्ड् ॲब्युलन्सचे लोक येतील असें वाटले पण कोणींच येईना. माझा विचार पुढें पलटणीला जाऊन मिळण्याचा होता पण ते जखमी तशा असहाय स्थितींत टाकून जाणें प्रशस्त वाटेना. म्हणून मी ॲब्युलन्सच्या कमांडिंग ऑफिसरला एका फाटक्या कागदा-वर चिठ्ठी लिहिली कीं त्या तीन जखमी लोकांकरतां वाहन पाठवावे. माझ्या ऑर्डर्लीबरोबर ती चिठ्ठी पाठविली. तो चौफेर घोडा उडवीत निघाला व दिसे-नासा झाला. आतां सहापैकीं आम्हीं पांच जणच ओसाड रानांत उरलों ! शत्रू येता तर आमच्यापैकीं दोघांना ळळतलोंबत चालतां तरी आले असतें पण दोघे मात्र उभे राहण्यासहि असमर्थ होते ! घोडा जवळ असला म्हणजे एक प्रकारचा

आधार वाटतो पण आतां घोडाही नव्हता ! मधूनच ऑर्डर्ली परत येतांना दिसतो आहे कीं काय तें आम्ही वर डोके काढून पहात होतों. थोड्याच वेळानें मोटार ॲब्युलन्स आली. माझ्याबरोबरचे लोक मला एकट्याला पुढे जाऊं देईनात ! ' कर्नल आमची चांगलीच खरडपट्टी काढतील, ' ते म्हणाले ! ' शौर्यापेक्षां शहाणपणा बरा ' या तत्त्वाचाहि मीं अंगिकार केला !

मला मोटर ॲब्युलन्समधून परत आलेला पाहून ॲब्युलन्सचा कर्नल अमळ आश्चर्यानें म्हणाला, ' म्हणजे ?---तूं कशाला परतलास ? ' मीं म्हटलें ' मला लागलें आहे. ' ( तेव्हां तोच माझ्यापेक्षां घाबरला ! )



फायरिंग लाइनचे मागील फील्ड ॲब्युलंसचें पथक.

(मोटरचे उजव्या मागील बाजूस जमीनीवर बसलेला मी–गोळी लागल्यानंतर, १२-१०-२०)

स्थिरस्थावर झाल्यावर चालण्याचा हुकूम झाला. व मी मोटारमधूनच निघालों. दोन मैल पुढे जाऊन आम्हीं पुढच्या लोकांना मिळालों, व रात्रीकरतां कँप केला. वाटेनें गोऱ्या पलटणीवर हल्ला झालेले स्थान आम्हांस लागले. गोऱ्या पलटणीनें कँप केल्याच्या व चकमकीच्या खुणा तेथे दिसत होत्या. कागदाचे तुकडे, कोंबड्यांचीं पिसें, ' बुली बीफचे ' टिन, अंड्यांचीं टरफलें, खटाऱ्याच्या व तोफेच्या गाडीचीं कांही चाकेही पडलेलीं दिसली ! दोन मैल पुढे जाऊन आम्ही पुढच्या लोकांना मिळालों व तेथे रात्रीं कँप केला. जेवणापूर्वी मी आपल्या पलटणीत इतरांच्या समाचाराला गेलों, तेव्हां मी चांगलाच लंगडत होतों व पायहि बराच खरा दुखूं लागला होता. माझ्या मनांत आतां परत हॉस्पिटलमध्यें जावयाचें नव्हतें,–तथून एक प्रकारें

'फरारी' होण्याचा माझा बेत होता, पण पलटणींत मला कोणीं घेईना! माझा फरारी होण्याचा बेत ढांसळला व विमनस्क होऊन मी परत गेलों! त्या रात्रीं हॉस्पिटलच्या कर्नलनेंहि, विनाकारण पुढे पुढे जाऊन हकनाक जीव धोक्यांत घालण्यावरून माझी कानउघाडणी केली! माझ्या जागी दुसऱ्या एका गुजराथी डॉक्टरची आमच्या पलटणींत तात्पुरती नेमणूक झाली.

दुसऱ्या दिवशी पुढें चार मैल जाऊन ब्रिगेडनें मुक्काम केला. वाटेने हिल्यापासून येथपर्यंतचा सर्व रस्ता १०००-१००० यार्डांच्या अंतरावर एका कॅनॉलच्या कांठावर विटामाताची पिकेट्स् तयार करून रोंखीत आम्ही चाललों होतों. १३ तारखेस जखमी लोकांचा तांडा परत हिल्यास पाठवावयाचा होता. माझ्या मनांत परत जावयाचें नसल्यामुळे मी कर्नलला पुष्कळ सांगून पाहिले. कारण लढाई 'बुडण्याची' मला भीति फार! पण तो ऐकेना व परत जाणाऱ्या जखमी व आजाऱ्यांच्या यादींत माझेंहि नांव पडलें!

## आठ तासांत बारा मैल!

दुपारीं १२-१ वाजतां आम्ही निघालों. आजाऱ्यांकरतां कांही खटारे व एक चार-घोड्याची चार-चाकी गाडी इतकीं वाहनें होतीं. हा १२ मैलांचा प्रवास अगदी आठवण राहण्यासारखा झाला! जिकडून जाऊं तीच जवळ जवळ 'वाट' असल्यामुळें त्या चार-चाकी गाडीचें धूड उंच सखल जमीनीवरून थडाथड हापटत चाले. त्या गाडीचा पुढे इतका कंटाळा आला कीं पाय दुखत होता तरी पायीं चालणे बरें असे वाटे. कारण दुपारपासून रात्रीं ८॥-९ वाजे-पर्यंत आम्हीं जातच होतों! वाटेनें मधून मधून भीतीहि वाटे. कारण आमच्या-बरोबर गार्ड होता तरी अर्थात् थोडा होता. व त्याच प्रदेशाच्या आसपास नुकताच गोऱ्या पलटणीला कडू अनुभव आलेला होता व त्याच्याच आसपास आदलेच दिवशी आम्ही जखमी झालों होतों. थेट हिल्यापर्यंत वाटेनें पिकेटस् होतीं पण तीं हजार हजार यार्डांच्या म्हणजे पाऊण मैलाच्या अंतरावर. मध्येंच झाडी किंवा टेंकाड येई व रस्ता पिकेट्सची ओळ सोडून जरा बाहेर जाई. त्यामुळें कसेंसेंच वाटे! पुन्हा पिकेट जवळ आले कीं आनंद होई. वाटेनें आम्हांस एक कॉलम भेटला. यांत सगळ्या बोटी होत्या. सहा-सहा खेंचरांच्या गाडीवर मिळून एक बोट, अशा किती तरी बोटी होत्या. पूल बांधण्याकरतां या होड्या नेत होते.

शेवटचे २–४ मैल तर जीव त्रासून गेला ! सूर्य अस्तास गेला तरी ‘ हिला ’ दिसेना. व पिकेट्सहि दिसेनाशीं झाली ! अंधेरांत चकारीच्या खुणेनें गाड्या चालल्या होत्या. शेवटी हिला आलें असें वाटूं लागलें व मनाला धीर आला. तिनक्यांत दोन वाटा फुटत होत्या. त्यांतील भलतीच वाट धरली व गांवापासून पश्चिमेकडे शत्रूच्या मुलखांत लांब जाऊं लागलों ! वाट चुकल्यामुळें फार घोटाळा झाला व उशीर लागला. तोंच पुन्हां गांवाभोंवतींची तार दिसूं लागली व लांबच्या वाटेनें एकदाचे आम्ही एका पिकेटजवळील दारापाशीं येऊन थडकलों.



होड्यांचा तांडा

“ हॉल्ट् ! हु कम डर ” हा ओळखीचा शब्द ऐकून जीवांत जीव आला. “फ्रेंड” असे उत्तर दिल्यावर “आल–वेल” म्हणत दार उघडून पिकेटनें आमच्या गाड्या आंत घेतल्या. तारेच्या आंत शिरेपर्यंत धागधूग होत होती ! ८ तासांत १२ मैल या गतीचा तो प्रवास संपवून आम्ही हॉस्पिटलचे पाहुणे झालों.

## फील्ड हॉस्पिटलमध्यें

एक मोठा किल्ला होता त्यांतच हॉस्पिटल केलें होतें. याच्या खिडक्यांत वगैरे मातीचीं पोतीं ठेवून गोळीबारापासून आडोसा केलेला होता. हॉस्पिटल-

मध्यें व्यवस्था उत्तम होती. दुसऱ्या दिवशीं मी अंथरुणावरून उठून खिडकींतून मजा पहात करमणुक करीत होतों, पण उभे राहिल्यामुळें मला डाक्टरनें गोड शब्दांत सटकावले, व अंथरुणावरून न हलण्याची त्यानें मला ताकीद केली ! तेव्हांपासून मी त्याची वेळ चुकवून उभा राहूं लागलों ! कारण त्या कोंदट जागेत अंथरुणाला चिकटून रहाण्याचा वीट आला ! ॲंटि-टेटॅनिक सीरम दुसऱ्या दिवशीं सकाळीं टोंचण्यांत आलें. जमीनीवरील शेणमाती, लीद, वगैरेंत टेटॅनस नांवाचे जंतु कित्येकदां असतात व ती धूळ जर जखमेंत गेली तर टेटॅनस ( धनुर्वात ) नांवाचा रोग उद्भवतो. यांत सर्व शरीराचे स्नायू ताठून आंखडतात. तोंड उघडतां येत नाहीं. व त्यांत श्वसनक्रियेचे स्नायू दूषित झाल्यास कदाचित् रोगी मरतो. म्हणून प्रत्येक जखमी मनुष्याच्या अंगांत सावधगिरी म्हणून हें औषध खुपसतातच. दोनचार दिवसांनीं ए. डी. एम्. एस्. म्हणजे ब्रिगेडचा मुख्य डाक्टर आमची विचारपूस करण्यास आला. " उद्यां परवां तुला बगदादला जायचें," तो मला निश्चयानें म्हणाला. येवढ्या मोठ्या डॉक्टरसाहेबबहादुरांचा हुकूम तो ! त्यापुढें न म्हणण्याची छाती आहे ? पण मोठा धीर धरून मीं म्हटलें, " मी आतां चांगला बरा झालों. मी आपल्या पलटणीकडे जातों. " ( हॉस्पिटलमध्यें आजारी असतां वरिष्ठ ऑफिसरशीं अधिक सलगीनें बोलण्यास हरकत वाटत नाहीं. ) ' हुंः ! ' करून तो हंसला व ' पाहूं पाहूं ' करीत निघून गेला.

माझ्या खोलींत आणखी ४-५ खाटा होत्या. कित्येक जखमी ऑफिसर निरनिराळया ठिकाणाहून येथें येत व आपापले अनुभव व लढाईच्या गोष्टी सांगत. त्यामुळें बरीच करमणुक होत असे.

शेवटीं मी हट्टानें तसाच राहिलों, व ॲंब्युलन्स आगगाडी बगदादला निघून गेली. त्या दिवसापासून मी हिंडण्या-फिरण्याची परवानगी मागून घेतली व सकाळ संध्याकाळ फिरावयास जाऊं लागलों. अजून साधारण लंगडत होतों पण तसें मी दिसूं देत नसे !

## होडींतलि ताशीं मैल

मंगळवारीं मला जखम झाली व पुढच्या मंगळवारीं मीं तसेंच हॉस्पिटल सोडलें. त्या दिवशीं आमच्या पलटणीचे कांहीं लोक कूफाकडे पलटणीला मिळण्याकरतां जाणार होते त्यांच्याबरोबरच माझें जावयाचें ठरलें. या लोकांत कांहीं रजेवरून

परत आलेले लोक होते, कांही बगदादहून किंवा बसऱ्याहून बरे होऊन परत आलेले आजारी व जखमी होते. इतर पलटणीचेहि कांही शिपाई होते. आमचा हा प्रवास परवांच्या माझ्या चारचाकी गाडीतील चिरस्मरणीय प्रवासापेक्षांहि और होता. त्यावेळीं आमची गति ताशीं सुमारें १॥ मैल होती तर आतां ताशीं मैल पडत होता ! एक मात्र सुख होतें. या वाहनांत धक्के बसत नव्हते. बसत होते पण क्वचित् कॅनॉलच्या अरुंद भागांत बोट किनाऱ्यावर आदळे तेव्हां. आम्ही ३०–३५ जण एका मोठ्या होडीतून–'बेलम' मधून चाललों होतों. युफ्रेटीस नदीतून १० एक फूट रुंदीचा कालवा दक्षिणकडे नेला आहे. 'हिला' गांवाच्या दक्षिणेस अर्ध्या मैलापासून हा कालवा फोडला आहे. हें वाहन



बडखोरांचे अत्याचार

अर्थात् बिनखर्चाचें आहे, कारण वाहत्या दिशेकडेच आम्हांला जावयाचें होतें. सकाळी ८–८॥ पासून संध्याकाळपर्यंत आमची होडी चालली होती. उन्हाचा सारखा मारा होत होता. त्या बेलममधून जाण्याऐवजी आम्ही कांहीं मंडळी खालीं उतरून कांठाकांठानेंच चाललों होतों व कालव्याला बरेच वळसे असल्यामुळें शॉर्टकट् घेतां येत होते. होडी वल्ह्यानें वल्हविली जात नव्हती तर एक

बांबूचा वासा मधून मधून पाठीमागून कालव्याच्या किनाऱ्यावर टेंकावयाचा व तो रेटावयाचा, असा क्रम चालला होता. याच कॅनॉलच्या बाजूनें १००० यार्डावर पिकेट्स् बसविली होतीं. अखेर आम्ही रस्तमिया कॅनॉल पोस्टपाशीं येऊन थांबलों. येथे पोस्ट कमांडटचा पाहुणचार घेतला. रात्रीं मी आपल्या लोकांत उघड्यावर निजलो. सकाळीं उठून ९ मैल 'किफल्' नांवाच्या गांवाला नैऋत्येकडे चालत गेलों. वाटेंत आम्हांला कूफाला जाणाऱ्या आगगाडीचे रूळ उचकटलेले दिसले. किफल् शहर सोडून मागेच शत्रू पळाला होता. येथे हॉस्पिटलची एक चिमुकली शाखा ठेवली होती, तेथे उतरलो. व येथून २१ तारखेच्या दुपारीं फोर्ड मोटारीच्या मोठ्या तांड्याबरोबर संध्याकाळीं कूफा येथे पोहोचून पलटणीला जाऊन मिळालो. येथें ब्रिगेडचा येवढा मोठा तळ पडला होता कीं पलटण सोधायला मला किती तरी वेळ लागला.



किफल् गांव

## पुन्हां फ्रंटवर

कूफा हें बरेंच मोठें गांव असून पवित्र क्षेत्र आहे. येथून पश्चिमेकडे ५-४ मैलांवर नजफ नांवाचें त्याहून पवित्र स्थान आहे. नजफच्या मशीदीवर उंच

घुमट असून तो सोन्याच्या पत्र्याचा आहे. तो फार लांबून ६–७ मैलांवरून सूर्यप्रकाशांत लख्लख् चकाकतांना दिसतो. कूफ्याहून नजफपर्यंत एक घोड्याची ट्रॅम आहे. सध्यां ती अर्थात् चालू नव्हती. विशेष प्रतिकार न होतां किफल् व कूफा हस्तगत झालीं होतीं असें मला कळलें. येथून भिस्ती लोकांना पाण्याकरतां मैल-दीड मैल जावें लागे !

कूफा येथील मशीद आम्हांस पहावयास सांपडली. एका मोठ्या पटांगणा-भोंवतीं पुष्कळशा ओऱ्या काढल्या आहेत व समोर नमाज पढण्याची विस्तृत जागा आहे. विशेष सांगण्यासारखी नक्षी किंवा भव्यपणा तेथें मुळींच दिसला नाहीं. मधल्या पटांगणांत एक विहीर आहे, व तींत अरबांनीं हत्यारें पुरलीं आहेत असा संशय आल्यावरून तेथें खणून पहात होते असें आठवतें. नेहमी-प्रमाणें शत्रूनें गांव सोडलें होतें व या मशीदींत मात्र कांहीं फकीर अद्याप राहिले होते. प्रत्येक ओरी सामानांनीं भरलेली दिसली. सतरंज्या, कपडे, गालिचे, भांडीं, वगैरे वगैरे. कर्नलनें एक गमतीदार गोष्ट सांगितली. एका हपीसरला एक सोन्याची ( किंवा सोन्याच्या मुठीची ) तलवार सांपडली. त्यावर कोणींसें खवचटपणें चारचौघांत जनरलसमक्ष बोलून दाखविलें कीं अमक्या तमक्याला एक सोन्याची तलवार सांपडली आहे व तो ती जनरलला नजर करणार आहे ! शेवटीं इतके झाल्यावर त्या बिचाऱ्याला तसें करणें एकपरी भागच पडलें. २०० कीं किती लीरा ( मोहरेसारखें सोन्याचें पर्शिअन नाणें १५ रु० किमतीचें ) असलेली एक मनीब्याग त्या मशिदींतच कोणालाशी सांपडली म्हणे. नक्षीचीं गुडगुडीचीं भांडीं वगैरे पुष्कळ जिन्नसा पुष्कळांनीं आठवण म्हणून घेतल्या.

रोज बातमी पसरे कीं आज रात्रीं शत्रू एकजुटीनें कॅंपावर मोठा निकराचा हल्ला करणार ! पण तसें कांहींच झालें नाहीं !

जखम अद्याप भरून आली नव्हती. गोळी लागल्याच्या नवव्याच दिवशीं मी नऊ मैल चालत गेलों ! जिकडून गोळी आंत शिरली ती वाट १५-२० दिवसांत बंद झाली व जिकडून बाहेर पडली ती महिन्याभरांत भरून आली. पण व्रण कायमचे असल्यामुळें ते व आठवण मात्र ‘ बुजणें ’ शक्य नाहीं !

**अबू सुखेर**

१३ नोव्हेंबर रोजीं आम्हीं कूफा सोडलें व दक्षिणेकडील अबू सुखेर नांवाच्या गांवीं कॅंप केला. येथून दोन-अडीचशें पावलांवर नदी होती.

ब्रिगेडला कँप करावयाचा असला म्हणजे ब्रिगेडिअर, किंवा त्याचा स्टाफ ऑफिसर व फील्ड अँब्युलंसचा मुख्य डाक्टर हे प्रथम चांगलीशी जागा शोधतात. मुख्य म्हणजे ती सुरक्षित पाहिजे; पाण्याची सोय हवी व ती जागा निरोगी असावी. प्रत्येक युनिटला जागा नेमून दिली जाते. नंतर 'जनरल' डॉक्टरचें काम म्हणजे, पिण्याचें पाणी कोठून घ्यावयाचें, कपडे वगैरे कोठें धुवावयाचे, तें ठरविणें. नदीच्या वरच्या प्रवाहांतून फक्त पिण्याकरतां पाणी घ्यावयाचें. तेथें एक सन्त्री उभा करतात. त्याच्या खाली जनावरांना पाणी पाजण्याकरतां जागा राखून ठेवतात. व खालच्या बाजूला आंघोळ कपडे धुणें वगैरे.

या कँपांत येऊन पोहोंचल्याबरोबर मी पाण्याची सोय पाहण्याकरतां तसाच निघालों. अशा परस्थ ठिकाणीं येऊन पोहोंचल्याबरोबर नदी-कांठीं जाणें अत्यंत धोक्याचें आहे. मी नदी पाहून आलों खरा, पण त्यावेळीं नदीपलीकडील शत्रू अद्याप जागा झाला नव्हता म्हणून मी बचावलों. कारण त्यानंतर नदीपलीकडून सपाट्याचा गोळीबार सुरू झाला!

या ठिकाणीं नदीचें पात्र खूपच रुंद होतें व नदी दुभंगून एका लांबट बेटाला वळसा घालून पुन्हा पलीकडे मिळाली होती. ( अशीं बरींच बेटें येथें होतीं. ) त्या बेटांवरहि शत्रू होता. या कॅपांत असतांना मध्येंच केव्हां शत्रू एकजूट करून गोळीबार करीत असे. त्या बेटावरील शत्रूला हुसकून तेथें एक पिकेट ठेवणें भाग पडले. पलीकडे बेटावर जाण्याकरतां एक पूल तयार केला. मध्यें फुटाचें अंतर ठेवून दोन दोन काठ्या तीन फुटाच्या अंतरावर नदींत खोल ठोकावयाच्या व सगळ्यावर एक फळी टाकावयाची. त्याला कठडा नाहीं कीं कांहीं नाहीं. नदीचें पात्र रुंद असल्यामुळें त्या फळीवर तोल संभाळून लांबपर्यंत पैलतीरावर जाणें अवघड होतें. शिवाय त्या उघड्यावरील फळीवरून जातांना मनुष्य शत्रूला चांगलाच दिसून पडे. त्या दृष्टीनें ह्यावरून जाणें अत्यंत धोक्याचें होतें. बेटावर आमच्या पलटणीचेंच पिकेट होते व शत्रू पलीकडील तीरावरून स्नाइ-पिंग करीत असल्यामुळें एक ड्रेसर तिकडे पाठविणें आवश्यक होतें. मी आपल्या ड्रेसरला तिकडे जाण्यास सांगितलें. त्यावेळीं त्याचें तोंड पहाण्यासारखें होतें! कारण त्या फळीवरून जात असतां नुकताच एक हवालदार गोळी लागून मेला होता व एक मनुष्य जखमी झाला होता. हवालदार तर अगदीं पलीकडच्या तीरावर जवळ जवळ पोहोंचला होता. ड्रेसरची मला कींव आली व आपणच

तिकडे जावें असें मीं ठरविलें. पण तितक्यांत मेजर तेथें आला व त्यानें ड्रेसरला जाण्याचा हुकूम केला !



युफ्रेटीसवरील तात्पुरता फळ्यांचा पूल, अबूसुखेर

एकदां मी व रिसाल्यांतील डाक्टर याच कॅंपांत आमच्या तंबूंत जमीनीवर पडून गप्पा मारीत होतों. इतक्यांत गोळीबार सुरू झाला. आमच्यामागें एक लांकडी पेटी होती त्याला गोळी लागल्याचा आवाज झाला. आम्हीं दचकलों व उठून आपआपल्या कामाला गेलों !

दक्षिणेकडूनहि शत्रू नेहमीं हल्ला चढविण्याचा यत्न करी, व रात्रीं १॥-२ वाजतां एकदम् आमची सर्व ब्रिगेड जागी होई. फारसें नुकसान होत नसे. एकादें खेंचर जाया व्हावें किंवा एकाद्याला किरकोळ जखम व्हावी.

**'हॉट् बाथ'**

एकदां गोऱ्या पलटणीच्या एक दोन कंपन्या म्हणजे २–४ शें सोल्जर स्नानाकरतां नदीवर गेले होते. इतक्यांत पलीकडील तीरावरून शत्रूनें एक फेर झाडली. मग काय धांदल आणि त्रेधा विचारतां ! त्या वेळीं मी कॅपांतच होतों. एकामागून एक सोल्जर भराभर परततांना दिसले. कोणी टॉवेल गुंडाळला होता तर कोणी शर्ट नेसले होते ! आपले कपडे नदीतीरावरच टाकून त्यांनीं धूम ठोकली होती !

वरचेवर असे हल्ले येत असल्यामुळें खंदक खणून त्यांतच राहण्याचा हुकूम झाला ! अशाच एका वेळीं गोळीबाराचा तडाका चालू असतां मला एक



खंदकांतील पिकेट ( निकराच्या गोळीबारानंतर ), अबूसुखेर

शिपायाला पहावयास बोलाविले. तो त्या वेळीं एका उथळ खड्डयांत जेवीत बसला होता. संवगड्याशीं बोलत असतांनाच त्याच्या छातींत नेमक्या काळजावर गोळी लागली व तो तडकाफडकीं मेला. मी जाऊन पहातों तो रक्ताचा पूर वहात होता. यमाचें बोलावणें आलें कीं जेवीत असाल तर आंचवायला तिकडे गेलें पाहिजे ! !

आमचीं विमानें नेहमीं टेहळणी करीत असत व वरून शत्रूवर बाँब टाकीत असत किंवा लुईसगन चालवीत असत. त्यांची हालचाल पहाणें अत्यंत चित्तवेधक असे. विमान उतरवीत उतरवीत कित्येकदां जमीनीपासून ५० फूटांवर आणीत, बॉंब टाकीत व उंच उडून लांब जात. एकदां एका पायलटला हातांतच गोळी लागली पण कसाबसा तो आमच्या कँपानजीकच्या एअरोड्रोममध्यें येऊन उतरला ! शाबास त्याची !

विमानासंबंधीं बोलतांना एक गोष्ट आठवते. एका वैमानिकानें म्हणे कन्व्हॉयबरोबर असतां चुकून आमच्यापैकींच एका शिपायाला शत्रू समजून लुईसगन त्यावर चालविली. हा शिपाई नदीवर पाण्याकरतां चालला होता !

अबू सुखेर येथें असतांना पुष्कळ शेख लोक शरण आले. जनरलचें व त्यांचे तंबूच्या आंत कांहीं तरी चाले. कित्येकदां १०–१०, १२–१२ शेख एकदम येत. आम्हीं बाहेर गम्मत पहात उभे रहात असूं. मला वाटतें, पुढें हिल्यास परत गेल्यावर बंडखोरांचा पुढारी शेख शरण आला. त्यावेळीं मोठा समारंभ करण्यांत आला. किल्ल्यासमोरील उघड्या पटांगणांत एक शामिआना उभारला होता व आधींपासूनच त्यांत सर्व शेख लोकांना आणून बसविलं होतें. कांहीं वेळानें डिव्हिजनल जनरलसाहेबांची स्वारी आली. त्यांना लष्करी सलाम देण्यांत आला. आमची पलटण गार्ड ऑफ ऑनर होती ती जनरलसाहेबांनीं पाहिली. नंतर शेखांशीं हस्तांदोलन करून कॉफी झाली व जनरलसाहेब बँडच्या वादनांत निघून गेले. शहरांतील रहिवाशांवर परिणाम करण्यासारखा हा समारंभ झाला. गांवांतील आबालवृद्ध स्त्रीपुरुष जमले होते.

असें आठवतें कीं अबू सुखेर सोडण्याच्या आदले दिवशीं रात्रीं १२॥ च्या सुमारास बद्दूंनीं जोरानें हल्ला चढविला व तितक्याच नेटानें आम्हीं बसल्याबसल्याच तो परतवला. दुसरे दिवशीं सकाळीं त्या वाटेनें अबू सुखेर सोडून आम्हीं खालीं गेलों. पण एकहि मेलेला अरब दिसला नाहीं. आमचा असा अजमास आहे कीं त्या रात्रीं शत्रूचे ७५ लोक तरी जखमी झाले असावेत व २५–३० मेले असले पाहिजेत. असें म्हणतात कीं एका बंदुकीला तीन अरब असें त्यांच्या सैन्यांतील प्रमाण असे. एकादा जखमी झाला तर दुसरा बंदूक चालवी व तिसरा डॉक्टरचें काम करी व मृत शिपाई ते गाढवावर आडवे घालून बरोबर नेत असत. कोणीं म्हणतात कीं त्या रात्रींत अरबांनीं ते २०–२५

मेलेले लोक, याच रीतीनें तेथून ८–९ मैल थेट नजफपर्यंत पुरण्याकरतां नेले ! व अशाच रीतीनें ते पाऊणशे जखमी लोकही हलवले.

### खेळ खलास

२२ नोव्हेंबर रोजीं अबू सुखेर सोडून डेमॉन्स्ट्रेशनकरतां आम्हीं दक्षिणेकडे गेलों. वाटेंत ६ मैलांवर 'डसीम' गांव लागलें. या ठिकाणीं शत्रूनें खूप खंदक व मोर्चे खणून ठेवले होते. एक खंदक गांवांतून नदीपर्यंत नेला होता. पूर्वीचे तुर्की खंदकहि तेथे दिसले. गांव सोडून व घरांना व दुकानांना कुलपें लावून अरब पळून गेले होते.

इकडे येतांना आम्ही अगदीं सडे आलों होतों. गाड्या वगैरे कांहींच नसल्यामुळें अंथरुण सुद्धां आणतां आलें नाहीं. प्रत्येकानें एक एक ब्लँकेट मात्र आणलें होतें. कारण आतां थंडी पडूं लागली होती. घोड्यावर ब्लँकेट बांधलें कीं झाली आमच्या सामानाची बांधाबांधी !

२३ तारखेस आणखीं खाली २॥ मैलांपर्यंत जाऊन, आम्हीं दक्षिणेकडील मोहीम संपवून परतीची वाट धरली.

### स्थित्यंतरें

डॉरा कँपांत असतां आम्हीं कधीं कधीं फेरी बोटीनें बगदादला जात असूं. तेथील एका हॉस्पिटलमध्यें एक दक्षिणी डॉक्टर नुकतेच आले होते. पेशावरला असतांना आमची ओळख झाली होती. त्यांच्याकडे मी दोनतीन वेळां गेलों. त्यांची खोली लहानशीच होती, पण सुखसोयीच्या सर्व वस्तु तेथें होत्या. शेल्फवर एक बिस्किटांचा डबा होता. सायंकाळीं टेनिस खेळण्याची व्यवस्था होती.



माझा ऑर्डर्ली, हरसुख व ड्रेसर, डॉरा कॅंप, बगदाद

सकाळीं ९ ते १ पर्यंत काम केलें कीं बेस हॉस्पिटलमधील डॉक्टरांची दिवसाची कामगिरी संपते ! आम्हीं जुलैच्या आरंभीं बगदाद सोडलें. १९ तारखेच्या लढाईतील गोळ्या आम्हीं चुकविल्या; २२ तारखेच्या दुर्दैवी रिटीटमध्यें वांचलों; २० ऑगस्टच्या गोळीबारांतून निभावलों; १२ आक्टोबरला जिवावरचें तंगडी-वर घालविलें; दीडशें मैल आगगाडींतून प्रवास केला, ३०० वर मैल पायीं चाललों, ऊन व थंडी यांची सीमा सहन केली. व ८ महिन्यानंतर बगदादला हिनाइडी कॅपांत येऊन उतरल्यानंतर एके दिवशी मी त्या माझ्या मित्राकडे गेलों. तो होता तसाच होता. त्याच्या खोलीतील व्यवस्था—बिस्किटाच्या डब्या-सकट होती तशीच होती !

२३ नोव्हेंबरच्या संध्याकाळपासून २९ च्या दुपारपर्यंत, ५ मुक्कामांनीं आम्हीं हिल्यास येऊन पोहोंचलों. हे सुमारें ५० मैल होतात. आतां उन्हाळा संपून थंडीला सुरुवात झाली होती. संध्याकाळपासूनच अशी थंडी वाजूं लागावयाची कीं रात्रींचें जेवण वगैरे नको वाटे. कारण एकतर हात उघडे करावे लागतात व या वेळीं चमचे कांटे पुरेसे नसल्यामुळें जेवतांना हात ओले होत. एका साठ पौंडी छपरासारख्या तंबूंत आम्हीं ५–६ ऑफिसर एकमेकांना खेटून निजत असूं. व जेवणहि त्याच तंबूंत असे. त्यामुळें कित्येकदां निजल्या निजल्याच फक्त हाताचे पंजे पांघरूणाबाहेर काढून मी जेवीत असे. जेवायला टेबल वगैरे कांहीं नव्हतें. ज्यांनीं त्यांनीं आपल्या मांडीवर किंवा पुढयांत किंवा स्ट्रेचरवर आपली ताटली ठेवावी. पहांटे जिकडे तिकडे खोकला ऐकून जागे व्हावें !

एक दिवस हिल्यास विश्रांति घेऊन फक्त आमची पलटण पुन्हा हिंडिया बराजला गेली. येथ एका एंजिनिअरच्या जुन्या बंगल्यांत पोस्ट हॉस्पिटल केलें होतें तेथेंच मी राहूं लागलों. या ठिकाणीं एक मोडकें टेनिस कोर्ट होतें. तेथें केव्हां केव्हां आम्ही टेनिस खेळत असूं.

मध्यंतरी ५ तारखेस मुसाइबला आमच्या दोन कंपन्या होत्या तेथें एकदां कामानिमित्त जाऊन आलों. हिंडिया बराजला गमतींत दिवस गेले. २२ डिसेंबरला हिल्यास परत आलों.

नाताळ मजेंत गेला. पहिल्या दिवशीं पलटणीचे ब्रिटिश व इंडिअन ऑफि-सर एका तंबूंत जमले व जरा मोकळेपणानें गप्पासप्पा, चहापान, पेयें वगैरे

झाले. पलटणीला कांहीं सवलती मागून घ्यायला हा मुहूर्त चांगला असतो. त्याप्रमाणें सुभेदार–मेजरसाहेबांनीं हळूच गोष्ट काढून कांहीं कांहीं 'वर' मागून घेतले!

## बॅबिलॉन

जानेवारी २९, सन १९२१ : मी व आणखी तीन डाक्टर मिळून पुराण-प्रसिद्ध बॅबिलॉन पहाण्यास गेलों. बगदादहून ५६ मैलांवर व हिल्याहून ४ मैलांवर हें गांव रेलवेच्या बाजूला लागतें. (बंड मोडून, बसा-बगदाद रेलवे आतां सुरू झाली होती.) आम्ही मोटार मधून गेलों. सहा हजार वर्षांपूर्वी हे मोठें राजधानीचे शहर असून श्रीमंती आणि विद्वत्ता यांचे माहेरघर होतें. येथें जंगी व्यापार तेव्हां चाले. आपल्यासारख्याला विशेष गोडी लागण्यासारखे तेथें कांहीं नाहीं. एका टेंकडीवर हे गांव आहे. आतां फक्त पडक्या भिंती उरल्या आहेत. आमच्या वाटाड्यानें 'नेबुचेड्नेझार' वगैरे पुष्कळ अवघड नांवें गोंविलेल्या गोष्टी सांगितल्या. एक कोणाचीशी विहीर दाखविली. तेथील विटांचा विशेष म्हणजे त्या चांगल्या एक चौरस फूट मापाच्या असून त्यावर क्युनाईफॉर्म (?) अक्षरांत पुष्कळसें कांहीं खोदलेले आहे. तेथें एक सिहाचा दगडी पुतळा आहे. चांगला ३॥×७ इतका लांबरुंद व ५॥ फूट उंच येवढा मोठा असेल. सिहाच्या खाली एक बाई निजलेली दाखविली आहे



कार्पेंटियर, बॉक्सिग चॅंपियन

त्याची दंतकथा अशीः एका राजाची राणी वाईट चालीची निघाली. तिची चार लोकांत छी: थू: करण्याकरतां राजानें हा किळसवाणा पुतळा उभा केला !

पूर्वी मुसाइबकडे जातांना वाटेनें जेथून स्नाइपिंग झालें होतें त्या टेंकडीवर आम्हीं गेलों. मोर्चांत कित्येक रिकामीं काडतुसें पडलेलीं आढळलीं.

बॅबिलॉनहून एका मुलाकडून मी दोन वोटायेवढाल्या बाहुल्या विकत घेतल्या. त्यांचें वय ६००० वर्षांचें आहे. हिल्यास पुराणवस्तु-संशोधनाचा अभ्यास करणाऱ्या एका मिशनऱ्याकडून मीं त्या बाहुल्या बनावट नसून खऱ्या असल्याबद्दल खात्री करून घेतली. टेराकोटा नांवाच्या मातीच्या त्या केल्या आहेत. दरवाज्यावरील किंवा भिंतीवरील नक्षींत त्यांनीं एके काळीं भाग घेतला होता.

---

## ९ मायभूमीस परत

आमची पलटण हिंदुस्तानांत परत जाणार अशा गप्पा नेहमींच ऐकूं येत. आतां मात्र ती गप्प खरी ठरेल असा रंग दिसला. लढाई संपल्यापासून मीही रजेचे व 'डिमॉब्' करतां अर्ज करीत होतों ! १५ फेब्रुवारीला रात्रीं आगगाडींत बसून आम्हीं बगदादला दुसरे दिवशीं पहांटे पोहोंचलों व सहा-सात मैलांवरील हिनाइडी कॅपांत तळ दिला. येथें तीन आठवडे राहून आगगाडीनेंच कूटला १०३ मैल गेलों. आतां मात्र आमची पलटण परत हिंदुस्तानला जाणार असा आम्हांला भरंवसा येऊं लागला. मला स्वत:लाही पलटणीबरोबरच परत जाण्याचा हुकूम मिळाला होता.

### जादूच्या पादुका

घरीं परतण्याची अर्थात्च कोणालाहि तीव्र उत्कंठा असते. पण कांहीं तरी अडचणी येऊन, जाणें लांबतें व भयंकर विरस होतो. प्रत्यक्ष घरीं पोहोंचेपर्यंत मध्यंतरीं इतका विलंब झालेला असतो कीं त्या आनंदावर विरजण पडत जातें. पायरी-पायरीनें प्रत्येक गोष्ट होत गेल्यामुळें एकदम ब्रह्मानंद होत नाहीं. कारण एका पायरीपासून दुसरी पायरी, म्हणजे कांहीं एकदम् विशेष फरक पडत नाहीं. त्यापेक्षां जर जादूच्या पादुका मिळतील व फायरिंग लाईनमधून निमिषार्धांत–पापणी लवते न लवते तों आपल्या घरांत जाऊन पडतां येईल तरच मनाला खऱ्या गुदगुल्या होतील. पादुका घालून डोळे मिटावयाचे व उघडून पहातात तों घर ! आतां हेंच पहा. परत जाण्याचा हुकूम आल्यापासून प्रत्यक्ष कराचीच्या किनाऱ्यावर पाय ठेवीपर्यंत मध्यंतरीं जवळ जवळ २ महिने गेले. त्यामुळें उत्साह कमी कमी होत जातो. मागील प्रगति आपण गृहित धरतों व पुढील प्रगति लांब रहाते.

१६ दिवस कूटलाच थांबावें लागलें ! कारण वाहनाची सोय नव्हती. टैग्रीस नदींतून पॅडल स्टीमरनें ३ दिवसांच्या जलप्रवासानंतर बसा येथें आलों. येथें दोन आठवडे राहिलों व १२ एप्रिलच्या दुपारीं वार्सोवा नांवाच्या मोठ्या आगबोटीवर चढलों. २३ महिने मेसोपॉटमधील धूळ खाल्ली ! साडेचार दिवसांनीं आम्हीं कराची बंदरावर उतरलों.

कराची म्हणजे लहानशी मुंबई आहे. कराची बंदराला ' किमारी ' म्हणतात. आमचा कॅप येथून बराच लांब होता. बहुतेक रोज आम्हीं गांवांत व समुद्र-किनाऱ्यावर सहल करावयास जात असूं. बंदरांत आल्याबरोबर आम्हांस विचारण्यांत आलें होतें कीं तुम्हांला इतक्यांत डीमॉब् होण्याची इच्छा आहे कीं कसें. मीं हो म्हटलें होतें. व त्याला अनुसरून लवकरच डीमॉब्चा हुकूम माझ्या हातांत आला. तरी १२–१३ दिवस कराचीस रहावें लागलें. शेवटीं ३० एप्रिलला एका लष्करी आगगाडीबरोबर ( अयोध्येजवळील ) फैजाबादला मला जावें लागलेंच ! हा कंटाळवाणा प्रवास मासलेवाईक असून फील्ड सर्व्हिसची आठवण करून देत होता ! हजार-बाराशे मैल जायला साडेतीन दिवस घेतले. कराची-कोट्री-हैदराबाद-लुनी-मारवाड-आग्रा-कानपूर लखनौवरून अयोध्येला आम्हीं उतरलों. मारवाड जंक्शनपासून पुढें गमतींत वेळ गेला. पण हैदराबादपासून मारवाडपर्यंत रजपुतान्याच्या वाळवंटांतून जातांना अतिशय त्रास झाला. उन्हाळा नुकताच सुरू झालेला. डबे अगदीं भाजण्याइतके तापून जात. व पाण्याचा दुष्काळ ! कित्येक स्टेशनवर प्रत्यक्ष आळया असलेले पाणी क्लोरिनेट करून व गाळून पिण्याची वेळ आली ! वनवास अद्याप संपला नव्हता !

### " थोडक्यांत रामायण "

फैजाबादला लागूनच अयोध्या आहे. जणुं कांहीं हा वनवास संपवून आम्हीं रामाप्रमाणे अयोध्येला परत आलों ! अयोध्या पाहून ' ही रामाची अयोध्या !' या पुस्तकाची आठवण झाली, व मलाहि तीच शंका आली. शहर अगदीं घाणेरडें दिसले. देवळें जरी मोठीं असली तरी तीं शहराहून जास्त घाणेरडी दिसली. इतकीं, कीं, सांगितले तर खरें वाटणार नाहीं ! एका प्रसिद्ध देवळांतील प्रवेशद्वाराच्या पायऱ्यावर व खुद्द देवळांतील चौकांत ठिकठिकाणी मलमूत्र पडलेलें होतें ! देवळाच्या मुख्य इमारतीच्या पायऱ्यापर्यंत अशी घाण पसरली होती व माशा तर इतक्या अनंत होत्या कीं, मी तेथून पळत गेलों व पळत आलों ! असें म्हणतात कीं, रामाच्या वेळची अयोध्या हल्लींच्या वस्तीपासून एक कोसाच्या अंतरावर होती. तेव्हांपासून नदीचा प्रवाह आतां बदलला आहे. रामजन्माचें स्थान पाहिलें. त्या जागेवर तीन फूट उंचीच्या चबुतऱ्यावर साधारण ५ चौरस फुटी देवळासारखे कांहीं बांधलें आहे. तान्ह्या मुलाचा पाळणा लावून सहज हालवितां येईल इतकी त्या देवळाची उंची आहे. ( मात्र फार

मोठाले झोंके देतां कामा नयेत ! नाहींतर दर खेपेस पाळणा एकदां पुढल्या दरवाज्याबाहेर डोकवावयाचा व एकदां मागील दारांतून बाहेर यावयाचा ! ) त्या ठिकाणीं असलेल्या पुजाऱ्यानें रामाचीं खेळणीं दाखविली. रिंगणें, खुळखुळा, वगैरे. त्यांत एक मोटारहि होती ! पुराणवस्तुसंशोधनखात्यानें इकडे अवश्य लक्ष द्यावे. रामाच्या वेळीं सुद्धां मोटारी होत्या असे सप्रमाण व चक्षुर्वैसत्यम् सिद्ध होणे शक्य आहे. दहा फुटांच्या अंतरावरच एक मशीद आहे.

सैन्याला शेवटचा रामराम करतांना श्री रामाच्या पवित्र जन्मस्थानाचें दर्शन घडलें हा योगायोगच होय !

उभ्या दोन वर्षात दक्षिणी बाई दृष्टीस पडली नव्हती. आग्र्याच्या स्टेशनवर प्रथमच एक दक्षिणी मुलगी दिसल्यामुळें विलक्षण आनंद झाला व आतां आपण आपल्या लोकांत आलों असें वाटलें !

**रामराम ! मंडळी, रामराम !**

ह्या आठवणी लिहून लेखणी खालीं ठेवतांना एखादें सुखस्वप्न संपावें तसे वाटतें !



ड्यूक ऑफ वेलिंगटन



नेपोलिअन

[ इहलोकींचे हाडवैरी—स्वर्गस्थ मित्र ! ]

## १० पुरवणी

**सर्वसाधारण**:–युनिफॉर्म अलावन्स ( दाखल होतांच ) ६०० रुपये, पगार ४५०, फील्ड सर्व्हिसवर ५५०, कमांड अलावन्स १००. **प्रवास** : ड्यूटीवर असल्यास फर्स्ट क्लासचा पास. खाजगी कामाला सेकंड क्लासचे पैसे देऊन प्रवास फर्स्ट क्लासनें करावयाचा.

**पेशावरीं: ( २६–२–१८ ते २७–५–१८ ) घर:** ४–६ हपीसर मिळून एक बंगला भाड्यानें घेतला होता. **खाणें:** समाइक मेस. खर्च एकंदर दरमहा ७५ ( ? ). ( प्रत्येकाच्या ) बेअररचा पगार रुपये २०. **माझा कार्यक्रम:** पहांटे उठून लेखन–वाचन. मग ड्रिल ( साधे व स्ट्रेचर ) तास दीड तास. न्याहारी. हॉस्पिटलमध्यें काम. १२॥ ला लंच. झोंप. चहा. गांवांत वगैरे सहल किंवा टेनिस. जेवण. थंडीमुळें कांकडणें किंवा उकाड्यामुळें झोंपेकरतां चडफडणें.

येथें कित्येकदां आम्हांला आळीपाळीनें कांहीं अंतरावर असलेल्या फील्ड ॲब्युलन्सच्या कॅपांत ऑर्डर्ली ऑफिसर ( २४ तास ) नेमीत. तेव्हां रात्रीं तेथील तंबूतच रहावें लागे. रात्रींतून एक दोन वेळां गार्ड तपासावे लागत. या तंबूमधील जमीन २–४ फूट खणून काढलेली असे. ( घन-फूट वाढतात, उकडत नाहीं व तितका निर्धास्तपणा अधिक. ) या डग्–आऊटमध्यें उत्तर-रात्रीं एक प्रकारची गंभीर भीति ( उगीचच ) वाटे. कारण सर्वत्र पूर्ण शांतता, अंधेर आणि त्या खड्डयांत आपण एकटेच ! अनेक बरे-वाईट विचार मनांत येत व मेंदूवर एक तऱ्हेचा ताण पडे. शत्रू तिथें कसचा येतो पण मन चिंती तें वैरी न चिंती. ( असें आतां म्हणायचें ! )

पेशावर सुटल्यानंतर ईस्ट आफ्रिकेंत जाण्यापूर्वी मी पुण्यास घरीं भेटावयास गेलों असतां मला इंफ्लुएंझाचा ताप आला. तशा तापांतच मीं पुणें सोडलें व मुंबईस पालमकोटा बोटीवर चढलों. ( २८-६-१८ ) दुपारीं बोट सुटेपर्यंत मी कसाबसा डेकवर राहिलों व मग जी बर्थ ( मला वरची ! ) धरली तो तेथेंच पडलों. तिसरे प्रहरीं चहाला नाहीं, रात्रीं जेवायला नाहीं, तेव्हां खालच्या बर्थवरील साहेबलोकांनीं माझी चवकशी केली. मी गुंगींत होतों. मग मला डेकवरच इतर आजारी शिपायांच्या रांगेत कोणीसें नेऊन निजवलें. सकाळपर्यंत

औषधपाण्यावांचून मी तसाच कपड्यासकट निपचित पडून होतों. शेवटीं एक आय्. एम्. एस्. डाक्टर पहावयास आला, तेव्हां त्यानें मी ब्रिटिश ऑफिसर आहें हें समजून तेथून काढून हपीसरांच्या हॉस्पिटलमध्यें नेऊन ठेवलें.

**झांझीबारला**

आमची बोट लागल्यावर ( ? १०–७–१८ ) कांहीं तास थांबणार होती. 'मे आय् गो अ-शोअर, सर ?' ही ठराविक परवानगी आगबोटीच्या कमांडिंग ऑफिसरजवळून घेऊन मी धक्क्यावर उतरलों. गाईड वाटच पहात होते. एकाला घेऊन मी निघालों. त्यानें मला बाजारपेठ दाखविली, गव्हर्नरचा बंगला दाखवला, सुलतानाचा राजवाडा दाखविला. वेळ होत आल्यामुळें मी परत जाण्याचा मानस दर्शविला. त्याला माझी भाषा येत नव्हती व त्याची मला येत नव्हती. अगदींच मोडकें इंग्रजी तो बोलत होता. हातवारे करीत, खांदे उडवीत कांहीं तरी बोलत तो आणखी पुढेंच कोठें मला नेऊं लागला. त्याच्या त्या सगळ्या खांदे उडवण्याचा वगैरे अर्थ असा दिसला कीं आतां हा कांहीं तरी चांगले ( फार पैसे पडणार नाहींत ! ) दाखवणार, तिकडे गेल्याशिवाय खरी मजा येणार नाहीं, मीं याला नेलें, मीं त्याला नेलें, ते सर्व खूष झाले. मी परत चल म्हणतोय आणि हा आग्रह करीत गांवांत घेऊन चालला आहे ! बरं, काय, तें मला कांहींच समजेना. परत बंदरावर नेतो आहे कीं उलटीकडे ? एकपरी अनेक शंका येऊन भीतिही वाटूं लागली ! पण तसें बोलायचें कसें ? ( मला वाटते तो बोना-फाईड गाइड होता. ) आतां तर तो गांवांतील बोळां-बोळांत शिरूं लागला. बंदराकडे जायचें म्हणजे बोळांतून उघड्या-उघड्यावर यायला पाहिजे. अखेर एका बोळाच्या बंद तोंडाशीं नेऊन एका घराच्या व्हरांड्यापाशीं तो थांबला. आणि कांहीं समजावून सांगूं लागला. त्याचा उद्देश न समजून मी भांबावून गेलों. त्या घराच्या दारावर त्यानें टिचक्या मारल्या. मग मात्र भाषा न कळतांच मी सारें उमगलों ! कारण आंतून कापडाचा सळसळाट व लगेच खणखणीत पण बायकी आवाज कानीं पडला ! अबाउट टर्न, क्विक मार्च ! आतां मीच गाईडला वाट दाखवीत धक्क्यावर आलों ! 'वारे गाइड !' मीं मनांत म्हटलें. 'काय बावळट बाना ( साहेब ) आहे' तो मनांत म्हणाला ! मला लोकांनीं सांगितलेल्या मार्सील्स् येथील 'रसिकपणाच्या' गोष्टी आठवल्या.

**दारेसलामला** उतरलों (? ११-७-१८) तेव्हां ए. डी. एम्. एस्. (सॅनिटरी) (कर्नल क्लेमेशा, आय्. एम्. एस्.) यांस भेटावयास गेलों. त्यानें मला (सॅनिटरी सेक्शनसह) लंबोस जाण्याचा हुकूम दिला व सामान काय काय बरोबर न्यायचें, माणसें कोण कोण याचा तपशील सांगितला. साहजिक मीं म्हटलें " मीं आपली बाइक आणली आहे. " तेव्हां तो तापट (पण आंतून प्रेमळ) म्हातारा उद्गारला : "काय, तूं आपली वाइफ आणली आहेस ? " [ सायकल आगबोटीच्या होल्डमध्यें ठेवली असल्यामुळें इतर सामानाचें वजन पडून पुढचें चाक इंग्रजी आठाच्या आकाराचे झालें होतें. ते तेथीलच एका बोहऱ्याने चार-सहा तासांत नीट करून दिले म्हणून बरें ! ] परतीच्या वाटेवर पुन्हा दारेसलामला आलो तेव्हां माझा सॅनिटरी सेक्शन डिस्बॅंड करावयाचा होता. " तंबू वगैरे सामान परत देशील तेव्हां नीट पाहून पावत्या घे, आणि त्या जपून ठेव," कर्नल म्हणाला, "नाहीं तर दोन वर्षांनीं विचारतील कीं तंबूच्या चार खुंट्या कमी कशा ? ! "

**मोर्नॅपोः** (जुलै, '१८ ते नोव्हेंबर, '१८.) **घरः**—बिन-दरवाज्याची झोंपडी. (५-५० नीग्रो मजूर रानांत पाठवावयाचे. त्यांनीं झाडें तोडून लांकडें आणावयाचीं व झोपडी उठवायची. छप्पर गवताचें.) फील्ड् सर्व्हिसवर **रेशन** (शिधा) मिळे. तांदूळ, पाव, जामचा डबा, चहा, साखर, दुधाचे (आयडिअल मिल्क) डबे, बटाट्याच्या वाळवलेल्या चकत्या, बुली-बीफचे डबे, शिवाय सिगारेट किंवा तंबाखू. (कमरेला तंबाखूचा पिवळा झोळणा व तोंडांत पाईप असा सोल्जरांचा थाट असायचा.) येथे एक तऱ्हेच्या लांबट (झीब्रा छाप) सिगारेट्स विकत मिळत (८ आण्याला १०). लांब लांब सिगारेटची इकडे फॅशन होती. कधीं खेड्यांतील बाजारांतून टोमॅटो वगैरे. वाय्. एम्. सी. ए. च्या कॅंटीनमध्यें 'मद्रास करी पावडर' (मद्रासी मसाला) विकत मिळे ती मला फार फार आवडे. माझा स्वाहिली (नीग्रो) नोकर स्टोवर चहा व जेवण तयार करी. भात, बटाट्याचे ते काप (मद्रास करी पावडर घालून व पाणी ठेवून)—छान लागत. दही-ताक इल्ला ! दुधांत लिंबू पिळून दहीं करण्याचे प्रयत्न फसले. पुढें देखील दहीताकाचें नांव नाहीं. मेसोपॉटमध्यें चोरून केव्हां शिपायांचें आणलें तर !

एकदां मी लेमन स्क्वॅशची बाटली विकत आणली होती. तह होऊन मोर्नॅपो

सोडण्याची आदली रात्र. लेमन स्क्वॅशनें माझा जो घसा धरला–घशांत कांहीं अडकल्यासारखें वाटूं लागले व उलटी झाली. जीव घाबरा झाला. म्हटलें आतां उद्यां मातृभूमीस जाण्याकरतां परत निघावयाचें आणि आजच मी आटोपतों कीं काय! 'लाईट्स आउट'नंतर तसा दिवा ठेवायचा नाहीं. उत्तर–रात्रपर्यंत झोंप नाहीं.

या भागांत माझ्यासारखा एकही हपीसर मला भेटला नाहीं. येथील फील्ड हॉस्पिटलमधील रा. माने, केतकर व गोडबोले (?) यांची ओळख होऊन माझी बरीच करमणुक झाली. त्यांनींच मला स्वाहिली भाषा शिकवली.

**कार्यक्रमः—**

पहांटे उठून चहा, पत्रे, लेखन, अंघोळ वगैरे. कॅंपची इन्स्पेक्शन. जेवण, झोंप. येणारा–जाणाऱ्या रेजिमेंटच्या कॅंपची आरोग्यदृष्ट्या व्यवस्था करणे. इंसिनरेटर (भट्टी) बांधून देणें. चहा, पाणी–पुरवठ्याच्या ठिकाणीं तपासणी (साने–केतकरांबरोबर), मैल–सवा–मैल. जेवण, झोंप.

मोरोंपोला असतांना एक मनुष्य मजकडे आला व म्हणाला, "मी खरा उत्तरेकडचा ब्राह्मण. रगरूट–भरतीचे वेळीं मला 'स्वीपर' म्हणून घेतले. मला काय ठाऊक 'स्वीपर' म्हणजे काय ते. म्हटले असेल कांहीं चांगलें. निदान भंग्याचे काम असेल अशी कल्पनाही शिवली नाहीं. हो म्हणून गेलों. आतां काय करूं?"

आमच्या सॅनिटरी सेक्शनच्या कायमच्या स्टाफमध्यें एक सार्जंट, एक लान्स-कार्पोरल व आठ प्रायव्हेट हे गोरे सोल्जर व नाईक एक, लान्सनाईक एक, शिपाई बारा व फॉलोअर (भिस्ती, मेहेतर, व०) असे चार हिंदी लोक होते. हिंदी शिपायांपैकीं मराठी बोलणाऱ्या एकाला मी आपला ऑर्डर्ली म्हणून घेतला होता. तो केव्हां चहा किंवा जेवणही करी. चार-सहा महिन्यांनीं एके दिवशीं मला एकीकडे गांठून तो गंभीरपणें म्हणाला, "साहेब, माझ्या हातून चूक झाली—मी मराठा नसून महार आहे!"

**दारेसलामला**

परत गेल्यावर (नोव्हेंबर, १९१८) मी समुद्रकांठच्या रेस्ट-कॅंपांत उतरलों होतों. लवकर पॅसेज मिळणार नसल्यामुळें येथील संसर्गजन्य रोगाच्या (तुटपुंज्या) हॉस्पिटलवर मला नेमले होतें. तेथें सकाळ-संध्याकाळ जावें लागे. (मैल-दोन

मैल. ) इंफ्लुएंझाची सांथ असल्यामुळें गांवांतील मयत इसमास तपासण्याचें कामही माझ्या गळ्यांत घातलें होतें. इंफ्लुएंझानें मेला असल्यास त्याला अमुक अंतरावर लांब नेऊन पुरावें लागे ( ? ) व घर धुवावयाचें असे.

**आगबोटीवरः—**

रहावयास अर्थात् केबिन, स्वतंत्र किंवा समाईक. पहांटे ५॥–६ वाजतां स्टेवर्ड ( बटलर ) चहा-टोस्ट-फळें घेऊन केव्हां येतों ( छोट्या हजेरीस ) इकडे कान देऊन निजणें, मग अंघोळ वगैरे. ब्रेकफस्ट ( बडा हजेरी ). आपण बोटीवरील मेडिकल ऑफिसर इन् चार्ज असल्यास सिक परेड (रोगी तपासणे), बोटीचा कप्तान व कमांडिंग ऑफिसर यांचेबरोबर सबंध बोट तपासणें ( होल्ड-सकट ). मग डेकवर हिंडणें, पुढें काय पहावयास सांपडणार याबद्दल उत्सुक असणें, खेळ खेळणें किंवा पहाणें. लंच. आडवे होणें. वाचन. वायरलेसनें आलेल्या बातम्या बोर्डावर पहाणें. चहा. ' लाईफ-बेल्ट ' परेड ( आपापल्या नेमून दिलेल्या होडीजवळ येऊन गळ्यांत लाइफ–बेल्ट अडकवून किंवा हातांत घेऊन उभें राहणें. ) डेकवर हेलपाटे, इकडून तिकडे तिकडून इकडे. ( पहा, राणीच्या बागेंतील पिंजऱ्यांतील सिंह. ) जेवण : पदार्थ माझे मतें उत्तम पण गोऱ्या हपीसरांच्या मतें ' सो सो 'च. आगबोटीसारखी खाण्या-पिण्याची चंगळ मला कुठेंच वाटली नाहीं ! शिवाय आपल्या आवडीच्या सिगारेट मिळत.

**अल्हाबादेसः–**

( मार्च–एप्रिल, १९१९. ) रहाणें. युरोपिअन पद्धतीचें हॉटेल. खर्च महिना १००–१२५ ( ? ) बेअररचा पगार २०. दिनक्रम : सकाळीं स्टेशन हॉस्पिटल-मध्यें काम ८॥ ते १२॥. संध्याकाळीं हॉस्पिटलला भेट, सायकलवरून भटकणें. डी-मॉबचे अर्ज करणें. हिशेबखात्याशीं भांडणात्मक पत्रव्यवहार !

**बस्रा-बगदाद्-बायजी वाटचालींतः—**

( २१-५-१९ ते ९-६-१९ ) रेस्ट कँपः—बिलेट अगर तंबू. तंबूचे आंत डग–आऊट. उकाड्यामुळें तंबूवर गवताचें छप्पर ( कधीं बाजूसही ). खाणें:— प्रवाशाकरतां ठेवलेला मेस, सोडा वगैरे चैन. कार्यक्रमः—उडाणटप्पूपणा करणें. शहर पहाणें. कोणी मराठी–निदान हिंदू दिसतो का इकडे लक्ष ठेवणें. हा प्रवास थोडा आगगाडींतून ( बस्रा ते अमारा व बगदाद ते बायजी ) व मधला

( अमारा ते बगदाद ) पॅडलस्टीमरमधून केला. पॅडलस्टीमरला खालीं पाण्यांत बुडालेली विजेच्या पंख्यासारखीं पातें असलेलीं एक-दोन मोठालीं चाकें असतात तीं पाणी कापीत जातात. या बोटीवर धाक्-धुक् धाक्-धुक् असा मोठा आवाज येई. ( कारण बोट लहान असे. ) बोटीवर मेडिकल ऑफिसर इन् चार्जचें काम खरें, पण मुख्य करमणुक म्हणजे बोटीचीं टोंकें नदीकिनाऱ्यावर आदळतांना धक्के खाणें, मातीं गरगळत पाण्यांत पडतांना पाहणें, बाजूच्या खेड्यांतील बायकामुलें बोट पहावयास येत त्यांची गंमत बघणे व यापुढें तरी एकादें झाड ( खजुरी सोडून ) किंवा कांहीं चांगला सीन दिसेल अशी व्यर्थ आशा करणे !

**चमचमालला**

( जून, १९१९. ) अॅब्युलन्स हॉस्पिटलचे तंबू टेंकडीखालीं अर्ध्या मैलावर होते. व आम्हीं टेंकडीवरील बिलेटमध्यें रहात होतों. एके संध्याकाळीं मी हॉस्पिटलमधील काम संपवून टेंकडीकडे परत निघालों. अंधार पडला होता. आसपास कुर्द शत्रूची भीति असल्यामुळें मी सावधगिरीनेंच पण मोठ्यानें शिटी वाजवीत किंवा गाणें गुणगुणत भराभर बुटाचा आवाज करीत मार्ग आक्रमीत होतों. इतक्यांत डाव्या हाताकडे कांहीं तरी खणखणाट व रागानें उच्चारलेल्या शब्दांचा फणफणाट ऐकूं आला. क्षणभर मी दचकलों. तेथील कॅंपांतील एका संत्र्यानें मला अगोदरपासूनच ' हाल्ट, हु कमूडर ! ' म्हणून हटकलें होतें. पण मी आपल्याच नादांत असल्यामुळें मला तें ऐकूं गेलें नव्हतें. त्यानें जरा वाट पाहून संगीन लावलेली बंदुक फायरिंगच्या थाटांत मजवर रोंखली व पुन्हा पुन्हां हटकले व शेवटीं रागानें कांहीं तो पुटपुटला, त्याचा तो आवाज ! अंधेरांत मी कोण हें त्यानें ओळखलें नसले तरी शत्रू खास नाहीं इतकें त्याला उमगले असणारच. बंदूक सरसावली तरी त्यानें उडविली नसती हें मीही जाणून आहें. पण क्षणभर गाळण उडाली, इतकेंच ! मी जवळ गेलों व 'फ्रेंड' म्हणून उत्तर दिल्यावर, सलाम करून ' पास फ्रेंड, चालीस वेल ! ' असा त्यानें आशिर्वाद दिला, व मी मोकळा झालों.

थोडें पुढें गेल्यावर रस्त्याच्या बाजूनें दोन शिपायी ' ठेरो, ठेरो, ' म्हणून मजकडे येऊं लागले. कां समजेना. त्यांच्या हातांत कंदील व काठ्या होत्या. माझ्या पुढेंच १॥-२ फूट लांबीचा एक जाड साप रस्ता आडवा कापीत चालला होता, त्याला त्यांनीं ठार केला !

**फील्ड अँब्युलंसः—**

( कर्कुकला ) ( जुलै, ऑगस्ट, १९१९ ). **रहाण्यास** बिलेट. निजायला ( स्वतःचाच ) कँप कॉट, कँप टेबल, कॅनव्हसचें बाथ-टब. मच्छरदाणी, हरि-केन बत्ती. हातांत मखवी-मार. **खाणें**:—ऑफिसरांचा समाइक मेस. 'शिधा' व बाजारांतून व० विकत आणलेले जिन्नस. खर्च ६० रुपये. ( ड्रिंक्स्चा खर्च ज्यानें त्यानें निराळा करायचा असे. ) छोटा हजिरी—चहा पाव. न्याहारीला पॉरिज, टोस्ट, लोणी ( पिवळें, मीठ घातलेलें, डब्यांतील ), जॅम्, 'रंबल-टंबल' अगर स्क्रॅंबल्ड एग्ज, असल्यास मासे ( ताजे किंवा डब्यांतील ), बेकन व एग्ज, चहा ( वाटल्यास कॉफी ), चीज व बिस्किटें ( असल्यास ). लंचला सूप, डाळभात, मीट किंवा बीफ ( डब्यांतील ), क्वचित् पक्षी, चिकन्, बटाटे, कोबी व० भाज्या ( उकडून ), व पुडिंग. केव्हांही 'वष्टर' ( वुइंचेस्टर ) सॉस, किंवा चट्नी ( खारकांची व० ). ४—४॥ ला चहा पाव. रात्रीं ८—८॥ ला जेवण. डाळभाताखेरीज दुपारप्रमाणेंच, व कॉफी. **कार्यक्रमः**—नेहमींप्रमाणें पहांटे उठून लेख, चित्रें, पत्रे, वगैरे. अंघोळ, कपडे. ( तंबूमधील ) हॉस्पिटलचें ( वाटून दिलेले ) रोगी बघणे, ५—४ दिवसांनीं एकदां ऑर्डर्ली ऑफिसरची २४ तास ड्यूटी : सर्वसाधारण देखरेख, अर्जंट काम, रात्रींचे गार्ड तपासणे, कॅंपाची सफाई, वगैरे. आलेले रोगी उतरवून घेणे, जाणाऱ्यांना पोंचविणें, इ० जेवण, वाचन. इंग्रजी नियतकालिके वगैरे. झोंप. बऱ्याच आठवड्यांत नवी डाक न आल्यास तींच तींच पत्रें पुन्हा पुन्हा वाचणें. चहा. हॉस्पिटलांत फेरफटका. सहल, जेवण, भोजनोत्तरच्या गप्पा व 'यार्न्स्' ऐकणें. झोंप लागण्याचे आधीं व मधें जागे झाल्यास आकाशांतील ताऱ्यांचें निरीक्षण. ( बहुधा आम्ही गच्चीवर निजत असूं. ) ही फारच मनोरंजक करमणुक होती.

**पलटणींत**

( सप्टेंबर १९१९ ते ८-७-२०. ) **रहाणें**:—तंबू ( चमचमाल व अर्बिल येथें बिलेट ). **खाणें**:—समाइक मेस. **कार्यक्रमः**—पहांटे चहा व०, अंघोळ, सिक परेड. कॅंपाची स्वच्छता पहाणें, 'शिधा' तपासणें ( शास्त्रार्थे ! ). न्याहारी. ( सकाळचें काम संपल्याखेरीज मला ब्रेकफस्ट जात नसे, म्हणून मी मागाहून एकटाच न्याहारी करी ! ) हपीसचें लेखी काम, लंच. ताणून देणें, शिपायांना देवी,

विषम व०.टोंचणें, आलेले किंवा जाणारे ड्रॅफ्ट ( तुकड्या ) तपासणें. थंडीचे दिवसांत डॉरा कॅपांत असतांना दुपारीं १॥ ते ४ ( हॉकी किंवा ) फुटबॉल खेळणें. मग चहा–पाव–बिस्कीट, सिक परेड, भटकणें, केव्हां बगदादला फेरी-बोटींतून जाणें, जेवण, भोजनोत्तरच्या गप्पा व यार्नस् ऐकणें. झोंप.

अर्बिल मुक्कामीं माझें एक लहानसें पोस्ट हॉस्पिटल होतें. अर्बिल गांव सरहद्दीवरील आऊट-पोस्ट होतें. हपीसर बिलेटमध्येंच रहात. येथील जुजबी पोस्ट हॉस्पिटलमध्येंच मग मी स्वतंत्रपणें राहूं लागलों. पांच-दहा रोगी असावयाचे. थंडी मी म्हणे. रोगी 'खलास ' झाल्यास त्याला अग्नि देण्याकरतां इंडियन हपीसर मिळून वर्गणी करीत. ( सरकारी खर्चाच्या अधिकृत यादींत 'प्रेतास अग्निसंस्कार ' असा तपशील नव्हता ! ) येथील उद्योगः भयंकर थंडी असल्यामुळें चोवीस तास अंगांत गरम युनिफॉर्म घालून वर ओव्हरकोट चढवून बसणें. चोवीस तास खोलीत ( व हॉस्पिटलमध्येंही ) शेकोटी जळती ठेवणें. हात धुण्याची वेळ आल्यास घाबरणें. वारंवार हात चोळणें. नाक–कान गोंठून गेले कीं शाबूत आहेत हें वरचेवर बोटें लावून अदमासणें. सकाळ–संध्याकाळ ( किंवा रात्रीं-बेरात्रीं ) रोग्यांची हालहवाल पहाणें, राहिलेल्या वेळांत कुत्र्यांच्या पिल्लांची मांसाच्या तुकड्याकरतां चाललेली टग-ऑफ वार पहाणें. बर्फ पडलें असल्यास बर्फाचे शिराळशेट, उंट, व० करणें.

१९२० च्या नाताळांत माझ्या रेजिमेंटच्या हपीसरानीं एक झकास बांधलेलें पुडकें मला प्रेझेंट दिलें. पुडकें उघडतों तों आंत आणखी एक पुडकें. डब्यांत डब्या. असें करीत बरींच आच्छादनें काढली, दोऱ्या सोडल्या. शेवटीं आंत एक 'वुंड-स्ट्राइप ' निघाला ! [ सोनेरी रंगाच्या अरुंद फितीसारखा असून ( लांबी २" ) कोटाच्या डाव्या बाहीच्या बाहेरचे अंगास ( कोंपराखालीं ) लावावयाचा असतो. ( जितके वेळां जखम झाली असेल तितक्या अशा फिती लावायच्या. ) इतर रिबन्सना बाजारांत पैसे पडतात पण वुंड स्ट्राइप मात्र फुकट देतात. ]

**साधा मार्चः**

**मुक्कामासः**—तंबू. **खाणेंः**—पहांटे ब्रेकफस्ट. (मी फक्त चहा.) मुक्कामाला पोहोंचल्यावर लंच, चहा, जेवण. पदार्थ साधारण मामुली. **कपडेः**—थंडींत

गरम ट्यूनिक् व पट्ट्या, ब्रीचीस ( केव्हां स्लॅक्स् ), ओव्हरकोट. उकाड्यांत बहुशा शॉर्ट व शर्ट, बाह्या वर गुंडाळलेल्या. स्टॉकिंग्ज. जाड टोपडें. सोल्जर वगैरे मानेवर एक पडदा ( खाकी कापडाचा, टोपीच्या मागच्या बाजूस अडकविलेला ) व ( आफ्रिकेंत मीही ) स्पायनल पॅड्.

**अंगा-खांद्यावरील सामानः—**

हॅवर-सॅक, वॉटर बॉटल, कॅमेरा, थर्मॉस, दुर्बीण. उजव्या वरच्या खिशांत फर्स्ट-फील्ड ड्रेसिंग ( हें फील्ड् सर्व्हिसवरील प्रत्येक मनुष्याचे खिशांत असावयास पाहिजे ). वरच्या डाव्या खिशांत सिगारेटची डबी व आगपेटी (काळजावर येत असल्यामुळें गोळी अडण्याचा संभव. ) इतर ठरलेल्या खिशांत मिळून पैशांचें पाकीट ( त्यांत नोट व मोड, रेझर-ब्लेड, टांचण्या, दोरा ओवून सुई व० ), किल्ल्या, हातरुमाल ( एक रफ् एक फेअर ) खाकीच, कोरे फार्म एक-दोन—जरूरीचे संदेश लिहिण्यास, चाकू, फाउंटन-पेन व होजीसमध्यें खोंचून ठेवलेली पेन्सील ( कॉपीइंग ), मनगटावर घड्याळ, उजव्या मनगटावर आयडेंटिटी डिस्क. कमरेला रिव्हॉल्व्हर.

**कार्यक्रमः**—पहांटे उठून जमल्यास अंघोळ ( नाहींतर मुक्कामाला पोहोंचल्यावर ), सिक परेड, तंबू मिटवणें, सामान बांधून खटाऱ्यांत किंवा खेचरावर वेळेवर लादणें, कॅंप सोडतांना जागा साफ केली कीं नाहीं तें पहाणें, मार्च करतांना मागे-पुढें जाऊन ( केव्हां घोड्यावर केव्हां पायीं ) देखरेख ठेवणे ( डाक्टरी कामापुरती ). मधूनमधून थर्मॉसमधील चहा पिणें. बूट लागलेल्यांचा समाचार घेणे. मुक्कामाला पोहोंचल्यानंतर कॅंप ( आरोग्यदृष्ट्या ) कुठें करावा याबद्दल ओ. सी. ला ( नांवाचा ) सल्ला देणें. कचरा टाकण्याच्या व चराच्या शेतखान्यांची जागा ठरवणें, मुक्काम रहाणार असल्यास भट्टी बांधणे. शिपायांचा चहा आधीं तयार होत असे तो गटकावणे. तंबू उभारणें. लंच, झोंप, चहा, सिक परेड, इकडे तिकडे करणे, जेवण, झोंप.

**ऑपरेशनवरः—**

( ८-७-२० ते २९-११-२० ) **घरः**—तंबू किंवा उघड्यावर. निजायला स्ट्रेचर. जरूर तर मच्छरदाणी. कनातीचे संडास, तंबूजवळच. **खाणें**:—साधारण नेहमीसारखें. टिनमधलें लोणी वगैरे जिन्नस संपत आलेले असतात. मात्र बुली-बीफ

प्रामुख्यानें उरतं ! ताजा भाजीपाला, फळें यांचा अभाव पण आसपास शेतें असल्यास टामेटो, भेंड्या व० हव्या तेवढ्या घेऊन याव्या—फुकट ! **अंगा-खांद्यावरः**—सॅम-ब्राउन, पिशवी, पाणी-केटली, कॅमरा, दुर्बीण व शिवाय सर्जिकल हॅवर-सॅकही मी स्वतःच बाळगीत असे ( त्यांत जखमा बांधण्याचें साहित्य असे. ) साध्या पिशवींत चालतां चालतां चहा करण्याचें ( स्वतःपुरता ) साहित्य मी ठेवी. शिवाय सॅडविचीस व० बांधून घेतलेलीं; आणि पुढेंपुढें चिमुकली एन्ट्रेंचिग टूल्स ! अंगावर रिस्टवॉच् व आयडेंटिटी डिस्क. आंगठी वगैरे नाहीं. कमरेस पिस्तूल.

**कार्यक्रमः**—

पहांटे उठून चहाची पूजा. कधीं अंघोळीला चक्क फांटा ! नुसता वॉश ! हॅवर-सॅकमध्यें सॅडविचीस भरून घेणें. तंबू मिटून गाड्या खेचरें लादणे. आदले संध्याकाळीं खंदक केले असल्यास ते बुजवणें, पूर्वी पडलेली हत्यारें, काडतुसें वगैरे सांपडल्यास त्याच खंदकांत पुरून टाकणे. सिक परेड. मार्च करणें. मागे पुढें देखरेख. वाटेंत चहाची मोय होईल का इकडे नजर ठेवणें ( गवताची गंज, भात रचलेलें, व० ). मांसाचें सॅडविच असल्यास कोणाला तरी देऊन टाकणें किंवा त्यांतला फक्त पावाचा भाग मटकावणें. तहान लागली तरी पाणी न पिणें, कोणी डबक्यांतील पाणी पीत असल्यास सटकावणे, वाटेनें स्नायपिंग ( आडून गोळीबार ) होत असतें तिकडे दुर्लक्ष करणें, कोणाला गोळी लागल्यास त्याची जखम बांधून त्यास सोयीप्रमाणें किंवा जरूर तर ॲब्युलन्स गाडींत किंवा खटाऱ्यांत घालणें, आपल्या नजीक गोळी पडल्यास घाबरलों असें न दाखविणें व काडतूस सोधणें, लढाईला तोंड पडल्यास, खेचरें मागे पाठवून, सोयीची, बिनधोक्याची व आडोशाची जागा चटकन सोधून ड्रेसिंग स्टेशन उघडणें, जखमी येतील त्यांना पट्टया बांधून मागें पाठविणें, डोळे चुकवून फोटो घेणें. शक्य तर ठार मेलेल्यांना वाहून नेणें. गोळीबार थांबल्यावर स्वतः जिवंत आहेसें पाहून—हायसें वाटणें व पुन्हां मार्ग आक्रमणें ( ब्रिगेडबरोबर ) अगर तथेंच आसपास कॅप करणें.

कॅंप केल्यावर, पाण्याची व्यवस्था, कचरा, चराचे संडास व० ठरवणें, आजाऱ्यांची व्यवस्था, शिपायांच्यांतील चहा, तंबू उभारणें. लंच. लंचचे वेळीं

मेलेल्यांबद्दल हळहळ, जखम्यांबद्दल सहानुभूति, स्वत: ( लंच, खाण्यास ) शाबूत राहिल्याबद्दल ( शत्रूस ) शाबासकी. खंदक खणणें, पिकेट बसवणे, त्या वेळीं किंवा पूर्वी मेलेल्या लोकांस खड्डे खणून मूठ-माती देणे. वामकुक्षी, सिक परेड, कँपाची सफाई पहाणें, स्टँड-टूची परेड ( ५॥ वाजतां ), म्हणजे सर्वांनीं लढाईच्या तयारींत आपापल्या ठिकाणींच सज्ज रहाणें. ( असें केलें म्हणजे पूर्वी मोंगलांच्या वेळेसारखा गाफीलपणा रहात किंवा वाढत नाहीं ! ), इंडियन हपीसर, शिपायी वगैरेंची हालहवाल पुसणें, जेवण, पुन्हा मेलेल्यांबद्दल दु:ख व उद्यां आपल्याबद्दल असेंच दु:ख करण्याचा प्रसंग शेजाऱ्यावर किंवा शेजाऱ्याबद्दल आपणावर येणार काय हा विचार टाळीत गाढ झोंप. स्वप्नांत देखील घरच्या मंडळीची भेट नाहीं. कारण स्वप्नच पडतें आहे कशाला !



# ११ कांहीं अंतरें

| | |
|---|---|
| मुंबई ते पेशावर | १५०० मैल |
| मुंबई ते झांझीबार | २७५० |
| झांझीबार ते दारेसलाम | ५० |
| दारेसलाम ते लंबो ( मोझँबिक ) | ५३० |
| मुंबई ते मोझँबिक | ३१५६ |
| मुंबई ते अलाहाबाद | ७५० |
| अल्हाबाद ते काशी | ८० |
| अल्हाबाद ते आग्रा | २७० |
| आग्रा ते फत्तेपूर–शिक्री | २५ |
| आग्रा ते पुणे | ७२५ |

* * *

| | |
|---|---|
| मुंबई ते बस्रा | १८०० |
| ( बस्रा ते शट्-एल्-अरबचें मुख ) | ५० |
| बस्रा ते अमारा | ११० |
| अमारा ते कूट | १०० |
| कूट ते बगदाद | ११० |
| बस्रा ते बगदाद | २९० |
| बगदाद ते मोसल ( अर्बिलजवळ ) | २२५ |
| बगदाद ते बायर्जी | ११० |
| बायजी ते कर्कुक | ७५ |
| कर्कुक ते कारा अंजीर | १५ |
| कारा अंजीर ते चमचमाल | १६॥ |
| चमचमाल ते बझीआनची खिंड | १२ |
| चमचमाल ते कर्कुक | ३१॥ |
| कर्कुक ते अर्बिल | ६०॥ |
| कर्कुक ते किंगरबान | ७१॥ |
| अर्बिल ते किंगरबान | १३२ |
| किंगरबान ते बगदाद | १२५ (?) |

* * *

| | | | |
|---|---|---|---|
| बगदाद ते बॅबिलॉन | ५६ | ६० | |
| बॅबिलॉन ते हिला | ४ | | |
| हिला ते जरबुया | ८–१० | | ११५ |
| जरबुया ते खान जडवाल | ३८ | ५५ | |
| खान जडवाल ते दिवाणिया | ९ | | |
| दिवाणिया ते नबी मडयून | ९ | | |
| नबी मडयून ते इमाम हंझा | ९ | ३८ | |
| इमाम हंझा ते रुमेथा | २० | | |
| बगदाद ते रुमेथा | १५३ | | |
| हिला ते रुमेथा | ९३ | | |

* * *

| | | |
|---|---|---|
| हिला ते मुसाइब | २५–२६ | |
| मुसाइब ते हिंडिया बराज | ५–६ | |
| हिला ते हिंडिया | २० | |
| हिला ते रुस्तमिया कॅनॉल पोस्ट | ११ | |
| रुस्तमिया कॅनॉल पोस्ट ते किफल् | ९ | ३५ |
| किफल् ते कूफा | १५ | |
| कूफा ते नजफ | ५ | |
| कूफा ते अबू सुखेर | ६॥ | |
| अबू सुखेर ते डसीम | ६ | १५ |
| डसीम ते लास्ट पोस्ट | २॥ | |
| हिला ते लास्ट पोस्ट | ५० | |
| बगदाद ते लास्ट पोस्ट | ११० | |

* * *

| | |
|---|---|
| रुमेथा ते समावा | २० |
| समावा ते नसरिया | २४ |
| नजफ ते कूट | ८५ ( ? ) |
| नजफ ते अमारा | १७५ ( ? ) |
| नजफ ते बस्रा | २४५ ( ? ) |

## १२ लढाईची डायरी

| | | |
|---|---|---|
| २३-२-१८ | १४-२५ वाजतां | मुंबई सोडली |
| २५-२-१८ | २१-०० | पेशावरला पोहोंचलों |
| २६-२-१८ | | नोकरीवर रुजू |
| १३-५-१८ | | घोड्यावर बसण्याचा वर्ग सुरू |
| २७-५-१८ | | पेशावर सोडलें |
| | | नंतर मुंबई–पुणें–मुंबई |

* * *

| | | |
|---|---|---|
| २८-६-१८ | | पालमकोटा बोटीनें मुंबई सोडली |
| ? १०-७-१८ | | झांझीबारला बोट थांबली |
| ? ११-७-१८ | | दारेसलामला उतरलों |
| ? १४-७-१८ | १४-०० | सॅलॅमिस बोटींतून निघालों |
| ? १९-७-१८ | | लंबोस उतरलों |
| १९-(२०?)-७-१८ | | आगगाडीनें मोरॅपोस गेलो |
| २-११-१८ | शनिवार | ( दिवाळी ) |
| ११-११-१८ | ११-०० | आर्मिस्टिस |
| ? | | मोरॅपोहून लंबोस आगगाडीनें व बोटीनें लंबोहून दारेसलाम |

[ २९–११–१८ ला दारेसलाम येथे होतों. ]

* * *

| | | |
|---|---|---|
| १०-२-१९ | | कारागोला बोटीनें निघून |
| १८-२-१९ | २०-०० | मुंबई बंदराबाहेर बोट थांबली |
| १९-२-१९ | सकाळीं | मुंबईत उतरलों |
| ? २८-२-१९ | | अल्हाबादेस निघालों |
| ? २५-४-१९ | | वॉर लीव्ह २ महिने मिळाली. आग्रा, फत्तेपूर-शिक्री वगैरे पाहून, पुण्यास पोहोंचण्यापूर्वीच, तारेनें परत कामावर |

| | | |
|---|---|---|
| | | बोलावल्यामुळें, एकच दिवस पुण्यास राहून, मुंबईवरून अल्हाबादला गेलों व लगेच मुंबईस परतलों. |

* * *

| | | |
|---|---|---|
| १४-५-१९ | सकाळीं | जेडा बोटीवर चढलों |
| २१-५-१९ | दुपारीं | बस्रा, मार्गिल, येथें उतरलों |
| २४-५-१९ | १७-०० | आगगाडीनें बस्रा सोडलें व |
| २५-५-१९ | सकाळीं | अमारा येथें उतरलों |
| २७-५-१९ | संध्याकाळीं | पॅडल-स्टीमरनें अमारा सोडलें |
| ३०-५-१९ | १४-०० | कूटला पोहोंचलों |
| ३१-५-१९ | ९-०० | पॅडल-स्टीमरनें कूट सोडलें |
| ४-६-१९ | १५-०० | बगदादला उतरलों |
| ६-६-१९ | रात्रीं | आगगाडीनें बगदाद सोडलें |
| ७-६-१९ | सकाळीं | बायजीस उतरलों |
| ९-६-१९ | ११-०० | मोटरनें बायजीहून |
| | १८-०० | कर्कुकला मराठा पलटणींत दाखल |
| ? ११-६-१९ | | ब्रिगेडबरोबर ( पायीं ) कर्कुक सोडलें व कारा अंजीर, चमचमालवरून |
| १५-६-१९ | | बझिआन खिडीजवळ कॅंप पडला |
| १६-६-१९ | | रात्रीं ताप भरला |
| १७-६-१९ | | पलटणींतून फील्ड ॲब्युलंसमध्यें बदली. |
| १८-६-१९ | | ॲब्युलंसबरोबर कॅंपांतच |
| | पहांटे | ( बझिआन खिडींत चकमक झाली ) |
| | दुपारीं | खिडींत ब्रिगेडला जाऊन मिळालों |

[ २२-६-१९ या दिवशीं चमचमालला होतों ]

* * *

| | | |
|---|---|---|
| ? | | कर्कुकला परत ( येथें सुमारें २ महिने ॲब्युलंस हॉस्पिटलमध्यें काम ). |

मध्यंतरीं बायजीस एका कोर्ट-मार्शलपुढें साक्ष देण्यास मोटरनें जाऊन आलों.

*   *   *

'[ १३-९-१९ ला चमचमालला होतों ] चमचमालला ८७ पंजाबी पलटणींत नेमले [ 'सरता जून होता' ? ]

'२२-१०-१९ बुधवार ( दिवाळी )
चमचमालहून कर्कुकवरून अर्बिल, चालत ( ९२ मैल ७ दिवस )
१॥ तें २ महिने अर्बिल येथे.

[ नाताळांत व १४-२-२० या दिवशीं अर्बिलला होतों ]

*   *   *

अर्बिलहून कर्कुकवरून किगरबानला मार्च ( १३२ मैल, ९ दिवस )
किगरबानहून आगगाडीनें बगदाद
४-३-२० बगदाद, डॉरा कॅंप येथे पलटणीच्या हेड्-क्वार्टरला मिळालो.
चार महिने डॉरा कॅंपांत

*   *   *

| | | |
|---|---|---|
| ८-७-२० | १४-३० | आगगाडीनें बगदाद सोडले ( ऑपरेशन-वर जाण्याकरतां ) |
| ९-७-२० | संध्याकाळीं | दिवाणियास उतरलों |
| १०-७-२० | सकाळीं | आगगाडीनें दिवाणियाहून इमाम हंझा व |
| | संध्याकाळीं | तसेंच दिवाणियाला परतलों |
| ११-७-२० | सकाळीं | खान जडवाल व पूल दुरुस्ती |
| | संध्याकाळीं | परत दिवाणिया |
| १२-७-२० | सकाळीं | खानजडवालपलीकडे ४ मैल |
| | संध्याकाळीं | परत दिवाणिया |
| १३-७-२० | सकाळीं | नबी मडयूनला मार्च |
| १४-७-२० | ,, | इमाम हंझास मार्च |

| | | |
|---|---|---|
| १८-७-२० | | इमाम हंझापुढे ४ मैलांवर रुमेथा कॉलमला मिळालों |
| १९-७-२० | | कॅंप सोडून खालीं कूच |
| | १४–३० | लढाईस तोंड लागले |
| २०-७-२० | सकाळीं | रणभूमी सोडून रुमेथाचे अलीकडे ३ मैलांवर थांबलों |
| | | रुमेथाचा वेढा उठवून गोरी पलटण परतली. |
| | तिसरे प्रहरीं | माघारी फिरून ब्रिगेडनें थोड्या अंतरावर कॅंप केला |

* * *

| | | |
|---|---|---|
| २१-७-२० | सकाळीं | परतीची वाट-चाल व लढाई झाली होती त्याच्या उत्तरेस कॅंप केला |
| २२-७-२० | सकाळीं | परतीच्या वाटेवर; मागून गोळीबार |
| २५-७-२० | | मजलदरमजल कूच करीत परत दिवाणियास |
| ३१-७-२० | पहांटे | दिवाणियाहून रिट्रीट; मजल दरमजल करीत |
| ८-८-२० | | हिला गांवीं पोहोंचलों |

* * *

| | | |
|---|---|---|
| ९-८-२० | दुपारीं | हिलाहून निघून उत्तरेस २ मैलांवर कॅंप |
| १०-८-२० | सकाळीं | कॅंप सोडून उत्तरेस ८ मैलांवर दुसरा कॅंप |
| ११-८-२० | सकाळीं | कॅंप सोडून कूच. वाटेंत ताप चढला. ॲम्ब्युलंस मोटरींतून ८ मैलांवर मुसाइबला पोहोंचलों. |
| १९-८-२० | सकाळीं | मुसाइबहून हिंडिया बराज |
| | दुपारीं | पश्चिमेकडे ३ मैलपर्यंत चाल—शत्रूची हकालपट्टी |
| | संध्याकाळीं | परत कॅंप ( हिंडिया ) |

| | | |
|---|---|---|
| २०-८-२० | सकाळीं | नैऋत्येकडे २-३ मैलपर्यंत चाल |
| | १२-०० | चकमक |
| | संध्याकाळीं | परत कँप ( हिंडिया ) |
| २१-८-२० | | हिडियाबराज सोडून, पुढें कँप |
| २२-८-२० | | पहिला कँप सोडून आणखी पुढें कँप केला |
| २३-८-२० | | खान महवीलवरून हिल्यास |
| | | हिल्यास १ महिना, १९ दिवस मुक्काम |

* * *

| | | |
|---|---|---|
| ११-१०-२० | | हिल्याहून तमाझिया—शत्रूची हकालपट्टी |
| १२-१०-२० | सकाळीं ( मंगळवार ) | तमाझिया सोडून खाली कूच |
| | १२—०० | चकमकींत गोळी लागली |
| | तिसरे प्रहरीं | फील्ड हॉस्पिटलबरोबर पुढें कॅप |
| १३-१०-२० | | हॉस्पिटलमध्यें—पुढें चार मैलांवर कँप |
| | दुपारीं | चार घोड्यांच्या चार-चाकी गाडींतून, जखमी लोकांच्या तांड्याबरोबर निघून |
| | रात्रीं | हिला येथील हॉस्पिटलमध्यें प्रवेश |

* * *

| | | |
|---|---|---|
| १९-१०-२० | सकाळीं ( मंगळवार ) | ' बेलम् ' ( होडी ) मधून ( काल्व्यांतून ) रस्तमिया कॅनॉल पोस्ट |
| २०-१०-२० | सकाळीं | पोस्ट सोडून पायीं किफल्ला |
| २१-१०-२० | तिसरे प्रहरीं | किफल्हून मोटर कन्व्हॉयबरोबर |
| | तिनीसांजा | कूफास पलटणीस येऊन मिळालों |
| ९-११-२० | मंगळवार | ( दिवाळी ) |
| १३-११-२० | | कूफाहून अबू सुखेरला |
| २२-११-२० | | अबू सुखेरहून डसीम गांवांत शिरकाव |
| २३-११-२० | | आणखी खालीं २॥ मैल चाल व परत |
| २३-११-२० | संध्याकाळ ते | } पांच ठिकाणीं मुक्काम करून परत हिला |
| २९-११-२० | सकाळ | |

* * *

| | | |
|---|---|---|
| ३० ११-२० | | पुन्हा एकटाच हिडिया बराजला |
| ५-१२-२० | | पुन्हा मुसाईब |
| २२-१२-२० | | हिल्यास परत |
| २९-१-२१ | | बॅबिलॉन पाहिले |

* * *

| | | |
|---|---|---|
| १५ २-२१ | रात्रीं | हिला आगगाडीनें सोडले |
| १६-२-२१ | सकाळीं | बगदाद, हिनायडी स्टेशनवर उतरलों ३ आठवडे येथे. मग आगगाडीनें कूटला. १६ दिवस येथेच. मग कूट ते बस्त्रा, बोटीनें, ३ दिवसांत २ आठवडे येथे |
| १२-४-२१ | दुपारीं | बस्त्रा सोडले |
| १७-४-२१ | | कराचीस |
| ३०-४-२१ | | कराचीहून राजपुताना माळवा रेलवेनें |
| ४-५-२१ | | फैझाबादला ( अयोध्या ) |
| ५-५-२१ | | फैझाबादहून अल्हाबाद |
| ६-५-२१ | | वाटेंत जबलपूर गांवांत फेरफटका |
| ७-५-२१ | | भुसावळ व जळगांव येथे थांबून |
| ८-५-२१ | | मुंबई व घरीं |



## 13. Sparetime scribbling, 'without Rhyme or Reason,' of Topical interest



### ODE TO OLD KIRKOOK

Sweet is thy memory !, dear old Kirkook,
With the fair young damsels and the rumbling brook.
To part with thee Oh ! who could brook ?
Back shall I come by hook or crook.

Half revealing half concealing
The charms of their faces ever so enchanting
(—Like clouds that shroud a beauteous moon—)
The Purdah adds glory ever and anon—

To the rosy cheeks, ( mind you not gum-boils ),
At sight of which your young blood boils.
And the bistoury-shaped noses and lashes black
That make your military discipline slack.

The half-open mouth with pearly teeth set
( Not unlike a head in a golden locket )
Reminds me of a packet by SHADIRAM [1] made,—
( Careless wrapped when all is said )—

Half gaping with many a calomel pill
Both of which their patients kill !
Glimpsed at in the bazzar over window-sills,
Their breasts do vie with Gun-post Hills.

---

1. The Dresser.

The speed of our old boy Hendy's [2] car
Much of the beauty of the view doth mar.
If we would speak the *bat* that's *suchh*,
Just a little though not much,

( As MAJOR [3] would put it in short and terse )
To our Tommies and D. Brs. [4] that is a curse !
Sweet art thou though do I grant
Sweeter still be MAJOR GRANT !

Where CHAKRABARTY [5] by CAMPBELL [6] shunned
( The latter one in despatches mentioned )
Once met near Four-O-One P.O.[7]
AYENGAR clerk of the L.P.O.

" Doc, " says the clerk, " Pray be so kind
As to listen to what I have in mind ;
Brooding and thinking I sit till late
Do not know what's stored in my fate.

Up comes a sob with a sudden jerk ;
In my heart doth something lurk.
Giddiness and Palpitation do I often feel,
Is it Heart-Disease ?-now don't conceal. "

The Doc became grave and nodded his head,
Then purcussed his chest and coughed and said,
" Why my man 'tis D A.H.[9]
But try as I can I cannot fetch—

2 Lt Henderson of the Royal Engineers.
3. Major Grant second in Command of the C.F A
4 i e Dooly ( Stretcher ) Bearers
5 Lt. Chakravarty, Medical Officer in C.F.A.
6 Lt Campbell, another M O
7. Field Post Office, No 401
8. Local Political Officer.
9. i.e 'Disordered Action of the Heart.' a term used often by Army doctors to enote any kind of heart Disease, like 'N Y D '=Not Yet Diagnosed !

Medicine meet; for, there's no cure
For this your ache, By Jove !, to be sure !
A foreign body rests in your Heart
Ever so little, delicate and smart.

But what's the pain like,–do tell me now—
Cutting or Stabbing or Dragging or how ?"
"Sort of dragging, Doc, methinks."
"Right O !" says Doc. and here he winks:

"O'er the bridge[10] cease crossing the river,
And I will bet your troubles are over !"

* * *

Attached to the Seventeenth Divisional Train,[11]
Drabi[12] Two–Six–One NARAYEIN
By ANTHONY Naik in his camp was seen
( Of 38 C F.A.[13] on Sanitation keen ).

"*Dekho* here" says the Naik,
"Never in my life have I seen the like !
Your water you chlorinate not
Nor in tins do cresol put.

Your tent with Flies is simply swarming,
And beastly Mosquitoes nightly humming.
That's how you *pagals* get often sick,
You are not worth even so much as a kick !

Have a look in my Hosp. and you won't find
Mosquito or Sandfly of any kind.

---

10 Bridge leading to the Village of Kirkook.
11 Transport Service
12. Means Driver No. 261 of Mule cart
13. Combined Field Ambulance

And now and again are you telling lies,
But the truth I know from the presence of Flies."

"Strange!" quoth NARAYEIN, "then how be it—"
And scratched his head and brows he knit,
"Hundreds of Flies this place though fill
There's not a soul now really ill?

And thrice in the day though carefully sprayed[14]
With Sick is still your Hosp. so crowded?"

* * *

Where in the Mess old COLONEL[15] presides,
*So to speak* in his chair he hides.
The MAJOR always late for dinner,
(Caring for patients more than a brother)

Late at night in Certificates[16] engrossed,
He made others work and himself worked.
Wherein doth portly NAGARKAR[17] sit,
With melon-seeds and bread-crumbs often hit—

By 'naughty' CAMPBELL, fussy and funny,
Fond of cock-tails and yarns so many;
Both of whom are often bent
On splitting a beer by BAILY[18] sent.

Content with only Juice of Lime,
Playing with forks all dinner-time,
And listening with observant eyes
To genera and species of butter-flies,[19]

---

14 Sprayed with Cresol disinfectant
15 ?
16 Cards, for patients, who are to be sent back to Base Hospital.
17. Capt. Nagarkar, a M O. of C.F A.
18. Capt. Baily of the supply Corps?
19. The Colonel was interested in Butter flies and used to discourse on their varieties and habits, etc.

O'er the edge of the table shy LIMAYE peeps,
The rest of the day, he writes or reads.

CHAMCHAMAL, 13-9-19.



## MARCH of the 87th PUNJABIS

Flies to the right of them
Mosquitoes to the left of them
Sand-flies beneath them
Bullets in front of them

Dust inside them
Heat outside them
Into the Marsh of Hillah
Marched the sturdy PUNJABIS !

HILLAH, August 1920.



## SOLILOQY OF A B. O. R.

AT A WAY-SIDE NULLAH

*(When Heat was Intense and Water Scarce.)*

To drink or not to drink, that is the question !
To abstain—to die; to drink—to trot.
Whether 'tis nobler in the Heart
To suffer the pangs of thirst
Or by drinking to quench them !

HILLAH, August 1920.

---

B.O.R. = British Other Rank.

